# "छत्रपती शिवाजी महाराजांचा वैज्ञानिक दृष्टिकोन- एक चिकित्सक अभ्यास"



स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठाच्या मानव्य विद्याशाखांतर्गत

इतिहास विषयात पीएच.डी. पदवी करिता

सादर करण्यात आलेला

## शोध-प्रबंध


: संशोधक :

**काशिनाथ दत्तराम पल्लेवार**

: मार्गदर्शक :

**डॉ. जगन्नाथ महादेवराव बोचरे**

सहयोगी प्राध्यापक व विभागप्रमुख,

इतिहास विभाग

स्व.नितीन कला व विज्ञान महाविद्यालय,

पाथरी,जि.परभणी


**डिसेंबर - २०१८**

**वैज्ञानिक दृष्टिकोन म्हणजे काय ?**

**व्याख्या :-**

1) वैज्ञानिक दृष्टिकोन म्हणजे कोणत्याही विषयाच्या पध्दतशीर आणि तर्कशुध्द अध्ययनासाठी अवलंबिण्यात येणारा विशिष्ट दृष्टिकोन होय.

   - General (सर्वसाधारण)

2) A system based on an organized logical & systematic study of any subject is known as scientific attitude.

   - Encyclopedia

3) विवेकाने वापरलेले ज्ञान म्हणजे विज्ञान होय. अथवा कोणत्याही विषयाच्या अभ्यासासाठी विवेकाने वापरलेला दृष्टिकोन म्हणजे वैज्ञानिक दृष्टिकोन होय.

   - आचार्य विनोबा भावे

4) मानवी प्रगतीच्या मार्गातील लहान-मोठे अडथळे दूर करण्याचा तो एक शास्त्रशुध्द विचार आहे. सजीव घटना, पध्दती या सर्वाबद्दल केलेली विधाने सत्य की असत्य, योग्य वा अयोग्य हे निरीक्षण करुन अनुभवाद्वारे चिकित्सक बुध्दीने त्याची कारणमीमांसा करुनच ग्राह्य धरायची कि नाही. या विशिष्ट दिशेने प्रेरित होऊनच कार्यरत राहण्याची कष्टसाध्य साधना. यालाच वैज्ञानिक दृष्टिकोन म्हणतात.

   - डॉ.जयंत नारळीकर

**प्रस्तावना :-**

छत्रपती शिवाजी महाराजांच्या जीवन चरित्रावर आजपर्यंत विपुल लिखाण झालेल आहे. छत्रपती शिवराय एक उत्तम राज्यकर्ते होते त्यांच्या अंगी अनेक गुण होते. त्यात सहिष्णुता, स्त्रीविषयक निर्मळ दृष्टिकोन, संघटक, सच्चा साथी, दिलदार मित्र आणि वैज्ञानिक दृष्टिकोन होय. त्यातील वैज्ञानिक दृष्टिकोन या गुणावर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न या प्रबंधात करण्यात आले आहे. शिवरायांकडे संसाधने कमी होती, शत्रू बलाढय होते. परंतु शिवरायांच्या अंगी जे काही गुण होते त्या गुणामुळे ते या संकटावर, अडचणीवर मात करुन यशस्वी ठरले. आपण वैज्ञानिक दृष्टिकोनाची वैशिष्टये पाहिली. त्यातून छत्रपती शिवरायाच्या अंगी असलेल्या वैज्ञानिक दृष्टिकोनाची कल्पना येते. आज आपण 21 व्या शतकात वावरत आहोत. मात्र सकाळी उठल्यापासून ते रात्रीपर्यंत विज्ञानाच्या मदतीशिवाय जीवन जगणे अशक्य झालेले आहे. परंतु 17 व्या शतकात छत्रपती शिवाजी महाराजांनी वैज्ञानिक दृष्टिकोन अंगिकारला. आणि त्या गुणांच्या आधारे आपल्या स्वराज्याचे संवर्धन केले. मध्ययुगीन काळ हा अज्ञान आणि अंधकाराने भरलेला होता. प्रत्येक व्यक्तीवर अंधश्रध्देचा प्रचंड पगडा होता. अशा काळात अंधश्रध्दा झिडकारणे सोपे नव्हते. परंतु ते धाडस छत्रपती शिवरायांनी केलेले होते. छत्रपती शिवरायांच्या वैज्ञानिक दृष्टिकोनाचा मागोवा घेत असताना त्याची बिजे केव्हा रोवली गेली हे लक्षात येते की, छत्रपती शिवराय जेव्हा बंगळूरहून पुण्याला आले. तेव्हा पुणे ओस पडले होते. शत्रू पक्षाने पुणे बेचिराख करुन टाकले होते. आदिलशाहाच्या सरदाराने पुणे बेचिराख करुन पुणे गावावरुन गाढवाचा नांगर फिरविला आणि सगळयांना बजावून सांगितले. जो कोणी या ठिकाणी वस्ती करेल त्यांचा निर्वंश होईल. परंतु राजमाता, राष्ट्रमाता जिजाऊंनी हे आव्हान स्विकारले आणि त्या निर्जन स्थळी वस्ती केली. यातून जिजाऊंचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो आणि हाच वैज्ञानिक दृष्टिकोन शिवरायांनी आयुष्यभर अंगिकारलेला दिसून येतो.

**समस्या सूत्रण :-**

छत्रपती शिवरायांच्या कर्तृत्वाची आणि कार्याची नोंद जगाने घेतलेली आहे. आपल्या अंगी असलेल्या विविध गुणांच्या जोरावर शिवरायांनी हे स्वराज्य निर्माण केले होते. त्यांच्या अंगी असलेल्या विविध गुणांपैकी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा परामर्श प्रस्तुत प्रबंधात घेण्यात आला आहे. शिवरायांवर अनेक अंगाने लेखन झालेले आहे. त्यांच्या विविध गुणांची नोंद आतापर्यंत विविध संशोधकांनी घेतलेली आहे. दुर्लक्षित राहिलेला गुण म्हणजे त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन होय. याच वैज्ञानिक दृष्टिकोनाचा विविध अंगाने परामर्श घेण्याचा प्रयत्न या शोधप्रबंधात करण्यात आला आहे. आज आपण 21 व्या शतकात विज्ञानाच्या युगात वावरत आहोत. विज्ञानाचा पावला-पावलांवर उपयोग करीत आहोत. परंतु जिथे विज्ञानाची पहाट झाली नव्हती त्या युगात शिवरायांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग केलेला दिसून येतो. शिवराय फक्त योध्दे नव्हते तर ते एक उत्तम प्रशासक, उत्तम मानसशास्त्रज्ञ, उत्तम समुपदेशक होते. हे या शोधप्रंबधातून सिध्द करण्यात आले आहे. शिवरायांचे जीवन चरित्र उघडून पाहिल्यास अनेक ठिकाणी त्यांनी दाखविलेला वैज्ञानिक दृष्टिकोन आपल्याला दिसून येतो. जेव्हा राजाराम महाराज पालथे जन्माला आले तेव्हा सगळे नातेवाईक निराश झाले. राजांना ही बातमी कशी द्यावी असे अनेकांना वाटले. राजे काय म्हणतील अशी शंका सर्वांना वाटली. तेव्हा शिवराय उदगारले - ‘‘राजाराम पालथे जन्माला आले त्याचा अर्थ ते भविष्यात दिल्ली पालथी घालतील.’’ यावरुन शिवराय किती सकारात्मक विचार करत होते हे दिसते. तथाकथित हिंदू धर्मानुसार समुद्रावर प्रवास करणे निषिध्द समजले जात होते. तेव्हा शिवरायांनी समुद्रावर, सागरावर आरमार उभारले. तेवढेच नाही त्या भागातील शेतकऱ्यांसाठी जोडधंदा म्हणून मिठाचा व्यवसाय - मिठागरे निर्माण केली. या प्रबंधात शिवरायांच्या वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या विविध बाबींचा अभ्यास करण्यात आला आहे. शिवराय फक्त योध्दे होते हे न मांडता त्याबरोबरच ते उत्तम प्रशासक, उत्तम समुपदेशक, उत्तम शासक होते. मध्ययुगीन कालखंडात सगळीकडे अज्ञान, अंधश्रध्दा पसरलेली असताना शिवराय मात्र वैज्ञानिक दृष्टिकोन बाळगतात आणि त्या आधारे स्वराज्याचे रुपांतर सुराज्यात करतांना दिसून येतात.

**संशोधनाची आवश्यकता :-**

आजपर्यंत छत्रपती शिवाजी महाराजांवर खूप लेखन आणि संशोधन झालेले आहे. छत्रपती शिवराय म्हणजे महाराष्ट्राची अस्मिता आहे. त्यांच्या विषयी विविध अंगाने लेखन झालेले आहे. शिवराय उत्तम योध्दे होते. उत्तम राज्यकर्ते होते, उत्तम संघटक होते. त्याबरोबरच ते सहिष्णुतावादी होते. अशा विविध गुणांचा समुच्चय शिवरायांच्या अंगी होते. आज त्यांचा एक गुण म्हणजे आम्हाला जीवन जगण्यासाठी मार्गदर्शन करणारी गोष्ट आहे. शिवरायांना फक्त मध्ययुगापुरते मर्यादित न ठेवता त्यांचे जीवनकार्य त्यांचे व्यक्तिमत्व आधुनिक काळाला आजच्या विज्ञानयुगात सुध्दा प्रेरणादायी ठरत असते. शिवरायांचा कार्यकाळ जरी मध्ययुगामध्ये झालेला असला तरी आज त्यांच्या कार्याची दखल आधुनिक काळाला घ्यावीच लागेल.

छत्रपती शिवरायांत जे विविध गुण होते त्यापैकी एक गुण म्हणजे त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन होय. या वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग करुन आपल्या स्वराज्याला उभारणी दिली. स्वराज्य उभारणीत या गुणांचा उपयोग करुन घेतला. वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग करुन स्वराज्याचे रुपांतर सुराज्यात केले. याचा या प्रबंधात शोध घेण्यात आलेला आहे. आधुनिक काळात शिवरायांचे कार्य सर्वांना समजले पाहिजे. शिवराय फक्त योध्दे नव्हते ते उत्तम प्रशासक होते, उत्तम पर्यावरणवादी होते हे समोर यावे म्हणून या प्रबंधात याचा उल्लेख करण्यात आलेला आहे. शिवराय फक्त लढणारे सेनापती नव्हते तर त्याबरोबरच ते एक उत्तम विज्ञानवादी दृष्टि असणारे व्यक्तिमत्व होते हे सिध्द होते. कारण समाजाचा इतिहासाकडे पाहण्याचा दृष्टिकोन पूर्वग्रहदूषित आहे. इतिहासाकडे भूतकालीन घटना एवढयापुरते पाहिले जाते. पण मध्ययुगीन काळातील राजे आणि त्यांनी अवलंबविलेल्या गोष्टी आजच्या काळाला अनुसरुन होत्या हे शिवरायांचे व्यक्तिमत्व पाहिल्यावर दिसून येते. आजच्या आधुनिक काळात शिवरायांच्या व्यक्तिमत्वातील इतर गुणांचा सुध्दा अभ्यास होणे आवश्यक आहे म्हणून युध्द, लढाया व्यतिरिक्त असलेला त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन या गुणांचा विचार करुन त्यावर प्रबंध सादर केलेले आहे. राजे, महाराजांना युध्द, लढाया यात बंदिस्त न करता त्यांच्या लोकोपयोगी गोष्टीचा विचार करण्यात

आला आहे. त्यात शिवरायांचे विविध गुण दिसतात त्यात त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन या गुणांची निवड करुन त्याचे विविध कंगोरे अभ्यासण्याचा प्रयत्न या प्रबंधात करण्यात आला आहे. शिवरायांच्या स्वराज्य उभारणीत जेवढया प्रमाणात युध्द कौशल्याची साथ होती. तेवढयाच प्रमाणात त्यांच्या वैज्ञानिक दृष्टिकोनाची दखल घ्यावी लागेल.

**संशोधनाची उद्दिष्टे :-**

प्रस्तुत शोधप्रबंधात -

1) छत्रपती शिवाजी महाराजांनी वैज्ञानिक दृष्टिचा स्वराज्यासाठी कसा उपयोग केला याचा अभ्यास या प्रबंधात घेण्यात आला.
2) छत्रपती शिवाजी महाराजांचे राज्य लहान असूनही संसाधने कमी असूनही प्रबळ शत्रूंना आपल्या विज्ञानवादी दृष्टिकोनामुळे कसे तोंड देऊ शकले याचा अभ्यास करण्यात आला.
3) छत्रपती शिवाजी महाराजांनी आधुनिक विचाराचा कसा अंगीकार केला याचा आढावा घेण्यात आला.
4) परंपरागत रुढी, परंपरा नाकारुन सामाजिक समन्वय साधण्याचा प्रयत्न कसा केला याची माहिती घेण्यात आली.
5) शिवरायांच्या वैज्ञानिक दृष्टिची आजची प्रासंगिकता काय आहे याचा शोध घेण्यात आला.
6) शिवरायांच्या जीवनचरित्राचा संक्षेप आढावा घेण्यात आला.
7) शिवरायांनी गड, किल्ले उभारत असतांना किल्ल्याचे बांधकाम करीत असतांना वैज्ञानिक दृष्टिकोनाचा कसा उपयोग केला याचा आढावा घेण्यात आलेला आहे.
8) शिवरायांनी युध्दशास्त्राचा उपयोग करतांना त्यात वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग करुन युध्दशास्त्रात प्राविण्य मिळविले त्याची चिकित्सा करण्यात आली आहे.
9) संदेशवहनासाठी विविध धुरांचा वापर करतांना त्यात वापरल्या जाणाऱ्या लाकडाच्या गुणधर्माची चिकित्सा केलेली आहे.

10) रयतेचा आर्थिक विकास करण्यासाठी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा कसा उपयोग केला याची चिकित्सा केली आहे.

11) सामाजिक क्षेत्रात शिवरायांनी दाखविलेला वैज्ञानिक दृष्टिकोन अभ्यासण्यात आला आहे.

12) धार्मिक क्षेत्रातील शिवरायांची सहिष्णुता अभ्यासून त्यातील वैज्ञानिक दृष्टिकोनाची चिकित्सा केली आहे.

13) शिवराय एक मानसशास्त्रज्ञ होते ते या प्रबंधातून सिध्द केलेले आहे. त्यांचा मानसशास्त्राचा अभ्यास परिपूर्ण होता हे सिध्द होते.

**गृहितके :-**

1) छत्रपती शिवाजी महाराजांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा वापर करुन आदर्श राज्याची निर्मिती केली.

2) छत्रपती शिवराय वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या आधारे शत्रूंना तोंड देऊ शकले.

3) छत्रपती शिवरायांनी वैज्ञानिक दृष्टिकोनातूनच व्यापार, शेती व उद्योगधंद्यांना प्रोत्साहन दिले.

4) छत्रपती शिवरायांनी विदेशी कंपन्यांचा धोका ओळखून आरमाराची निर्मिती करुन आपणही सागरी क्षेत्रात कमी नाही हे दाखवून दिले.

5) छत्रपती शिवाजी महाराजाचा स्थापत्य निर्मितीमध्येही विशेषत: दुर्गनिर्मितीमध्ये वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

6) छत्रपती शिवरायांनी आधुनिक विचारसरणीच्या आधारे सामाजिक समन्वय साधण्याचा प्रयत्न केला.

7) शत्रूच्या मनात धडकी आणि आपल्या सैन्याच्या मनात विश्वास निर्माण करण्यासाठी मानसशास्त्राचा उपयोग केला.

**संशोधनाचे अभ्यास क्षेत्र -**

सदरील संशोधनाच्या अभ्यास क्षेत्रामध्ये छत्रपती शिवाजी महाराजांचा वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या विविध अंगाचा अभ्यास करण्यात आला आहे. शिवाजी महाराजांनी आपल्या स्वराज्याची उभारणी करीत असताना विविध कार्य कौशल्याचा उपयोग करीत असताना वैज्ञानिक दृष्टिकोनाचा कसा वापर केला. याचा आढावा घेण्यात आला आहे. मध्ययुगीन काळात वावरत असताना सुध्दा विविध रुढी, परंपरा, अंधश्रध्दा यांचा परिणाम आपल्या स्वराज्याच्या कारभारावर न होऊ देता वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग करुन आपल्या प्रजेला सुखी समाधानी केले याचा चिकित्सक अभ्यास करण्याचा प्रामाणिक प्रयत्न प्रस्तुत संशोधनातून करण्यात आले आहे.

**तथ्य संकलन पध्दती :-**

प्रस्तुतच्या शोधप्रबंधाच्या तथ्य संकलनासाठी नूतन महाविद्यालय सेलू चे सहकार्य लाभले तसेच स्वामी रामानंद तीर्थ हिंदी-मराठी ग्रंथालय सेलू, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड येथील मध्यवर्ती ग्रंथालयातून साहित्य संकलन केले. नूतन विद्यालय सेलू, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ औरंगाबाद, शिवाजी महाविद्यालय परभणी, स्व.नितीन कला, विज्ञ ाान महाविद्यालय पाथरी जि.परभणी अशा अनेक ग्रंथालय केंद्रातून संशोधनाशी संबंधित ग्रंथ संकलित केले. तत्कालीन मासिके, दैनिके, साप्ताहिके इत्यादीचे संकलन करुन प्रस्तुत शोधप्रबंधाचे लेखन केले आहे.

**संशोधन पध्दती -**

प्रस्तुत विषयाचे संशोधन करण्यासाठी संदर्भ पध्दती आणि ऐतिहासिक संशोधन पध्दती या संशोधन पध्दतीचा उपयोग केला आहे. हा शोधनिबंध लिहिण्यासाठी प्राथमिक आणि दुय्यम साधन सामुग्रीचा आधार घेण्यात आला आहे. प्राथमिक साधनात छत्रपती शिवरायांच्या समकालीन लिहिलेले ग्रंथ आणि दुय्यम साधनात शिवरायांच्या नंतर लिहिलेल्या काळातील ग्रंथ यांचा समावेश होतो. प्रस्तुत शोधप्रबंध हा व्यक्तिविशेष आहे. त्यामुळे या शोधप्रबंधाचे संशोधन वर्णनात्मक,

विश्लेषणात्मक, तौलनिक व निदानात्मक पध्दतीने केलेले आहे. हया शोध प्रबंधाची मांडणी सहा प्रकरणांमध्ये केली असून शेवटी संदर्भ ग्रंथाची यादी आणि परिशिष्टे दिलेली आहेत.

**साहित्य परिक्षण -**

हा शोधनिबंध लिहिण्यासाठी प्राथमिक आणि दुय्यम साधनसामुग्रीचा आधार घेण्यात आला आहे. प्राथमिक साधनांमध्ये

1)कवी परमानंद - शिवभारत (2) जयराम पिंडये - राधामाधव विलास चंपू (3) धुंडीराज लक्ष्मण व्यास - राजव्यवहार कोष (4) छत्रपती संभाजी - बुधभूषणम यांचा समावेश होतो तर दुय्यम साधनात 1) वां.सि. बेंद्रे - छत्रपती शिवाजी महाराज विकित्सक चरित्र (पुर्वार्ध) (2) संपादक अ.रा. कुलकर्णी, ग.ह. खरे - मराठयांचा इतिहास खंड-1 (3) कै.न्यायमुर्ती महादेव रानडे - Rise of the Maratha Power (4) गोविंद सखाराम सरदेसाई - मराठे रियासत खंड-1

अशा अनेक साधनांचा संशोधनासाठी वापर करण्यात आला आहे. छत्रपती शिवाजी महाराजाविषयीचे ग्रंथ अशा विविध लेखकांच्या लिखाणाची चिकित्सा प्रस्तुत शोधनिबंधात करण्यात आली आहे.

**प्रकरणांची रुपरेषा -**

**प्रकरण पहिले - प्रस्तावना**

या प्रकरणामध्ये संशोधनाची आवश्यकता, संशोधनाचा आराखडा, संशोधनाची उद्दिष्टे, संशोधनाचे अभ्यास क्षेत्र, संशोधन पध्दती इ. संशोधनाशी संबंधित घटकांची तपशिलवार माहिती पहायला मिळेल. त्याचबरोबर आपला विषय वैज्ञानिक दृष्टिकोनाशी संबंधित असल्यामुळे वैज्ञानिक दृष्टिकोनाची व्याख्या आणि वैशिष्टये दिलेली आहेत.

**प्रकरण दुसरे - जीवनचरित्र एक दृष्टिक्षेप**

या प्रकरणात छत्रपती शिवाजी महाराज यांचे संक्षिप्त चरित्र सांगून त्यांच्या कार्य-कर्तृत्वावर दृष्टिक्षेप टाकण्यात आलेला आहे. शिवरायांच्या जन्माच्या वेळेचा सामाजिक, धार्मिक, राजकीय परिस्थितीचा आढावा घेण्यात आला आहे. शिवरायांचे शिक्षण शहाजीराजे भोसले यांच्या नियंत्रणाखाली झाले हे त्यात दाखविले आहे. शिवरायांच्या स्वराज्याच्या शपथेपासून ते त्यांच्या जीवनातील ठळक घडामोडीचा वेध घेण्यात आला आहे. त्यांनी घेतलेली शपथ स्वत:स राज्याभिषेक करवून घेऊन कसे पूर्ण केले हे दाखविले आहे.

**प्रकरण तिसरे - स्थापत्यशास्त्रातील वैज्ञानिक दृष्टिकोन**

छत्रपती शिवाजी महाराजांनी मध्ययुगीन काळात किल्ल्याचे महत्व ओळखले होते म्हणून त्यांनी अधिकाधिक किल्ले जिंकण्याचा निर्धार केला. नुसते किल्ले जिंकून थांबले नाहीत तर त्या अर्धवट अवस्थेत असलेल्या किल्ल्यांची पुनर्बांधणी केली आणि त्या बांधकामात वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग केल्याची माहिती या प्रकरणात देण्यात आलेली आहे. मध्ययुगात वावरत असून सुध्दा शिवरायांकडे कसे आधुनिक तंत्रज्ञान होते हे आपल्याला या प्रकरणात दिसून येते. वेळ प्रसंगी परकीय अभियंत्यांची मदत घेऊन आपले गडकोट परिपूर्ण बांधून घेतल्याची माहिती या प्रकरणातून दिसून येते. किल्ले हे आपले संरक्षक असले पाहिजे असा शिवरायांचा दृष्टिकोन होता हे सिध्द होते.

**प्रकरण चौथे - युध्दशास्त्र आणि संदेशवहनातील वैज्ञानिक दृष्टिकोन :-**

या प्रकरणात शिवरायांनी युध्दकौशल्यात आणि संदेशवहनात वापरलेल्या विविध तंत्राचा उपयोग केला. याचा आढावा घेण्यात आला आहे. परंपरागत युध्दतंत्राचा उपयोग न करता आधुनिक युध्द कौशल्याचा शिवरायांनी उपयोग केला आणि त्यात विज्ञान आणि तंत्रज्ञानाचा उपयोग केला याची चिकित्सा करण्यात आली आहे. तलवारीच्या आकारात योग्य तो बदल करण्यात आला या विषयी माहिती घेण्यात आली. शिवरायांच्या बाबतीत अतिशय सर्वांच्या चर्चेचा

विषय म्हणजे भवानी तलवार या भवानी तलवारीच्या बाबतीत यथासांग माहिती देण्यात आली. ही तलवार शिवरायांना भवानीने न देता ही तलवार शिवरायांनी विशिष्ट रक्कम देऊन पोर्तुगीजांकडून विकत घेतली होती. याचा उहापोह करण्यात आला. तसेच संदेशवहनात शिवरायांनी वेगवेगळ्या प्रसंगी धुरीचा उपयोग केलेला आहे. कोणत्या प्रसंगी कोणता धूर वापरला याची चिकित्सा करुन जाळण्यासाठी विशिष्ट लाकडाचा उपयोग केल्याचे सांगून लाकडाच्या गुणधर्माची चर्चा करण्यात आली आहे.

**प्रकरण पाचवे - आर्थिक, सामाजिक, धार्मिक क्षेत्रातील वैज्ञानिक दृष्टिकोन**

या प्रकरणात छत्रपती शिवरायांनी आर्थिक क्षेत्रात क्रांती करुन वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग केला. हिंदू धर्मातील तथाकथित रुढी परंपरानुसार समुद्रावर प्रवास करणे निषिध्द समजल्या जायचे. परंतु शिवरायांनी या अंधश्रध्देचा विचार न करता समुद्रावर प्रवास करुन कोकणातील शेतकऱ्यांसाठी मिठागरे निर्माण करुन शेतकऱ्यांना जोड व्यवसाय करुन दिले. याचा आढावा या प्रकरणात घेण्यात आला आहे.

सामाजिक क्षेत्रात शिवरायांनी केलेली क्रांती या प्रकरणात विश्लेषण करण्यात आलेली आहे. मध्ययुगीन काळात समाजावर अंधश्रध्देचा प्रचंड पगडा होता म्हणून भेदभाव करण्याची एक परंपरा निर्माण झालेली होती. विशिष्ट लोकांना मान, सन्मान देणे तर विशिष्ट लोकांचा अपमान करणे अशी पध्दत होती. परंतु शिवरायांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग करुन सामाजिक क्षेत्रात समता प्रस्थापित केली. याची चिकित्सा या घटकात करण्यात आली आहे.

शिवरायांच्या राज्याच्या अवती-भोवती मुस्लिमांची राज्ये होती. त्यामुळे त्यांच्याशी संपर्क येणे, संबंध येणे अपरिहार्य होते. यातूनच सत्तेसाठी संघर्ष निर्माण झाले. परंतु शिवराय सहिष्णुतावादी होते. सहिष्णुतेचा उपयोग करुन शिवरायांनी धार्मिक द्वेष निर्माण होऊ दिला नाही. यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो. राजकीय संघर्षाला धार्मिक संघर्षाचे रुप शिवरायांनी येऊ दिले नाही. याची चिकित्सा या प्रकरणात करण्यात आली आहे. यातून शिवरायांचा सर्वधर्म समभाव दिसून येतो. याचा आढावा या प्रकरणात घेण्यात आला आहे.

**प्रकरण सहावे - शिवाजी महाराज आणि मानसशास्त्र**

या प्रकरणात शिवरायांचा मानसशास्त्राचा असणारा अभ्यास अभ्यासण्यात आला आहे. यातून शिवराय उत्तम मानसशास्त्रज्ञ होते हे सिध्द होते कारण शत्रूच्या मनात भिती आणि स्वपक्षातील सैनिकांच्या मनात विश्वास निर्माण करण्यासाठी शिवरायांनी मानसशास्त्राचा यथोचित उपयोग करुन घेतल्याची चर्चा या घटकात करण्यात आली आहे. याबरोबरच शिवराय एक उत्तम समुपदेशक होते याचाही चिकित्सा या प्रकरणात करण्यात आली आहे.

**प्रकरण सातवे - निष्कर्ष :- उपसंहार**

छत्रपती शिवाजी महाराजांचा वैज्ञानिक दृष्टिकोन एक चिकित्सक अभ्यास या शोधप्रबंधातील एकूणच प्रकरणातून छत्रपती शिवाजी महाराजांच्या वैज्ञानिक दृष्टिकोनाचा आलेख निर्देशित करुन छत्रपती शिवरायांनी मध्ययुगात वावरत असतांना मध्ययुगातील अंधश्रध्देचा त्याग करुन आधुनिक विचारसारणीचा स्वीकार केला. आपल्या स्वराज्य उभारणीत विज्ञान आणि तंत्रज्ञानाचा वापर करुन आपले स्वराज्य कार्यक्षम बनवले. मग स्थापत्यशास्त्र असो, युध्दशास्त्र असो किंवा संदेशवहन असो या सर्वच क्षेत्रात शिवरायांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा वापर केल्याची चिकित्सा एकंदरीत या प्रबंधात करण्यात आली आहे.

**संशोधनाचे निष्कर्ष :**

१. तथाकथित हिंदूधर्मानूसार समुद्रावर प्रवास करणे निषिध्द होते. तेंव्हा शिवरायांनी या अंधश्रध्देचा त्याग करुन समुद्रावर विविध किल्ले निर्माण केले.

२. विविध किल्ल्यांचे बांधकाम करीत असतांना शिवरायांनी स्थापत्य शास्त्राचा उपयोग करुन त्यात वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग केलेला आहे.

   उदा. सिंधुदुर्ग किल्ल्यांचे बांधकाम करीत असतांना त्या किल्ल्याचे बांधकाम मजबूत व्हावे म्हणून पाच खंडी शिसे ओतले. यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

३. संदेश वहनासाठी शिवरायांनी वेगवेगळ्या धूरांचा उपयोग केला. जसे उदा. पांढरा धूर, काळा धूर

स्वराज्याच्या जमेची बाजू असल्यास पांढरा धूर सोडला जाई. आणि काही दु:खाची गोष्टी असल्यास काळा धूर सोडला जाई.

४. तथाकथित हिंदूधर्मानुसार व्यक्ती धर्म सोडला की, ती व्यक्ती मरते अशी विचारसरणी होती. परंतू शिवराय या अंधश्रध्देला बळी पडले नाहीत. उलट या अंधश्रध्देचा त्याग करुन मुस्लिम धर्मात गेलेल्यांना पुन्हा हिंदू धर्मात घेतले.

उदा. नेताजी पालकर, बजाजी निंबाळकर, यांना पुन्हा हिंदू धर्मात घेतले.

५. 'मुल पालथे जन्मणे' हे अशुभ मानले जाते राजाराम महाराज पालथे जन्माला आले. सर्वजण ते पाहून गप्प बसले. पुत्र जन्माचा आनंद कुणी दाखविना. महाराजांना हे समजले ते म्हणाले, 'पुत्र पालथा जन्मला, तो दिल्लीची पातशाही पालथी घालेल' सगळे आनंद व्यक्त करु लागले.

६. शहाजी राजेंचा जेंव्हा मृत्यू झाला तेंव्हा राजामाता जिजाऊंना सती जाऊ दिले नाही.

७. स्वत:च्या आचरणाने अंधश्रध्दा, अनिष्ट रुढी परंपरा याचा त्याग केला.

८. समुद्र पर्यटन करणे निषिद समजल्या जाणाऱ्या काळात शिवरायांनी समुद्रावर व्यापार उद्योगाला सुरुवात केली.

९. शेतकऱ्यांना पर्यावरणाचे महत्त्व समजावून सांगितले. ' झाडे लावा- झाडे जगवा ' हा संदेश दिला.

१०. आजही समाजात बऱ्याच अंशी अमावस्येला अंधश्रध्दा समजून नविन कामे करीत नाहीत. परंतू शिवरायांनी आपली अनेक आक्रमणे आमावस्येच्या रात्री केली. यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

११. शिवरायांनी समुद्र प्रवासाला अंधश्रध्दा न मानता समुद्रावर विविध उद्योग धंदे उभारुन आर्थिक विकास घडवून आणला.

१२. विविध अंधश्रध्दा, वाईट रुढी परंपरा, याचा त्याग करुन सर्वांना समानतेची वागणूक दिली. यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

१३. शिवरायांच्या अवती-भोवती मुस्लिमांची राज्ये होती. परंतू शिवरायांनी राजकीय लढाईला धार्मिक लढाईचे स्वरुप येऊ दिले नाही. यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

१४. शिवरायांनी मानसशास्त्राचा चांगला अभ्यास होता. म्हणून त्यांनी मानसशास्त्राद्वारे शत्रूच्या मनात धडकी तर आपल्या सैन्याच्या मनात विश्वास निर्माण केला.

१५. पाण्याच्या व्यवस्थापणाबाबत 'पाणी आडवा पाणी जिरवा' हे धोरण राबवून शिवरायांनी पाणी बचतीचा मौलिक संदेश रयतेला दिला.

## संदर्भ ग्रंथ


1. कुलकर्णी अ.रा. - शिवकालीन महाराष्ट्र, राजहंस प्रकाशन, पुणे
2. केळकर न.चिं. - मराठे व इंग्रज, श्री प्रिंटींग एजन्सी, पुणे
3. ढेरे रा.चिं. - आज्ञापत्र, रामचंद्र पंत अमात्य, पद्मगंधा प्रकाशन, पुणे
4. देशपांडे प्र.न. - छत्रपती शिवाजी महाराजांची पत्रे, सुषमा प्रकाशन, पुणे
5. दिवेकर स.म. - परमानंदकृत श्री शिवभारत, शब्दवेध प्रकाशन, पुणे
6. पगडी सेतू माधवराव - मोगल-मराठा संघर्ष, फारसी साधने चित्रशाळा प्रेस प्रकाशन, पुणे
7. पाटणकर रा.भा. - अपूर्व क्रांती, मौज प्रकाशन, पुणे
8. पिर्सुळेंकर पा.स. - पोर्तुगीज-मराठे संबंध, पुणे 1960
9. फडणीस सी.वा. - शिवकालीन पत्रसार संग्रह
10. राजवाडे वि.का. - मराठयांच्या इतिहासाची साधने, (खंड-22) आत्माराम छापनाखा, धुळे
11. Balkrishna - Shivaji the Great, Bombay vol. IV, 1932
12. Sarkar J.N. - Shivaji and his time, Calcatta 1961, 6th Edition
13. कुलकर्णी अ.रा.(संपा.), खरे ग.ह. (संपा.) - मराठयांचा इतिहास, खंड-1, निर्मिती मंडळ, नागपूर
14. कुलकर्णी अ.रा.(संपा.), खरे ग.ह. (संपा.) - मराठयांचा इतिहास, खंड-2, निर्मिती मंडळ, नागपूर
15. कुलकर्णी अ.रा.(संपा.), खरे ग.ह. (संपा.) - मराठयांचा इतिहास, खंड-3, निर्मिती मंडळ, नागपूर
16. ग्रँट डफ - ए हिस्ट्री ऑफ ए मराठाज एस.एस.एम.एडवर्डस् लंडन

1921

17. रानडे एम.जी. - राईज ऑफ द मराठा पॉवर, मुंबई 1961
18. सरकार यदुनाथ - शिवाजी ॲन्ड हिज टाईम्स,आवृत्ती 6,कलकत्ता 1961
19. बाळकृष्ण - शिवाजी द ग्रेट, तारापोरवाला, मुंबई 1932
20. सरदेसाई गो.स. - मराठी रियासत खंड 1 ते 8 पॉप्युलर प्रकाशन, मुंबई
21. सरदेसाई बी.एन. - मराठयांचा सामाजिक, आर्थिक व सांस्कृतिक इतिहास, फडके प्रकाशन, पुणे
22. पगडी सेतू माधवराव - मराठयाचे स्वातंत्र्ययुध्द
23. चिटणीस कृ.ना. - भारतीय संस्था आणि संकल्पना
24. काळे दि.वी. - छत्रपती शिवाजी महाराज, पुणे विद्यापीठ प्रकाशन, पुणे
25. देशपांडे प्र.न. - मराठी सत्तेचा उदय आणि उत्कर्ष, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे
26. आठवले सदाशिव - शिवाजी व शिवयुग मेहता प्रकाशन, पुणे
27. पवार जयसिंगराव - मराठी साम्राज्याचा उदय आणि अस्त, अजब पुस्तकालय, कोल्हापूर
28. फडणीस सी. वा. - शिवकालीन पत्रासार संग्रह
29. कृष्णाजी अनंत सभासद डॉ.यु.म. पठाण (संपा.) - शिवप्रभुचे चरित्र
30. डॉ.गजानन मेहेंदळे - श्री राजा शिवछत्रपती भाग 1 व 2
31. निनाद बेडेकर - दुर्गकथा पद्मगंधा प्रकाशन, पुणे
32. घाणेकर प्र.के. - साद सहयाद्रीची / भटंकती किल्ल्यांची, स्नेहल प्रकाशन, पुणे

33. गोविंद सखाराम सरदेसाई- (संपादक - स. मा. गर्गे) मराठी रियासत खंड-1 शहाजीराजे भोसले, राज्यकर्ता शिवाजी पॉप्युलर प्रकाशन, मुंबई

34. नरहर कुरुंदकर - छत्रपती शिवाजी महाराज, जीवन रहस्य इंद्रायणी साहित्य प्रकाशन, पुणे-30

35. श्रीमंत शिवाजी कोकाटे - विश्ववंद्य छत्रपती शिवाजी महाराज (शिवचरित्र) जिजाई प्रकाशन, पुणे

36. सेतु माधवराव पगडी - छत्रपती शिवाजी नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया नवी दिल्ली

37. कै.न्यायमूर्ती महादेव रानडे- अनु.नरहर रघुनाथ फाटक Rise of the Maratha Power मराठयांच्या सत्तेचा उत्कर्ष साहित्य आणि संस्कृती मंडळ, महाराष्ट्र राज्य

38. त्र्यंबक शंकर शेजवलकर - श्री शिवछत्रपती संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना आराखडा व साधने 1964 मराठा मंदिर प्रकाशन, डॉ.नायर रोड, मुंबई-8

39. डॉ.ज्ञानेश्वर जाधव - छत्रपती शिवाजी महाराज, अक्षर पब्लिकेशन, औरंगाबाद

40. प्रा.अशोक राणा - छत्रपती शिवराय, पंचफुला प्रकाशन, औरंगाबाद

41. पि.जी. जोशी - मराठयाचा इतिहास नंदादिप प्रकाशन, नांदेड

42. डॉ.गिरीश जाखोटिया - छत्रपती शिवाजी महाराज, व्यवस्थापन गुरु आणि व्युहरचनाकार, साकेत प्रकाशन औरंगाबाद

43. प्रा.बी.एन. सावंत प्रा.व्हि.के. जाधव - मराठयांचा प्रशासकीय, सामाजिक व आर्थिक इतिहास विद्या प्रकाशन, नागपूर

44. प्रा.मा.म.देशमूख - शिवशाही, शिवभारती प्रकाशन, नागपुर पहिली आवृत्ती 1998

45. डॉ.मोहिनी कडू - || शिवचरित्र || लाखे प्रकाशन, नागपुर
46. डॉ.जयसिंगराव पवार - छत्रपती शिवाजी महाराज, अरुंधती प्रकाशन, कोल्हापूर
47. गुरुवर्य कृष्णराव अर्जुन केळूसकर - छत्रपती शिवाजी महाराज, वरदा प्रकाशन, पुणे
48. डॉ.प्रभाकर देव - इतिहासशास्त्र, संशोधन, अध्यापन आणि लेखनपरंपरा ब्रेन टॉनिक प्रकाशन गृह, नाशिक
49. कॅ.राजा लिमये - रणराज शिवाजी, दिलीपराज प्रकाशन प्रा.लि. पुणे
50. गोविंद पानसरे - शिवाजी कोण होता ? लोकवाङमय गृह, मुंबई
51. प्रबोधनकार ठाकरे - दगलबाज शिवाजी, नवता बुक वर्ल्ड, 602 आदित्य अपार्टमेंट, आशानगर, कांदिवली, मुंबई
52. डॉ.द.ग. देशपांडे - महाराष्ट्रातील किल्ले, डायमंड पब्लिकेशन्स, पुणे
53. स.आ. जोगळेकर - सहयाद्री, शुभदा - सारस्वत प्रकाशन, पुणे
54. देवळे रा.रा. - महाराष्ट्रातील किल्ले, श्री लेखन प्रकाशन, पुणे

**संशोधक**

**काशिनाथ दत्तराम पल्लेवार**
(एम.ए. इतिहास SET)

**मार्गदर्शक**

**प्रा.डॉ. बोचरे जे. एम.**
(इतिहास विभाग प्रमुख)
स्व.नितीन कला व विज्ञान महाविद्यालय, पाथरी
ता.पाथरी जि.परभणी
रिसर्च गाईड
स्वा.रा.ती.म. विद्यापीठ, नांदेड

# प्रतिज्ञापत्र

मी प्रतिज्ञापूर्वक निवेदन करतो की, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठच्या मानव्य विद्याशाखांतर्गत **इतिहास** विषयातील पीएच.डी. पदवीसाठी सादर केलेला **"छत्रपती शिवाजी महाराजांचा वैज्ञानिक दृष्टिकोन - एक चिकित्सक अभ्यास"** या विषयावरील शोधप्रबंध प्रा.डॉ.जगन्नाथ महादेवराव बोचरे यांच्या मार्गदर्शनाखाली मी स्वतः लिहिलेला असून तो पूर्णतः स्वतंत्र आहे.

सदर प्रबंध अन्य कोणत्याही विद्यापीठ अथवा संस्थेत कोणत्याही पदवीसाठी सादर केलेला नाही.

दिनांक : / /२०१८
ठिकाण : सेलू

**संशोधक**

**काशीनाथ दत्तराम पल्लेवार**

# अनुक्रमणिका

# <u>प्रकरण - पहिले</u>

**प्रस्तावना**

आज आपण २१ व्या शतकात वावरत आहोत. २१ वे शतक हे विज्ञान आणि तंत्रज्ञानाचे शतक म्हणून ओळखल्या जाते.विज्ञान आणि तंत्रज्ञानाच्या माध्यमातून प्रत्येक व्यक्ती आपले भौतिक जीवन सुखी करण्याचा प्रयत्न करतांना दिसून येतो.असेच कार्य सतराव्या शतकात छत्रपती शिवाजी महाराजांनी केलेले दिसून येते. शिवरायांनी विज्ञान आणि तंत्रज्ञानाचा उपयोग करुन आपल्या स्वराज्यातील रयतेला सुखी आणि समृध्द केले.शिवराय हे उत्तम राज्यकर्ते होते.त्यांनी फक्त प्रदेशच जिंकले नाहीत तर त्या प्रदेशात प्रशासन यंत्रणा निर्माण करुन रयतेला सुखी बनविले. हे कार्य करीत असतांना आपल्या अंगी असणाऱ्या वैज्ञानिक दृष्टिकोनाचा पूरेपूर उपयोग शिवरायांनी केलेला आहे.मग ते स्वराज्यातील किल्ले बांधकाम असो,युध्दशास्त्र असो अथवा आरमार उभारणी करण्याचे कार्य असो या सगळ्याच क्षेत्रात त्यांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा वापर केलेला दिसतो.शिवरायाकडे स्वराज्य उभारणीसाठी लागणारी संसाधने खूप कमी होती.अशा वेळी कमी संसाधनातून सुध्दा मोठे कार्य त्यांनी केलेले आहेत. या कार्यात त्यांनी जास्तीत जास्त वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग केलेला आहे.

छत्रपती शिवाजी महाराजांच्या जीवन चरित्रावर आज पर्यंत खूप संशोधन झालेले आहे.त्यांच्या अंगी असणाऱ्या विविध गुणांचा अनेक संशोधकांनी संशोधन केलेले आहे. परंतू दुर्लक्षीत राहिलेल्या त्यांचा एक गुण आहे तो म्हणजे त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन होय.त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन हा घटक घेऊन संशोधन करण्यात आलेले आहे. छत्रपती शिवराय एक उत्तम राज्यकर्ते होते. त्यांच्या अंगी अनेक गुण होते. त्यात सहिष्णुता,स्त्रीविषयक निर्मळ दृष्टिकोन, संघटक, सच्चा साथी, दिलदार मित्र असे गुण होते. शिवरायांकडे संसाधने कमी होती. शत्रू बलाढ्य होते. परंतु शिवरायांच्या अंगी जे काही गुण होते. त्या गुणामुळे ते या संकटावर आणि अडचणीवर मात करुन यशस्वी ठरले. मागे आपण वैज्ञानिक दृष्टिकोनाची वैशिष्ट्ये पाहिली. त्यातून छत्रपती

शिवरायाच्या अंगी असलेल्या हा वैज्ञानिक दृष्टिकोनाची कल्पना येते. आज आपण २१ व्या शतकात वावरत आहोत. सकाळी उठल्यापासून ते रात्री झोपेपर्यंत विज्ञानाच्या मदती शिवायजीवन जगणे अशक्य झालेलेआहे. परंतु १७ व्या शतकात छत्रपती शिवाजी महाराजांनी वैज्ञानिक दृष्टिकोन बाळगणे आणि त्या गुणांच्या आधारे आपल्या स्वराज्याचे संवर्धन केले. मध्ययुगीत काळ हा अज्ञान आणि अंधकाराने भरलेला होता. प्रत्येक व्यक्तीवर अंधश्रध्देचा प्रचंड पगडा होता. अशा काळात अंधश्रध्दा झिडकारणे सोपे नव्हते. परंतु ते धाडस छत्रपती शिवरायांनी केलेले होते.छत्रपती शिवरायांच्या वैज्ञानिक दृष्टिकोनाचा मागोवा घेत असतांना त्याची बिजे केंव्हा रोवली गेली. हे विचारात घेत असतांना असे लक्षात येते की, छत्रपती शिवराय जेंव्हा बंगळूरहून पुण्याला आले तेंव्हा पुणे ओसाड झाले होते. शत्रू पक्षाने पुणे बेचिराख करुन टाकले होते. आदिलशाहाच्या सरदाराने पुणे बेचिराख करुन पुणे गावावरुन गाढवाचा नांगर फिरविला आणि सगळ्यांना बजावून सांगितले. जो कोणी या ठिकाणी वस्ती करेल त्यांचा निर्वंश होईल. परंतु राजामाता जिजाऊनी हे आव्हान स्वीकारले आणि त्या निर्जन स्थळी वस्ती केली. यातून जिजाऊंचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो. हाच वैज्ञानिक दृष्टिकोन शिवरायांनी आयुष्यभर अंगिकारलेला दिसतो.

छत्रपती शिवरायांनी आपल्या वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग करुन तत्कालीन शत्रूंना नामोहरम केले. वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या आधारे शत्रूपक्षात भिती आणि स्वपक्षात विश्वास निर्माण करण्याचे महत्वाचे कार्य शिवरायांनी केले आणि या गुणांचा उपयोग त्यांना पुढे आयुष्यभरासाठी झाला. शिवरायांच्या वैज्ञानिक दृष्टिकोन या गुणाकडे आतापर्यंत दुर्लक्ष करण्यात आले होते. म्हणून मी या प्रबंधातून त्यांच्या वैज्ञानिक दृष्टिकोनाचा परामर्श घेण्याचा प्रयत्न केलेला आहे. शिवरायांना फक्त लढाया आणि युध्द एवढ्या पुरते मर्यादित न ठेवता त्यांच्या इतर गुण कौशल्याचा विचार करण्यातआला आहे.

आज आपण विज्ञान युगात वावरत आहोत. विज्ञानयुगात वावरणाऱ्या विज्ञानवादी व्यक्तींना शिवराय सुध्दा तितकेच विज्ञानवादी वाटले पाहिजे असा प्रयत्न या शोधप्रबंधातून

करण्यात आला आहे. वैज्ञानिक दृष्टिकोनाची जी विविध वैशिष्ट्ये आहेत. त्या वैशिष्ट्यात शिवरायांचा वैज्ञानिक दृष्टिकोन तंतोतंत बसलेला दिसून येतो. या वैज्ञानिक दृष्टिकोनात १) चिकित्सक वृत्ती २) शब्द प्रामाण्यास नकार ३) पूर्वग्रहाचा अभाव ४) वस्तुनिष्ठता ५) प्रत्यक्ष अनुभूती होय. शिवरायांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा अवलंब करीत असतांना उपरोक्त गोष्टीचा तंतोतंत विचार केलेला आहे. त्यातून त्यांची चिकित्सक वृत्ती दिसून येते प्रत्येक प्रसंगात प्रत्येक घटनेत शिवरायांनी घेतलेले निर्णय वैज्ञानिक दृष्टिकोनावर आधारित होते. शिवरायांनी स्थापत्य शास्त्रात केलेले प्रयोग असतील किंवा युध्दशास्त्र आणि संदेशवहानातील प्रयोग असतील किंवा आर्थिक, सामाजिक, धार्मिक क्षेत्र असो यात शिवरायांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

छत्रपती शिवाजी महाराज धर्म मानणारे होते . परंतू त्यांच्या धर्म मानण्यात अंधश्रध्दा नव्हती. धर्मासाठी माणूस नसून माणसासाठी धर्म आहे. अशी त्यांची विचारसरणी होती. शिवरायांनी राजकीय संघर्षाला धार्मिक संघर्षाचे स्वरुप कधीच येऊ दिले नाही.तत्कालीन हिंदू धर्मानुसार एखादा व्यक्ती धर्म बदलला तर तो मेल्यासमान आहे अशी धारणा होती. परंतू शिवरायांनी या विचार सरणीला मूठमाती दिल्याचे दिसून येते. नेताजी पालकर आणि बजाजी निंबाळकर हिंदू धर्म सोडून मुस्लिम धर्मात गेले होते. त्यांना पुन्हा हिंदू धर्मात घेणे शिवरायांना आवश्यक वाटू लागले. तेंव्हा शिवरायांनी अंधश्रध्देला बळी न पडता नेताजी पालकरला आणि बजाजी निबांळकरांना पुन्हा हिंदू धर्मात घेतले. एवढेच नाही तर बजाजी निंबाळकरांशी सोयरसंबध जोडले. यातून छत्रपती शिवाजी महाराजांचा धार्मिक क्षेत्रातील वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.[१]

शिवराय स्वतःअंधश्रदा पाळत नसत म्हणूनच रयतेला या गोष्टीचे महत्त्व वाटत होते. 'आधी केले मग सांगितले' या संत वचनाप्रमाणे शिवराय वागत होते मुलं पालथे जन्मणे आपल्याकडे अशुभ मानले जाते. मध्ययुगीन काळात तर अंधश्रध्देचा समाजावर प्रचंड पगडा होता तेंव्हा अशा गोष्टी मानणे स्वाभाविक होते. परंतु शिवरायांनी अंधश्रध्देला अजिबात वाव दिला नाही. हे विविध प्रसंगातून दिसून येते. त्यातील एक प्रसंग आपल्याला उदाहरणादाखल घेता येईल. जेंव्हा

राजाराम महाराज पालथे जन्माला आले तेंव्हा सगळ्यांना ही गोष्टी अशुभ वाटली त्यामुळे पुत्रजन्माचा आनंद कुणीच दाखवित नव्हता. जेंव्हा ही गोष्ट शिवरायांना कळाली तेंव्हा शिवराय म्हणाले, "पुत्र पालथा जन्मला तर तो दिल्लीची पातशाही पालथी घालील" यावरुन शिवरायांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.[२]

शिवरायांना मानसशास्त्राचे उत्तम ज्ञान होते. आपल्या मानसशास्त्र ज्ञानाच्या आधारे त्यांनी शत्रूंच्या शक्तीचा आणि उणिवांचा सखोल अभ्यास केलेला होता. आपली रणनिती ठरविण्याअगोदर शत्रूच्या शक्तीचा अंदाज घेतल्या जात होते. शिवरायांनी आपल्या २९ वर्षाच्या कालखंडात अनेक शत्रुंशी लढा दिला होता. अनेक प्रसंगात त्यांनी मानसशास्त्राचा उपयोग केलेला होता. त्यांनी ज्या प्रकरणात मानसशास्त्राचा पुरेपुर उपयोग केला तो प्रसंग म्हणजे 'अफझलखान वध' होय. अफझलखान हा बलाढ्य शत्रू आहे. यापूर्वी त्यांनी अनेकांना कपटीने संपविले होते याचा इतिहास शिवरायांना माहित होता म्हणून अशा शत्रुंशी लढतांना सजग आणि सतर्क राहणे आवश्यक आहे. ही गोष्ट लक्षात घेऊन शिवरायांनी आपल्या मानसशास्त्राच्या आधारे अफझलखानाचा पाडाव करण्यासाठी वेगवेगळे डावपेच आखण्यास सुरुवात केली. आणि त्यात ते यशस्वी झाले. म्हणून अस म्हणता येईल की, ' अफझलखान वध ' ही घटना म्हणजे शिवरायांच्या निव्वळ मानशास्त्राचा विजय होय.[३]

संरक्षण व्यवस्था ही कोणत्याही देशाचा आत्मा असतो. आपल्या देशात भूदल, वायुदल आणि नौदलच्या माध्यमातून देशातील सीमांचे रक्षण केल्या जाते. मध्ययुगीन काळात तर संरक्षण व्यवस्थेला खुप महत्त्व होते. आजच्या सारखी लोकशाही व्यवस्था तेंव्हा अस्तित्वात नव्हती म्हणून कोणताही राजा कोणत्याही प्रदेशावर केंव्हाही आक्रमण करत असे. त्यामुळे प्रत्येक राजाला शस्त्रांनी सुसज्ज रहावे लागत असे. आपल्या देशात अस्तित्त्वात असलेल्या नौदलाच्या इतिहासाचा मागोवा घेतल्यास तो इतिहास छत्रपती शिवरायांजवळ जाऊन थांबतो. मध्ययुगीन काळात शिवरायांनी नौदल क्षेत्रात अर्थात आरमार उभारणीचे जे कार्य केले ते खूप महत्त्वाचे आहे. कारण

संपूर्ण उत्तर भारतावर मोगलांचे तर दक्षिणेत आदिलशाहीचे राज्य होते. परंतु त्यांनी कधी आरमार उभारणीकडे लक्ष दिले नाही. हे धाडस मात्र छत्रपती शिवरायांनी केलेले आहे. तत्कालीन हिंदू धर्मानुसार समुद्र ओलांडणे, समुद्रावर प्रवास करणे निषिध्द समजल्या जात होते. अशा काळात शिवरायांनी हे धाडस केलेले दिसून येते. यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसतो. आजच्या काळात सुध्दा आपण आरमाराचे महत्त्व नाकारु शकत नाही. नौदलाचे महत्त्व नाकारु शकत नाही. २६ नोंव्हेबर २००८ रोजी पाकिस्तानातून सागरी मार्गाने आलेल्या दहा अतिरेक्यांनी मुंबईवर हल्ला करुन २०० पेक्षा जास्त निष्पाप लोकांचे बळी घेतले. यावरुन आपण सागरी सरंक्षणाला महत्त्व दिले पाहिजे ही शिवरायांची दूरदृष्टी आपल्याला दिसून येते. शिवरायांनी उभारलेले आरमार पेशव्यांच्या काळात नष्ट झाले शिवरायांनी खूप कष्टाने हे आरमार उभारलेले होते.या शिवरायांच्या आरमाराविषयी नरहर कुरुंदकर म्हणतात- "मराठ्यांनी जर आरमाराचा काळजी पुर्वक वापर केला असता तर भारतावर सत्ता मिळविणे इंग्रजांना शक्य झाले नसते." यावरुन शिवरायांचे आरमार उभारणीतील योगदान लक्षात येते.[४]

शिवराय उत्तम अर्थतज्ञ होते .त्यांनी आपल्या अर्थनिती द्वारे स्वराज्याला आर्थिक दृष्ट्या सक्षम केले. राज्य जर आर्थिक दृष्ट्या सक्षम असेल तरच ते रयतेला योग्य सोयी सुविधा देऊ शकते. त्याचबरोबर परकीय शत्रुंशी सुध्दा सामना करु शकते. म्हणून शिवरायांनी आपल्या राज्यातील लघुउद्योग धंद्याला खुप महत्त्व दिले. त्यातील मिठाच्या उद्योगाचे उदारण आपल्याला घेता येईल. १९ व्या शतकात जर्मन राष्ट्रांनी आपल्या देशातील उद्योग व्यवसायाला सरंक्षण देण्यासाठी 'सरंक्षण धोरणाचा' उपयोग केलेला होता. तोच प्रयोग शिवरायांनी १७ व्या शतकात केलेला आहे. यावरुन शिवराय काळाच्या पुढे जाऊन विचार करणारे होते हे सिध्द होते. आपल्या देशात आलेल्या परकीय मालाला जर्मनींनी जबर कर बसवून आपल्या देशातील उद्योगाचे सरंक्षण केले होते. तसाच प्रयोग शिवरायांनी आपल्या स्वराज्यात केलेला होता. यावरुन शिवराय उत्तम अर्थतज्ञ होते हे सिध्द होते.[५]

शिवराय व्यवस्थापन कौशल्यात निपुण होते. आपल्या २९ वर्षाच्या कालखंडात त्यांना अनेक संकटांशी सामना करावा लागला. अनेक शत्रूंशी लढावे लागले. अनेक ठिकाणी धोक्याचे प्रसंग निर्माण झाले होते. परंतु शिवराय आपल्या नियोजन कौशल्याच्या बळावर ते त्या विविध संकटातून मार्ग काढले. असे म्हटल्या जाते की, कोणतेही कार्य यशस्वी होण्यासाठी ९९ टक्के नियोजन तर एक टक्के कष्ट करावे लागते. असेच नियोजन शिवरायांचे होते. म्हणून त्यांनी प्रसंग कोणताही असो संकट कोणतेही असो त्यातुन त्यांनी मार्गच काढला. मग ते अफझलखान वध प्रकरण असेल, पुरंदरचा तह असेल, आग्र्याहून सुटका असेल, सुरतेवरील स्वारी असेल अशा सगळ्याच संकटातून त्यांनी सहीसलामत मार्ग काढला होता. म्हणूनच त्यांना डॉ. गिरीश प. जाखोटिया 'व्यवस्थापन गुरु आणि व्यूहरचनाकार' म्हणतात यावरुन शिवरायांचे यश हे त्यांच्या नियोजन (Planning) कौशल्यात दडलेले होते हे सिध्द होते.[६]

शिवरायांचा लढा हा राजकीय लढा होता. तो धार्मिक लढा नव्हता. त्यांच्या सैन्यात विविध जाती धर्माचे सैनिक होते. त्यांनी सर्व सैनिकांना समानतेची वागणूक दिली. शिवरायांच्या अवती-भोवती असणारी राज्ये ही मुस्लिम धर्मिय होती. परंतु त्यांनी राजकीय लढाईला धार्मिक लढाईचे स्वरुप येऊ दिले नाही. म्हणून अनेक मुस्लिम सैनिक शिवरायांच्या लष्करात इनामे - इतबारे नोकरी करीत होते. त्यात शिवरायांचे अंगरक्षक म्हणून अनेक मुस्लिम सैनिक होते. त्यात सिद्दि इब्राहिम हे प्रमुख होते तर काझी हैदर हे शिवरायांचे वकील म्हणून कार्य करीत होते. तसेच दैलतखान हे आरमाराचे प्रमुख तर इब्राहिमखान हे तोफखाना प्रमुख होते. मौनीबाबा आणी बाबा याकूत हे मुस्लिम संत शिवरायांचे हितचिंतक होते.

यावरुन शिवराय सहिष्णु वृत्तीचे असून सर्व धर्मांना समान मानणार होते म्हणूनच अनेक मुस्लिम त्यांच्या या स्वराज्याच्या उभारणीच्या कार्यात सहभागी झाले होते. आजच्या भाषेत सांगायचे झाल्यास त्यांचे धोरण धर्मनिरपेक्षतेचे होते असे म्हणता येईल.[७]

शिवरायांना स्थापत्य शास्त्राचे उत्तम ज्ञान होते. शिवरायांनी ५० वर्षाच्या आयुष्यात ३५ वर्ष प्रत्यक्ष राज्यकारभार करीत असतांना आपल्या किल्ले बांधकामातील स्थापत्याकडे विषेश लक्ष दिले. नवे जुने मिळून शिवरायांकडे ३६० किल्ले होते. हिरोजी इंदलकर या अभियांत्याच्या सहकार्याने शिवरायांनी अनेक किल्ल्यांचे बांधकाम केले. काही किल्ले अर्धवट अवस्थेत होते त्या किल्ल्यांची डागडूजी करुन त्या बांधकामात वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग केला. तर अनेक नविन किल्ल्यांचे बांधकाम करुन त्यात विज्ञान आणि तंत्रज्ञानाचा पुरेपुर उपयोग केला. आज आपण २१ व्या शतकात विज्ञान तंत्रज्ञानाच्या विकासाची गोष्ट करतो. परंतु १७ व्या शतकात शिवरायांनी विज्ञान आणि तंत्रज्ञान वापरून जे बांधकाम केलेले आहे त्याला इतिहासात तोड नाही. त्यात राजगड आणि रायगड किल्याचे बांधकाम असेल किंवा सिंधुदुर्ग विजयदुर्ग किल्याचे बांधकाम असेल. त्या प्रत्येक किल्यात वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग केलेला आहे. सिंधुदुर्ग किल्याचे बांधकाम मजबूत व्हावे म्हणून त्यात पाच खंडी शिसे ओतले होते. यावरुन शिवराय विज्ञानाचे जाणते असून एक उत्तम अभियंते होते हे सिध्द होते. [८]

आज आधुनिक काळात क्षणोक्षणी विज्ञान आणि तंत्रज्ञानाचीच चर्चा होते. मानवाचा भौतिक विकास विज्ञान आणि तंत्रज्ञानाशिवाय होऊ शकत नाही. असे सार्वभौमिक मत निर्माण झालेले आहे. याच मताला अनुसरुण १७ व्या शतकात एका महापुरुषाने विज्ञाना आणि तंत्रज्ञानाचा उपयोग करुन तत्कालीन रयतेला सुखी आणि समृध्द केले याचा आढावा या प्रबंधात घेण्यात आलेला आहे.त्यांचे विचार फक्त मध्ययुगीन काळातच महत्त्वपूर्ण होते असे नाही तर आजच्या आधुनिक काळात सुध्दा त्यांचे विचार आणि कार्य महत्त्वपूर्ण आहे.म्हणून विज्ञानाशी सबंधित असलेली वैज्ञानिक दृष्टिकोनाची व्याख्या देण्यात आलेली आहे.

**व्याख्या:**

**वैज्ञानिक दृष्टिकोन म्हणजे काय ?**

१) वैज्ञानिक दृष्टिकोन म्हणजे कोणत्याही विषयाच्या पध्दतशीर आणि तर्कशुध्द अध्ययानासाठी अवलंबिण्यात येणारा विशिष्ट दृष्टिकोन होय. (General सर्वसाधारण)

२) A System based on an organized, logical & Systematic Study of any subject is known as scientific attitude. -- Encyclopedia

३) मानवी प्रगतीच्या मार्गातील लहान-मोठे अडथळे दूर करण्याचा तो एक शास्त्रशुध्द विचार आहे. सजीव घटना, पध्दती या सर्वांबद्दल केलेली विधाने सत्य की असत्य, योग्य वा अयोग्य हे निरीक्षण करुन अनुभवाद्वारे चिकित्सक बुध्दीने त्याची कारणमीमांसा करुनच ग्राह्य धरायची अन्यथा नाही. या विशिष्ट दिशेने प्रेरित होउनच कार्यरत राहण्याची कष्टसाध्य साधना यालाच वैज्ञानिक दृष्टिकोन म्हणतात.

- डॉ. जयंत नारळीकर

आधुनिक काळात विज्ञानाने प्रगतीची नवनवीन शिखरे पादाक्रांत करुन आपल्या यशाची पताका सर्वत्र फडकावत ठेवली आहे. तथापि विज्ञानाच्या प्रगतीस कारणीभूत ठरलेला सर्वात महत्वाचा घटक वैज्ञानिक दृष्टिकोनाचा स्वीकार हा आहे. याची नोंद घेणे आवश्यक ठरते.आधुनिक विज्ञानाच्या वाटचाली विषयी चर्चा करतांना आपण असे पाहिले होते की, युरोपातील प्रबोधनाच्या चळवळीच्या काळात निरनिराळ्या विचारवंतांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा अवलंब करण्यासबंधी आग्रही भूमिका घेतल्यानेच विज्ञानाच्या प्रगतीचा मार्ग मोकळा झाला.

वैज्ञानिक दृष्टिकोनाचा अंगिकार केल्यामुळे विज्ञानाची प्रगती झाली असली तरी वैज्ञानिक दृष्टिकोनाचे महत्व फक्त विज्ञानाच्या क्षेत्रापुरतेच मर्यादित आहे हा समज प्रथम दूर केला पाहिजे. विज्ञानांचा अध्ययनात वैज्ञानिक दृष्टिकोनाला महत्व आहेच,पण मानवी जीवनातील विविध प्रश्नांच्या अध्ययनासाठीही हा दृष्टिकोन अत्यंत उपयुक्त ठरतो. वैज्ञानिक दृष्टिकोनाचा अवलंब

केल्याने आपल्या अभ्यासविषयाच्या स्वरुपाचे स्पष्ट आकलन होण्यास मदत होते. त्या विषयाच्या अध्ययनासंदर्भात आपल्या मनात निर्माण होणारे संभ्रम दूर करता येतात आणि आपल्या वैचारिक वाटचालीला निश्चित दिशा प्राप्त होते. म्हणूनच आज अध्ययनाच्या विविध क्षेत्रात वैज्ञानिक दृष्टिकोनाचा स्वीकार करण्यावर भर दिला जात आहे. इतकेच नव्हे तर आपल्या दैनंदिन जीवनातही वैज्ञानिक दृष्टिकोनाला महत्व प्राप्त झाले आहे. उदाहरणार्थ समाजातील अंधश्रध्दा, धर्मभोळ्या समजूती, अज्ञान इत्यादी गोष्टींवर मात करण्याचा प्रभावी उपाय वैज्ञानिक दृष्टिकोन समाजात रुजविण्याचा प्रयत्न करणे हाच आहे.

वैज्ञानिक दृष्टिकोन म्हणजे कोणत्याही विषयाच्या पध्दतशीर आणि तर्कशुध्द अध्ययनासाठी अवलंबिण्यात येणारा विशिष्ट दृष्टिकोन होय. वैज्ञानिकाने आपल्या अभ्यासविषयाच्या अध्ययनाच्या वेळी जी वैज्ञानिक विचारपध्दती स्वीकारलेली असते, जी वैचारिक भूमिका धारण केलेली असते, तिला आधारभूत ठरणारा हा दृष्टिकोन असतो. या दृष्टिकोनामुळे त्याच्या शोध प्रक्रियेला निश्चित दिशा लाभते. या दृष्टिकोनाची प्रमुख वैशिष्ट्ये आपणास पुढील प्रमाणे सांगता येतील.

**१. चिकित्सक वृत्ती -**

वैज्ञानिक दृष्टिकोन हा चिकित्सक वृत्तीशी निगडीत असतो. कोणत्याही विषयाचा वैज्ञानिक दृष्टिकोनातून अभ्यास करावयाचा तर प्रथम चिकित्सक वृत्ती ठेवली पाहिजे. चिकित्सक वृत्ती याचा अर्थ आपल्या मनाची कवाडे पूर्णपणे उघडी ठेवूनच कोणत्याही गोष्टीची माहिती घेण्यासंबधी उत्सुकता दाखविणे होय. त्यासाठी अभ्यासकाच्या मनात त्या गोष्टीच्या सत्यतेविषयी शंका निर्माण झाली पाहिजे. अशी शंका उत्पन्न होणे हे त्याच्या चिकित्सक वृत्तीचेच द्योतक असते. कारण अशा प्रकारच्या शंकायुक्त मनाने तो जेंव्हा त्या गोष्टीचा विचार करु लागतो, तेंव्हाच तिचे सत्य स्वरुप समजण्याची शक्यता आधिक असते. विज्ञानाचे उद्दिष्टच मुळी सत्यसंशोधन हे आहे. वैज्ञानिक सत्याचा शोध घेण्यासाठी शास्त्रज्ञ प्रयत्नशील असतो. एखाद्या घटनेविषयी प्रचलित असलेली मते किंवा विचार त्याने आंधळेपणाने आहेत तसेच स्वीकारले तर त्याला शोधप्रक्रिया

चालू ठेवताच येणार नाही. म्हणून त्याने त्या मतासबंधी शंका उपस्थित केली पाहिजे. अर्थात चिकित्सक वृत्तीच्या मुळाशी मानवी जिज्ञासा असते. मानवाला निसर्गातील विविध घटनाविषयी वाटणाऱ्या जिज्ञासेतूनच तो त्याची माहीती करुन घेण्याविषयी उत्सुकता दाखवितो. तथापि केवळ उत्सुकता दाखविणे आणि त्यासंबधी चिकित्सक वृत्ती धारण करणे यात फरक आहे. अभ्यासकाने चिकित्सक वृत्ती धारण केल्यास थातूरमातूर स्पष्टीकरणाने त्याचे समाधान होणार नाही. साहजिकच तो त्या समस्येच्या मुळाशी जाऊन तिचे स्वरुप जाणून घेण्याच्या प्रयत्नास लागतो.

**२. शब्द प्रामाण्यास नकार -**

शब्दप्रामाण्य किंवा ग्रंथग्रामाण्य हा विज्ञानाच्या मार्गातील एक महत्वाचा अडसर असतो. विज्ञानाला शब्दप्रामाण्य मान्य नाही. एखाद्या अधिकारी व्यक्तीने सांगितले किंवा धर्मग्रंथासारख्या पवित्र मानल्या गेलेल्या ग्रंथाने प्रतिपादन केले म्हणून एखादी गोष्ट स्वीकारणे याला शब्दप्रामाण्य किंवा ग्रंथप्रामाण्य असे म्हणतात. सामान्य मनुष्य कमालीचा धर्मश्रध्द असतो. असा इतिहासाचा दाखला आहे. 'धर्मग्रंथात जे काही सांगितले आहे तेच अंतिम सत्य होय. धर्मग्रंथात सर्व प्रकारचे ज्ञान ठासून भरले आहे. तेंव्हा त्यापलीकडे काही ज्ञान असू शकत नाही.' असा धर्मभोळ्या किंवा अंधश्रध्दाळू माणसाचा ठाम विश्वास असतो. ॲरिस्टॉटल सारख्या अधिकारी व्यक्तीच्या वचनावरही लोक असाच भाबडेपणाने विश्वास ठेवत त्यामुळे ॲरिस्टॉटलची अनेक चुकीची मतेही बरीच वर्षे प्रमाण मानली गेली होती. परंतु अशा शब्दप्रामाण्यामुळे सत्यसंशोधनात फार मोठा अडथळा निर्माण होतो. विज्ञान ही सत्यसंशोधनची प्रक्रिया असते. म्हणूनच वैज्ञानिक दृष्टिकोन शब्दप्रामाण्यास नकार देतो. जे बुध्दीला पटेल आणि निरिक्षण, प्रयोग, प्रत्यक्ष पडताळा या प्रक्रियेद्वारे ज्याचा आपणास अनुभव घेता येईल, तेच सत्य म्हणून स्वीकारले गेले पाहिजे, असे वैज्ञानिक दृष्टिकोन सांगतो.

**३. पूर्वग्रहाचा अभाव -**

पूर्वग्रहाचा अभाव हे वैज्ञानिक दृष्टिकोनाचे आणखी एक महत्वाचे वैशिष्ट्ये होय. कोणत्याही विषयाचे पध्दतशीर व तर्कशुध्द ज्ञान संपादन करण्यासाठी अभ्यासकाच्या मनात कोणतेही पूर्वग्रह नसणे आवश्यक असते. अभ्यासकाने अभ्यासाच्या वेळी तटस्थ वृत्ती धारण करावी लागते. कारण त्याच्या तटस्थ भूमिकेमूळेच त्याला आपल्या अभ्यासविषयाचे खरेखुरे आकलन होऊ शकते. अभ्यासकाच्या मनात एखाद्या गोष्टीविषयी काही पूर्वग्रह असतील तर तो तिच्याकडे तटस्थ मनाने पाहूच शकणार नाही. त्याच्या मनातील पूर्वग्रहांमुळे त्याची काही मते अगोदरच तयार झालेली असतात. अभ्यासाच्या वेळी त्याच्या अगोदरच्या मतांना छेद देणाऱ्या किंवा त्यांच्याशी प्रतिवाद करणाऱ्या काही गोष्टी त्याच्या निदर्शनास आल्या. तरी त्याचे अशा गोष्टीकडे दुर्लक्ष होण्याची किंवा त्याच्याकडून त्या गोष्टींची दखल घेतली न जाण्याची फार मोठी शक्यता असते. साहजिकच आपल्या अभ्यासातून अचूक निष्कर्ष तो काढू शकत नाही.

**४. वस्तूनिष्ठता**

कोणत्याही विषयाच्या अभ्यासात वस्तूनिष्ठता स्वीकारणे हे वैज्ञानिक दृष्टिकोनाचे चौथे वैशिष्ट्ये सांगता येईल. वस्तूनिष्ठता याचा अर्थ वस्तूनिष्ठता किंवा वास्तव परिस्थितीचा आहे तसा स्वीकार करणे. वास्तव परिस्थितीकडे उघड्या डोळयांनी पाहाणे आणि तिच्याशी एकनिष्ठ रहाणे हा वस्तुनिष्ठतेचा प्रमुख निकष असतो. भौतिक घटना काही नियमानुसार घडत असतात. हे नियम बुध्दिगम्य असतात. म्हणून विज्ञानाच्या अभ्यासकाने वस्तुनिष्ठ दृष्टिकोनातून भौतिक घटनांचे निरीक्षण करुन त्या नियमांचा शोध घेण्याचा प्रयत्न करणे गरजेचे असते. मानवी मनोव्यापार, इच्छा आकांक्षा यांची भौतिक घटनांशी गल्लत करणे सर्वस्वी चुकीचे ठरते. वस्तुनिष्ठ सत्य हे एकच असते आणि बुध्दीच्या आधारे त्याचा शोध घेता येणे शक्य असते, असे वैज्ञानिक दृष्टिकोन सांगतो.

## ५. प्रत्यक्ष अनुभूती

वैज्ञानिक ज्ञान हे अनुभवाधिष्ठित ज्ञान असते. म्हणून विज्ञानात प्रत्येक गोष्टीची अनुभूती घेणे महत्त्वाचे असते. वैज्ञानिक दृष्टिकोनदेखील प्रत्यक्ष अनुभूतीला महत्व देतो. कोणत्याही गोष्टीचा किंवा निष्कर्षाचा सत्य म्हणून स्वीकार करण्यापूर्वी निरीक्षण व प्रयोग या मार्गाने स्वतः अनुभूती घ्यावयाची, त्याची प्रचीती पाहावयाची यावर वैज्ञानिक दृष्टिकोन विशेष भर देतो. प्रत्यक्ष अनुभवाच्या कसोटीवर प्रत्येक गोष्टीची सत्यता पडताळून पाहण्याचा आग्रह या संदर्भात अतिशय महत्त्वाचा समजला जातो. वैज्ञानिक सत्याची अनुभूती सर्वांनाच घेता येते. काही अध्यात्मज्ञानी या तथाकथित साधुसंत आपणास अंतिम सत्याचे दर्शन झाल्याचा किंवा प्रत्यक्ष ईश्वराचा साक्षात्कार घडल्याचा दावा करतात. परंतु त्यांच्या या दाव्याची अनुभूती कोणालाच घेता येत नाही. तेंव्हा त्यांच्या या दाव्याचा वैज्ञानिक सत्य म्हणून स्वीकार केला जाऊ शकत नाही. ज्या गोष्टीची प्रत्यक्ष अनुभूती घेता येत नाही. अशी कोणतीही गोष्ट किंवा त्यासंबंधीचा दावा वैज्ञानिक दृष्टिकोन मान्य करत नाही. ' जे इंद्रियगम्य आहे तेच सत्य होय' असे हा दृष्टिकोन मानतो.

वरील विवेचनावरुन हे स्पष्ट होईल की, वैज्ञानिक दृष्टिकोन हा सत्यसंशोधनासाठी धारण केलेला असा दृष्टिकोन असतो की, जो व्यक्तिगत विचार, भावना, पूर्वग्रह इत्यादी गोष्टी पूर्णपणे बाजूला ठेवण्याचाआणि कोटेकोरपणे वस्तुनिष्ठ भूमिका घेऊन प्रत्यक्ष अनुभूतीच्या आधारेच सत्याचा स्वीकार करण्याचा आग्रह धरतो. अर्थात संपूर्ण सत्य एकदमच हाती लागेल किंवा अचानक अंतिम सत्याप्रत आपणास पोहोचता येईल, असा दावा हा दृष्टिकोन करीत नाही. वैज्ञानिक विचारपध्दतीच्या मार्गाने वस्तुनिष्ठ सत्याचा आपणांस हळूहळू पण निश्चित पणे उलगडा होत जाईल असा विश्वास मात्र तो व्यक्त करतो.

वैज्ञानिक दृष्टिकोन हा जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात उपयुक्त ठरणारा दृष्टिकोन आहे. कारण वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या आधारेच आपणास वस्तुनिष्ठ सत्याच्या निकट पोहोचणे किंवा ते सत्य जाणून घेणे शक्य होते. दुर्दैवाने आपल्या समाजात वैज्ञानिक दृष्टिकोन पुरेसा रुजला असल्याचे प्रत्ययास येत नाही. शिक्षण व वैज्ञानिक दृष्टिकोन यांचा परस्पर सबंध असावा अशी

अपेक्षा असते. विज्ञानाच्या माध्यमातून वैज्ञानिक दृष्टिकोन वाढीस लावण्याचा प्रयत्न केला जावा अशी अपेक्षा बाळगणे स्वाभाविक आहे. पण प्रत्यक्षात शिक्षण व वैज्ञानिक दृष्टिकोन यात असा सबंध असतोच असे पहावयास मिळत नाही. म्हणूनच आपल्या देशात सुशिक्षित इतकेच नव्हे तर उच्चविद्याविभूषित व्यक्तीही अंधश्रध्दा भोळया समजूती पूर्वग्रह इत्यादी गोष्टींच्या प्रभावाखाली गेल्याचे वा अशा बाबींचे बळी ठरल्याचे आढळून येते. यातही दुर्दैवाची गोष्ट अशी की, ज्या विज्ञानाने आपणास नाना प्रकारच्या भौतिक सुविधा उपलब्ध करुन दिल्या त्या सुविधांच्या आधारेच विज्ञानाला पराभूत करण्याचे प्रयत्न जाणता अजाणता केले जात असतात. दूरचित्रवाणी हे याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणून सांगता येईल दूरचित्रवाणीसारख्या  माध्यमाचा जनमानसावर किती प्रभाव असतो, हे आता वेगळे सांगण्याची गरज नाही. परंतु दूरचित्रवाणीवरील बरेच कार्यक्रम असे असतात की, त्यांच्यामार्फत समाजातील अंधश्रध्दांना खतपाणी घालण्याचेच कार्य केले जाते. ज्या राष्ट्रांतील लोकांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा स्वीकार केल्यामुळे त्या राष्ट्रांनी विविध क्षेत्रांत नेत्रदिपक प्रगती केली आहे ही वस्तुस्थिती आहे. तेंव्हा वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या स्वीकारात व्यक्तीचेच नव्हे तर समाज व राष्ट्र यांचेही हितसबंध सामावलेले असते.

**समस्या सूत्रण**

छत्रपती शिवरायांच्या कर्तृत्वाची आणि कार्याची  नोंद जगाने घेतलेली आहे. आपल्या अंगी असलेल्या विविध गुणांच्या जोरावर शिवरायांनी हे स्वराज्य निर्माण केले होते. त्यांच्या अंगी असलेल्या विविध गुणांपैकी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा परामर्श प्रस्तुत प्रबंधात करण्यात आला आहे. शिवरायांवर अनेक अंगाने लेखन झालेले आहे. त्यांच्या विविध गुणाची नोंद आतापर्यंत विविध संशोधकांनी घेतलेली आहे. दुर्लक्षित राहिलेला गुण म्हणजे त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन होय. याच वैज्ञानिक दृष्टिकोनाचा विविध अंगाने परामर्श घेण्याचा प्रयत्न या शोध प्रबंधात करण्यात आला आहे. आज आपण २१ व्या शतकात विज्ञानाच्या युगात वावरत आहोत. विज्ञानाचा पावला पावलावर उपयोग करीत आहोत. परंतु जिथे विज्ञानाची पहाट झाली नव्हती. त्या १७ व्या शतकात

शिवरायांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग केलेला दिसून येतो. शिवराय फक्त योध्दे नव्हते. तर ते एक उत्तम प्रशासक, उत्तम मानसशास्त्रज्ञ, उत्तम समुपदेशक होते हे या शोध प्रबंधनातून सिध्द करण्यात आले आहे. शिवरायांचे जीवन चरित्र उघडून पहिल्यास अनेक ठिकाणी त्यांनी दाखविलेला वैज्ञानिक दृष्टिकोन आपल्याला दिसून येते. जेंव्हा बाळ पालथे जन्माला आले. तेंव्हा सगळे नातेवाईक निराश झाले. राजेंना ही बातमी कशी द्यावी असे अनेकांना वाटले. राजे काय म्हणतील अशी शंका सर्वांना वाटली तेंव्हा शिवराय उद्गारले ' बाळ पालथे जन्माला आले. त्याचा अर्थ तो भविष्यात दिल्लीची पातशाही पालथी घालेल ' यावरुन शिवराय किती सकारात्मक विचार करत होते. हे दिसते. तथाकथित हिंदुधर्मानुसार समुद्रावर प्रवास करणे निषिध्द समजले जात होते. तेंव्हा शिवरायांनी समुद्रावर, सागरावार आरमार उभारले एवढेच नाही त्या भागातील शेतकऱ्यासाठी जोडधंदा म्हणून मिठाचा व्यवसाय-मिठागरे निर्माण केले.

या प्रबंधात शिवरायांच्या वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या विविध बाबींचा अभ्यास करण्यात आला आहे. मध्ययुगीन कालखंडात सगळीकडे अज्ञान, अंधश्रध्दा पसलेले असतांना शिवराय मात्र वैज्ञानिक दृष्टिकोन बाळगतात आणि त्या आधारे स्वराज्याचे रुपांतर सुराज्यात करतांना दिसून येतात.

**संशोधनाची आवश्यकता -**

आजपर्यंत छत्रपती शिवाजी महाराजांवर खूप लेखन आणि संशोधन झालेले आहे.छत्रपती शिवराय म्हणजे महाराष्ट्राची अस्मिता आहे. त्यांच्या विषयी विविध अंगाने लेखन झालेले आहे. शिवराय उत्तम योध्दे होते. उत्तम राज्यकर्ते होते. उत्तम संघटक होते. त्याबरोबरच ते सहिष्णुता वादी होते. अशा विविध गुणांचा समुच्चय शिवरायांच्या अंगी होते. आज त्यांचे एक गुण म्हणजे आम्हाला जीवन जगण्यासाठी मार्गदर्शन करणारी विज्ञानवादी दृष्टी होय. शिवरायांना फक्त मध्ययुगापुरते मर्यादित न ठेवता त्यांचे जीवन कार्य त्यांचे व्यक्तिमत्व आधुनिक काळाला आजच्या विज्ञान युगात

सुध्दा प्रेरणादायी ठरत असते. शिवरायांचा कार्यकाळ जरी मध्ययुगामध्ये झालेला असला तरी आज त्यांच्या कार्याची दखल आधुनिक काळाला घ्यावीच लागेल.

छत्रपती शिवरायांत जे विविध गुण होते त्यापैकी एक गुण म्हणजे त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन होय. या वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग करुन आपल्या स्वराज्याला उभारणी दिली स्वराज्यउभारणीत या गुणाचा उपयोग करुन घेतला. वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग करुन स्वराज्याचे रुपांतर सुराज्यात केले. याचा तपशिल या प्रबंधात घेण्यात आलेला आहे. आधुनिक काळात शिवरायांचे कार्य सर्वांना समजले पाहिजे.शिवराय फक्त योध्दे नव्हते ते उत्तम प्रशासक होते. पर्यावरणाचे जाणकार होते. हे समोर यावे म्हणून या प्रबंधात याचा उल्लेख करण्यात आलेला आहे. शिवराय फक्त लढणारे सेनापती नव्हते तर त्याबरोबरच ते एक उत्तम विज्ञानवादी दृष्टी असणारे व्यक्तिमत्व होते. हे सिध्द होते. कारण समाजाचा इतिहासाकडे पाहण्याचा दृष्टिकोन पूर्वग्रहदूषीत आहे. इतिहासाकडे भूतकालीन घटना एवढ्या पुरते पाहिले जाते. पण मध्ययुगीन काळातील राजे आणि त्यांनी अवलंबविलेल्या गोष्टी आजच्या काळाला अनुसरुन होत्या हे शिवरायांचे व्यक्तिमत्व पाहिल्यावर दिसून येते. आजच्या आधुनिक काळात शिवरायांच्या व्यक्तिमत्वातील इतर गुणांचा सुध्दा अभ्यास होणे आवश्यक आहे. म्हणून युध्द, लढाया या व्यतिरिक्त असलेला त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन या गुणांचा विचार करुन त्यावर प्रबंध सादर केलेले आहे. राजे महाराजांना युध्द लढाया यात बंदिस्त न करता त्यांच्या लोकोपयोगी गोष्टीचा विचार करण्यात आला आहे. त्यात शिवरायांचे जे विविध गुण दिसतात त्यात त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन या गुणांची निवड करुन त्याची विविध कंगोरे अभ्यासण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे. शिवरायांच्या स्वराज्य उभारणीत जेवढ्या प्रमाणात युध्द कौशल्याची साथ होती. तेवढ्याच प्रमाणात त्यांच्या वैज्ञानिक दृष्टिकोनाची दखल घ्यावी लागेल.

**संशोधनाची उद्दिष्टे -**

प्रस्तुत शोधप्रबंधात

१. छत्रपती शिवाजी महाराजांनी वैज्ञानिक दृष्टीचा स्वराज्यासाठी कसा उपयोग केला याचा अभ्यास या प्रबंधात करण्यात आला.
२. छत्रपती शिवाजी महाराजांचे राज्य लहान असूनही, संसाधने कमी असूनही प्रबळ शत्रूंना आपल्या विज्ञानवादी दृष्टिकोनामुळे कसे तोंड देऊ शकले याचा अभ्यास करण्यात आला.
३. छत्रपती शिवाजी महाराजांनी आधुनिक विचाराचा कसा अंगीकार केला याचा आढावा घेण्यात आला.
४. परंपरागत रुढी, परंपरा नाकारुन सामाजिक समन्वय साधण्याचा प्रयत्न कसा केला याची माहिती घेण्यात आली.
५. शिवरायांच्या वैज्ञानिक दृष्टीची आजची प्रासंगिकता काय आहे याचा शोध घेण्यात आला.
६. शिवरायांच्या जीवन चरित्राचा संक्षेप आढावा घेण्यात आला.
७. शिवरायांनी गढ, किल्ले उभारत असतांना किल्ल्याचे बांधकाम करीत असतांना वैज्ञानिक दृष्टिकोनाचा कसा उपयोग केला याचाआढावा घेण्यात आलेला आहे.
८. शिवरायांनी  युध्दशास्त्राचा उपयोग करतांना त्यात वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग करुन युध्दशास्त्रात प्राविण्य मिळविले त्याची चिकित्सा करण्यात आलीआहे.
९. संदेशवहनासाठी विविध धुरांचा वापर करतांना त्यात वापरल्या जाणाऱ्या लाकडाच्या गुणधर्माची चिकित्सा केलेली आहे.
१०. रयतेचा आर्थिक विकास करण्यासाठी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा कसा उपयोग केला याची चिकित्सा केली आहे.
११. सामाजिक क्षेत्रात शिवरायांनी दाखविलेला वैज्ञानिक दृष्टिकोन अभ्यासण्यात आला आहे.

१२. धार्मिक क्षेत्रातील शिवरायांची सहिष्णूता अभ्यासून त्यातील वैज्ञानिक दृष्टिकोनाची चिकित्सा केली आहे.

१३. शिवरायांना मानसशास्त्राचा परिपूर्ण अभ्यासअसून ते एक उत्तम मानसशास्त्रज्ञ होते हे सिध्द होते.

## गृहितके

१. छत्रपती शिवाजी महाराजांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा वापर करुन आदर्श राज्याची निर्मिती केली.

२. शिवराय वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या आधारे शत्रूंना तोंड देऊ शकले.

३. छत्रपती शिवरायांनी वैज्ञानिक दृष्टिकोनातूनच व्यापार, शेती व उद्योगधंद्यांना प्रोत्साहन दिले.

४. शिवरायांनी विदेशी कंपन्यांचा धोका ओळखून आरमाराची निर्मिती करुन आपणही सागरी क्षेत्रात कमी नाही हे दाखवून दिले.

५. छत्रपती शिवाजी महाराजांचा स्थापत्य निर्मिती मध्ये वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

६. शिवराय आधुनिक विचार सारणीच्या आधारे सामाजिक समन्वय साधण्याचा प्रयत्न केला.

७. शत्रूच्या मनात धडकी आणि आपल्या सैन्याच्या मनात विश्वास निर्माण करण्यासाठी मानसशास्त्राचा उपयोग केला.

## संशोधनाचे अभ्यास क्षेत्र

सदरील संशोधनाच्या अभ्यास क्षेत्रामध्ये छत्रपती शिवाजी महाराजांचा वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या विविध अंगाचा अभ्यास करण्यात आला आहे. शिवाजी महाराजांनी आपल्या स्वराज्याची उभारणी करीत असतांना विविध कार्यकौशल्याचा उपयोग करीत असतांना वैज्ञानिक दृष्टिकोनाचा कसा वापर केला याचा आढावा घेण्यात आलाआहे. मध्ययुगीन काळात वावरत असतांना सुध्दा वाईट रुढी परंपरा, अंधश्रध्दा याचा परिणाम आपल्या स्वराज्याच्या कारभारावर न

होऊ देता वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग करुन आपल्या प्रजेला सुखी समाधानी कसे केले याचा चिकित्सक अभ्यास करण्याचा प्रामाणिक प्रयत्न प्रस्तुत संशोधनातून करण्यात आला आहे.

**विषय निवड आणि महत्त्व**

छत्रपती शिवाजी महाराजांवर आज पर्यंत खूप संशोधन झालेले आहे.शिवरायांच्या अंगी विविध गुण होते. जसे सहिष्णुता धैर्य व मुत्सद्देगिरी प्रजेविषयी कळकळ,स्वराज्य स्थापने मागील स्वातंत्र्याचे मूल्य या गुणांच्या आधारे त्यांनी आपल्या स्वराज्याची उभारणी केली. त्यातून स्वराज्याचे रुपातंर सुराज्यात केले.या सगळ्या गुणाबरोबरच त्यांच्या अंगी असलेला वैज्ञानिक दृष्टिकोन हा गुण दुर्लक्षीत राहीला.म्हणून या त्यांच्या गुणाचा अभ्यास करुन स्वराज्य उभारणीत त्याचा कसा उपयोग झाला हे या प्रबंधात लिहिलेले आहे.

आजचे यूग हे विज्ञानाचे युग आहे विज्ञानाच्या माध्यमातून व्यक्ती आपले भौतिक जीवन सुखी बनविण्याचा प्रयत्न करित आहे. म्हणून आजच्या काळाला अनुसरुन हा विषय घेण्यात आला आहे.आधुनिक युगात विज्ञान आणि तंत्रज्ञानाचे महत्त्व दिवसें दिवस वाढत आहे.त्यामुळे आजच्या युगाला सुसंगत असलेला हा विषय निवडून या विषयाचे महत्त्व विशद करण्यातआलेआहे.

**तथ्य संकलन पध्दती**

प्रस्तुतच्या शोध प्रबंधाच्या तथ्य संकलनासाठी नूतन महाविद्यालय सेलूचे सहकार्य लाभले तसेच स्वामी रामानंद तीर्थ हिंदी मराठी ग्रंथालय सेलू, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ नांदेड येथील मध्यवर्ती ग्रंथालयातून साहित्य संकलन केले. नूतन विद्यालय सेलू , डॉ बाबासाहेब आंबेडकर विद्यापीठ औरंगाबाद, शिवाजी महाविद्यालय परभणी, स्व.नितीन कला व विज्ञान महाविद्यालय पाथरी जि.परभणी अशा अनेक ग्रंथालयातून संशोधनाशी सबंधित ग्रंथ संकलित केले.तत्कालीन मासिके, दैनिके, साप्ताहिके इत्यादी चे संकलन करुन प्रस्तुत शोध प्रबंधाचे लेखन केले आहे.

**संशोधन पध्दती -**

प्रस्तुत विषयाचे संशोधन करण्यासाठी संदर्भ पध्दती आणि ऐतिहासिक संशोधन पध्दती या संशोधन पध्दतीचा उपयोग केला आहे. हा शोधनिबंध लिहिण्यासाठी प्राथमिक आणि दुय्यम साधन सामुग्रीचा आधार घेण्यात आला आहे. प्राथमिक साधनात छत्रपती शिवरायांच्या समकालीन लिहिलेले ग्रंथ आणि दुय्यम साधनात शिवरायांच्या नंतर लिहिलेल्या काळातील ग्रंथ याचा समावेश होतो.प्रस्तुत शोधप्रबंध हा व्यक्तिविशेष आहे. त्यामुळे या शोध प्रबंधाचे संशोधन वर्णनात्मक, विश्लेषणात्मक, तौलानिक व निदानात्मक पध्दतीने केलेले आहे. ह्या शोध प्रबंधाची मांडणी सात प्रकरणामध्ये केली असून शेवटी संदर्भ ग्रंथांची यादी आणि परिशिष्टे दिलेली आहेत.

**साहित्य परिक्षण -**

हा शोधनिबंध लिहिण्यासाठी प्राथमिक आणि दुय्यम साधन सामुग्रीचा आधार घेण्यात आला आहे. प्राथमिक साधनामध्ये.

१) कवी परमानंद - शिवभारत

२) जयराम पिंडये - राधामाधवविलासचंपू

३) धुंडीराज लक्ष्मण व्यास - राज्य व्यवहार कोष

४) छत्रपती संभाजी महाराज - बुधभुषणम

यांचा समावेश होतो. तर दुय्यम साधनात

१. वा.सि.बेंद्रे - छत्रपती शिवाजी महाराज विकित्सक चरित्र (पुर्वाध)

२. संपादक अ.रा.कुलकर्णी, ग.ह. खरे - मराठ्यांचा इतिहास खंड - १

३. कै.न्यायमूर्ती महादेव रानडे - Rise of the Maratha Power

४. गोविंद सखाराम सरदेसाई - मराठी रियासत खंड - १

अशा अनेक साधनांचा संशोधनासाठी वापर करण्यात आलाआहे. छत्रपती शिवाजी महाराजांविषयीचे ग्रंथ अशा विविध लेखकांच्या लिखाणाची चिकित्सा प्रस्तुत शोध निबंधात करण्यात आली आहे.

## प्रकरणांची रुपरेषा

### प्रकरण पहिले - प्रस्तावना

या प्रकरणात छत्रपती शिवाजी महराजांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या आधारे स्वराज्याची उभारणी कशी केली तसेच मानसशास्त्राचा उपयोग करुन शत्रूसैन्याच्या मनात भिती तर आपल्या सैन्याच्या मनात विश्वास कसा निर्माण केला याचा संक्षिप्त आढावा घेण्यातआलेला आहे. तसेच संशोधनाची आवश्यकता, संशोधनाचा आराखडा, संशोधनाची उद्दिष्टे, संशोधनाचे अभ्यास क्षेत्र, संशोधन पध्दती इ. संशोधनाशी संबधित घटकांची तपशिलवार माहिती पहायला मिळेल त्याचबरोबर आपला विषय वैज्ञानिक दृष्टिकोनाशी सबंधित असल्यामुळे वैज्ञानिक दृष्टिकोनाची व्याख्या आणि वैशिष्ट्ये दिलेली आहेत.

### प्रकरण दुसरे - जीवनचरित्र एक -दृष्टिक्षेप

या प्रकरणात छत्रपती शिवाजी महाराज यांचे संक्षिप्त चरित्र सांगून त्यांच्या कार्य कर्तृत्वावर दृष्टिक्षेप टाकण्यात आलेला आहे. शिवरायांच्या जन्माच्या वेळचा सामाजिक, धार्मिक, राजकीय परिस्थितीचा आढावा घेण्यातआला आहे. शिवरायांचे शिक्षण शहाजीराजे भोसले यांच्या नियंत्राणाखाली झालेले आहे. शिवरायांची स्वराज्याची शपथ घेण्यापासून ते त्यांच्या जीवनातील ठळक घडामोडीचा वेध घेण्यात आला आहे. त्यांनी घेतलेली शपथ कशी पूर्णत्वास नेली हे स्पष्ट केले आहे.

**प्रकरण तिसरे - स्थापत्य शास्त्रातील वैज्ञानिक दृष्टिकोन**

छत्रपती शिवाजी महाराजांनी मध्ययुगीन काळात किल्याचे असलेले महत्व ओळखले होते. म्हणून त्यांनी अधिकाधिक किल्ले जिंकण्याचा निर्धार केला. नुसते किल्ले जिंकून थांबले नाहीत तर त्या अर्धवट अवस्थेत असलेल्या किल्यांची पुनर्बांधणी केली. आणि त्या बांधकामात वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग केल्याची माहिती या प्रकरणात देण्यात आलेली आहे. मध्ययुगात वावरत असून सुध्दा शिवरायांकडे कसे आधुनिक तंत्रज्ञान होते. हेआपल्याला या प्रकरणात दिसून येते. वेळ प्रसंगी परकीय अभियंत्याची मदत घेऊन आपले गड-कोट परिपूर्ण बांधून घेतल्याची माहिती या प्रकरणातून दिसून येते. किल्ले हे आपले संरक्षक असले पाहिजेत असा शिवरायांचा दृष्टिकोन होता हे सिध्द होते.

**प्रकरण चौथे - युध्दशास्त्र आणि संदेशवहनातील वैज्ञानिक दृष्टिकोन**

या प्रकरणात शिवरायांनी युध्दकौशल्यात आणि संदेशवहनात वापरलेल्या विविध तंत्राचा उपयोग कसा केला. याचा आढावा घेण्यात आला आहे. परंपरागत युध्दतंत्राचा उपयोग न करता आधुनिक युध्दकौशल्याचा शिवरायांनी उपयोग केला आणि त्यात विज्ञान आणि तंत्रज्ञानाचा उपयोग केला याची चिकित्सा करण्यात आली आहे. तलवारीच्या आकारात योग्य तो बदल करण्यात आला या विषयी माहिती घेण्यात आली. शिवरायांच्या बाबतीत अतिशय सर्वांच्या चर्चेचा विषय म्हणजे ' भवानी तलवार ' या भवानी तलवार च्या बाबतीत यथासांग माहिती देण्यात आली. ही तलवार शिवरायांना भवानी ने न देता ही तलवार शिवरायांनी विशिष्ट रक्कम देऊन पोर्तुगीजाकडून घेतली याचा उहापोह करण्यात आला आहे. तसेच संदेशवहनात शिवरायांनी वेगवेगळ्या प्रसंगी केलेल्या धुराचा उपयोग यात सांगितलेला आहे. कोणत्या प्रसंगी कोणता धूर वापरला याची चिकित्सा करुन जाळण्यासाठी विशिष्ट लाकडाचा उपयोग केल्याचे सांगून लाकडाच्या गुणधर्माची चर्चा करण्यात आली आहे.

**प्रकरण ५ वे - आर्थिक, सामाजिक, धार्मिक क्षेत्रातील वैज्ञानिक दृष्टिकोन**

या प्रकरणात छत्रपती शिवरायांनी आर्थिक क्षेत्रात क्रांती करुन वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग केला. हिंदू धर्मातील तथाकथित रुढी परंपरानुसार समुद्रावर प्रवास करणे निषिध्द समजल्या जायचे परंतु शिवरायांना या अंधश्रध्देचा विचार न करता समुद्रावर प्रवास करुन कोकणातील शेतकऱ्यांसाठी मिठागरे निर्माण करुन शेतकऱ्यांना जोड व्यवसाय उभारुन दिले. याचा आढावा या प्रकरणात घेण्यात आला आहे.

सामाजिक क्षेत्रात शिवरायांनी केलेली क्रांती या प्रकरणात विश्लेषण करण्यात आलेली आहे. मध्ययुगीन काळात समाजावर अंधश्रध्देचा प्रचंड पगडा होता. म्हणून भेदभाव करण्याची एक वाईट प्रथा निर्माण झाली होती. विशिष्ट लोकांना मान सन्मान देणे तर विशिष्ट लोकांचा अपमान करणे अशी ही प्रथा होती. परंतू शिवरायांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग करुन सामाजिक क्षेत्रात समता प्रस्थापित केली. याची चिकित्सा या घटकात करण्यात आली आहे.

शिवरायांच्या राज्याच्या अवती-भोवती मुस्लिमांची राज्ये होती. त्यामुळे त्यांच्याशी संपर्क येणे,संबध येणे अपरिहार्य होते. यातूनच सत्तेसाठी संघर्ष निर्माण झाले. परंतू शिवराय सहिष्णुतावादी होती. सहिष्णुताचा उपयोग करुन शिवरायांनी धार्मिक द्वेष निर्माण होऊ दिला नाही. यातच त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो. राजकीय संघर्षाला धार्मिक संघर्षाचे रुप शिवराय येऊ दिले नाहीत. याची चिकित्सा या प्रकरणात करण्यात आली आहे. यातून शिवरायांचा सर्वधर्मसमभाव दिसून येतो. याचा आढावा या प्रकरणात घेण्यात आला आहे.

**प्रकरण ६ वे - छत्रपती शिवाजी महाराज आणि मानसशास्त्र**

या प्रकरणात शिवरायांचा मानसशास्त्राचा असणारा अभ्यास मांडण्यात आला आहे. यातून शिवराय उत्तम मानसशास्त्रज्ञ होते. हे सिध्द होते. कारण शत्रूच्या मनात भिती आणि स्वपक्षातील सैनिकांच्या मनात विश्वास निर्माण करण्यासाठी शिवरायांनी मानसशास्त्राचा यथोचित उपयोग

करुन घेतल्याची चर्चा या घटकात करण्यात आली आहे. याबरोबरच शिवराय एक उत्तम समुपदेशक होते. याचाही उहापोह या प्रकरणात करण्यात आला आहे.

**प्रकरण ७ वे - निष्कर्ष - उपसंहार**

' छत्रपती शिवाजी महाराजांचा वैज्ञानिक दृष्टिकोन- एक चिकित्सक अभ्यास ' या शोध प्रबंधातील एकूणच प्रकरणातून छत्रपती शिवाजी महाराजांच्या वैज्ञानिक दृष्टिकोनाचा आलेख निर्देशित करुन छत्रपती शिवरायांनी मध्ययुगात वावरत असतांना मध्ययुगातील अंधश्रध्देचा त्याग करुन आधुनिक विचार सरणीचा स्विकार केला. आपल्या स्वराज्य उभारणीत विज्ञान आणि तंत्रज्ञानाचा वापर करुन आपले स्वराज्य कार्यक्षम बनविले. मग स्थापत्य शास्त्र असो, युध्दशास्त्र असो किंवा संदेशवहन असो या सर्वच क्षेत्रात शिवरायांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा वापर केल्याची चिकित्सा एकंदरीत या प्रबंधात करण्यात आली आहे.

# <u>संदर्भ सूची</u>


| | | |
|---|---|---|
| १. गोविंद पानसरे | - | शिवाजी कोण होता ? लोकवाड.्मय गृह मुंबई, पहिली आवृत्ती एप्रिल १९८८, एकोणपन्नासावे पुनर्मुद्रण, सप्टेंबर २०१५, पृष्ठ क्र.५० |
| २. पूर्वोक्त | - | पृष्ठ क्र. ५१ |
| ३. नरहर कुरुंदकर | - | छत्रपती शिवाजी महाराज जीवन -रहस्य इंद्रायणी साहित्य प्रकाशन पुणे ३०, प्रकाशन दिनांक १५ ऑगष्ट २००३, पृष्ठ क्र.३२ |
| ४. पूर्वोक्त | - | पृष्ठ क्र.५३ |
| ५. अ.रा.कुलकर्णी | - | अशी होती शिवशाही, राजहंस प्रकाश प्रा.लि.पुणे, आवृत्ती पाचवी, सप्टेंबर २०१२,पृष्ठ क्र.५२ |
| ६. डॉ.गिरीश प. जाखोटिया | - | छत्रपती  शिवाजी महाराज व्यवस्थापन गुरु आणि व्यूहरचनाकार साकेत प्रकाश पुणे , दुसरी आवृत्ती नोव्हेंबर २०१२,पृष्ठ क्र.१४१ |
| ७. श्रीमंत शिवाजी कोकाटे | - | विश्ववंद्य छत्रपती शिवाजी महाराज, ।। शिवचरित्र ।।, जिजाई प्रकाशन पुणे, पहिली आवृत्ती १९ फेब्रु २००१, पृष्ठ क्र. ६०-६१ |
| ८. पुरुषोत्तम खेडेकर | - | लोकराजे शिवराय जिजाई प्रकाशन पुणे, पहिली आवृत्ती २०१२, पृष्ठ क्र. ५४ |

# प्रकरण - दुसरे

# छत्रपती शिवाजी महाराजांचे जीवन चरित्र एक दृष्टीक्षेप

## छत्रपती शिवाजी महाराजांपूर्वीचा महाराष्ट्र

छत्रपती शिवरायांपूर्वी सुमारे चारशे वर्ष महाराष्ट्रात स्वराज्य नव्हते. महाराष्ट्राचा बराचसा प्रदेश अहमदनगरचा निजामशहा आणि विजापूरचा आदिलशहा या दोन सुलतानांनी सत्ता आपसात वाटून घेतली होती. त्यांचे अधिकारी ठिकठिकाणी कारभार पाहत होते. या दोघांचे एकमेकांशी हाडवैर होते. त्यात मराठी रयतेचे हाल झाले. रयत अत्यंत दुःखी होती उघड उघड उत्सव, सण साजरे करणे धोक्याचे झाले होते. रयतेला पोटभर अन्नही मिळत नव्हते. सुरक्षित निवाराही नव्हता. सगळीकडे अन्याय अत्याचार वाढला होता. महाराष्ट्रात ठिकठिकाणी देशमुख, देशपांडे इत्यादी वतनदार होते, पण रयतेकडे त्यांचे लक्ष नव्हते. रयतेवर त्यांचे प्रेम नव्हते. प्रेम होते फक्त वतनावर. ते एकमेकांशी भांडत आपापसात लढत. त्यात रयतेवर अनन्वीत अत्याचार होत.[१]

राजमाता जिजाऊ रयतेला सुखी करण्यासाठी छत्रपती शिवरायांसोबत विचारविनिमय करत. स्वराज्य स्थापण्याचे पवित्र कार्य त्यांनी हाती घेतले. भांडखोर वतनदारांना त्यांनी वठणीवर आणले. स्वराजाच्या कामी त्यांचा उपयोग करुन घेतला. जुलमी राजवटींचा पराभव केला. न्यायाचे हिंदवी स्वराज्य शिवाजी राजांनी स्थापन केले. हे स्वराज्य सर्व जातीधर्माच्या लोकांचे होते. स्वराज्यात कोणताही भेदभाव नव्हता. शिवाजी महाराजांनी स्वराज्यात हिंदू, मुसलमान असा कोणताच भेदभाव केला नाही. सर्व धर्मातील साधूसंतांचा त्यांनी सन्मान केला.शिवरायांनी अठरापगड जातीतील लोकांना सोबत घेवून स्वराज्याची मुहुर्त मेढ रोवली. [२]

### दख्खन(दक्षिण) प्रदेशाची भौगोलिक वैशिष्ट्ये

मध्ययुगातील दख्खन विभागाच्या सीमा वेगवेगळया कालखंडात भिन्न स्वरुपाच्या असल्यामुळे या प्रदेशाची भौगोलिक व्याख्या निश्चितपणे सांगने कठीण आहे. साधारणपणे उत्तरेला

तापी नदीपर्यंत आणि दक्षिणेला कोकण व कृष्णा नदीपर्यंत विस्तृत असलेला प्रदेश मध्ययुगात विशेषतः शिवकालात दख्खन या नावाने ओळखला जात असे. या प्रदेशात प्रामुख्याने खानदेश, पश्चिम महाराष्ट्र, मराठवाडा, कोकण आणि विजापूर व बेळगाव या जिल्ह्यांतील काही भागांचा समावेश होता.[३]

**मराठे सरदार भोसले एक कर्तबगार घराणे -**

मराठे काटक व शूर होते. तसेच ते धाडसी होते, स्वामीनिष्ठ होते. लढाईवर मोठमोठे पराक्रम गाजवण्यात त्यांचा मोठा हातखंडा होता. हातात भाला, कमरेला तलवार असे हे धाडसी मराठा जवान घोड्यावर सरदारांच्या फौजेत दाखल होत. मराठे सरदार फौजबंद असत कोणताही फौजबंद मराठा सरदार सुलतानाकडे गेला की, सुलतान त्याला आपल्या चाकरीला ठेवी. त्याला सरदारकी देई. कधी कधी जहागिरीही देई. जहागिरी मिळालेले सरदार स्वतःला आपल्या जहागिरीचे राजे समजत. विजापूर व अहमदनगर येथील सुलतानांच्या पदरी अनेक मोठमोठे मराठे सरदार होते. त्यात सिंदखेडचे जाधव, फलटणचे निंबाळकर, मुधोळचे घोरपडे, जावळीचे मोरे, वेरुळचे भोसले हे प्रमुख होते. सिंदखेडचे जाधव हे देवगिरीच्या यादवांचे वंशज होते. राजमाता जिजाऊ ह्या सिंदखेडच्या लखुजी जाधवांच्या कन्या होत्या.[४]

**शिवभक्त मालोजीराजे भोसले**

सुमारे चारशे वर्षापूर्वीची गोष्ट वेरुळ येथील घृष्णेश्वराचे मंदिर मोडकळीस आले होते. त्याच्या भिंतीला भेगा पडल्या होत्या. त्या मंदिराकडे पाहून भक्तांना दुःख होत असे. या पडक्या मंदिरात एक शिवभक्त नित्य नियमाने येत असे. शिवाच्या पिंडीवर बेलफूल वाहत असे. हात जोडून आपल्या मनातले श्रीशिवाला सागंत असे. एक दिवस मालोजी राजे भोसले यांनी मंदिराचा जीर्णोद्धार केला. घृष्णेश्वराचे गेलेले वैभव परत आणले.[५]

## वेरुळचे भोसले

वेरुळ गावचे पाटील पराक्रमी मालोजीराजे भोसले हे थोर शिवभक्त होते. विठोजीराजे मोठे कर्तबगार होते, तसेच ते शूर होते. त्यांच्या पदरी पुष्कळ हत्यारबंद मराठे होते. तो काळ फार धामधुमीचा होता. निजामशाहीवर उत्तरेच्या मुघल बादशाहाने स्वारी केली होती. त्यावेळी दौलताबाद ही निजामशाहीची राजधानी होती. तेथे मलिक अंबर नावाचा वजीर होता. तो मोठा कर्तबगार होता. त्याने दौलताबाद जवळील वेरुळच्या भोसले बंधूची कर्तबगारी पाहिली. त्याने निजामशाहाजवळ त्यांच्या कर्तबगारीची माहिती दिली. निजामशाहाने मालोजीराजांना पुणे व सुपे परगण्यांची जहागिरी दिली. भोसल्यांच्या सरदारांकडे वैभव परत आले. उमाबाई ही मालोजीराजांची पत्नी त्या फलटणच्या निंबाळकर घराण्यातील होत्या. या उभयतांना दोन मुले होते. एकाचे नाव शहाजी आणि दुसऱ्याचे नाव शरिफजी. शहाजी पाच वर्षाचा असतांना मालोजीराजे इंदापूरच्या लढाईत मारले गेले. विठोजी राजांनी आपल्या पुतण्यांचा आणि जहागिरीचा सांभाळ केला. पुढे त्यांनी शहाजीसाठी लखुजीराव जाधवांच्या मुलीला मागणी घातली. जाधवांची कन्या जिजाऊ मोठी सुलक्षणी होती. जिजाऊसाठी विठोजी राजांनी घातलेली मागणी लखुजीरावांनी स्वीकारली. लखुजीराव जाधव म्हणजे निजामशाहीतील एक शूर व पराक्रमी सरदार होते. ते मोठा फौजफाटा बाळगून होते. निजामशहाच्या दरबारातही त्यांची मोठी प्रतिष्ठा होती. त्यांनी शहाजीराजे आणि जिजाऊ यांचा विवाह मोठ्या थाटात लावला. जिजाऊ ह्या भोसले कुळातील शहाजी राजांची पत्नी झाली.[६]

## शहाजीराजे भोसले

निजामशाहाने मालोजीराजांची जहागिरी शहाजीराजांना दिली. शहाजीराजे भोसले हे पराक्रमी होते. निजामशाही दरबारात त्यांना मोठा मान,सन्मान होता. उत्तरेच्या मुघल बादशाहाने निजामशाही जिंकायचा बेत केला. विजापूरचा आदिलशाहा मोगलांना येवून मिळाला, तेंव्हा निजामशाही वाचवण्यासाठी मलिक अंबर व शहाजीराजे जिकरीनी लढले. दोन्ही फौजाचा त्यांनी

पराभव केला. अहमदनगर जवळ भानवडी येथे ही प्रसिद्ध लढाई झाली. या लढाईत शरिफजी मारले गेले, पण शहाजीराजांनी मोठा पराक्रम गाजवला.त्यामुळे शूर सरदार म्हणून त्यांचा सर्वत्र लौकिक झाला. दरबारात त्यांची प्रतिष्ठा वाढली. इतकी की खुद्द मलिक अंबरला त्याच्या बद्दल हेवा वाटू लागला. त्यातून वितुष्ट निर्माण होऊन शहाजीराजांनी निजामशाही सोडली आणि ते विजापूरच्या अदिलशाहीला जाऊन मिळाले.

आदिलशाहाने शहाजीराजेंना 'सरलष्कर' हा किताब देऊन त्यांचा सन्मान केला. पुढे निजामशाहीत बऱ्याच घडामोडी झाल्या. वजीर मलिक अंबर मृत्यू पावला . त्याचा पुत्र फत्तेखान हा मोठा कारस्थानी होता. तो आता निजामशाहीचा वजीर झाला. त्याच्या काळात निजामशाहीला उतरती कळा लागली. मुघलांच्या स्वारीचा धोका निर्माण झाला. त्यातून निजामशाही सावरण्यासाठी शहाजीराजे निजामशाहीत परत आले.[७]



**छत्रपती शिवाजी महाराजांचा जन्म**

१९ फेब्रुवारी १६३० रोजी (फाल्गुन वद्य तृतीया, शके १५५१) शुक्रवारी सूर्यास्तानंतर शिवनेरी किल्यात शिवरायांचा जन्म झाला. जिजाऊंना एकूण सहा अपत्ये झाली. त्यापैकी थोरला मुलगा संभाजी व धाकटा शिवाजी हे दोघेच जिवंत राहिले. शिवरायांच्या जन्माच्या एक वर्षापूर्वीच संभाजी या शिवरायांच्या मोठ्या मुलांचा विवाह नोव्हेंबर १६२९ मध्ये शिवनेरी किल्ल्याचे सुभेदार विजयराजे श्रीनिवासराव देशमुख यांच्या जयंती या मुलीशी झाला होता. त्यावेळी जिजाऊ सोबत शहाजीराजे उपस्थित होते. जिजाऊंना दिवस जाऊन त्यावेळी ७-८ महिने झाले होते. त्यानंतर शहाजींना मोगल सरदार दर्याखान यांच्याशी लढण्यासाठी खानदेशात जावे लागले. अशा वेळी जिजाऊना ठेवण्याकरिता शिवनेरी हेच सुरक्षित ठिकाण होते. आपल्या व्याह्यावर जीजाऊंच्या बाळंतपणाची जबाबदारी सोपवून शहाजी राजे मोहिमेवर गेले. शिवजन्माच्या वेळी ते उपस्थित राहू शकले नाहीत. पण तीन-चार महिन्यानंतर ते आले व जवळजवळ दीड वर्ष सारे कुटुंब शिवनेरीवर होते.[१]

**छत्रपती शिवाजी महाराजांचे शिक्षण**

शहाजी राजे हे स्वतः संस्कृतचे गाढे पंडित होते. त्यांनी आपल्या बंगळूरच्या दरबारात अनेक भाषांच्या पंडितांना आणि कलावंताना आश्रय दिला होता. शिवरायांसाठी त्यांनी हुशार शिक्षकांची नेमणूक केली होती. तेथे वयाच्या सातव्या वर्षीच त्यांच्या शिक्षणाला प्रारंभ झाला. थोड्याच काळात शिवराय लिहिण्या-वाचण्याच्या कलेत पारंगत झाले.

जिजाऊ ह्या बाळ शिवाजीला रामायण,महाभारत,भागवत यातील गोष्टी सांगत असत .शहाजीराजांनी शिवरायांना युध्दकला शिकवण्यासाठी काही शिक्षकांची नेमणूक केली होती. त्यांनी शिवरायांस घोड्यावर बसणे, कुस्ती खेळणे, दांडपट्टा फिरवणे, तलवार चालवणे इत्यादी विद्या शिकवण्यास प्रारंभ केला. अशा प्रकारे वयाच्या बाराव्या वर्षापर्यंत शिवरायांना विविध विद्या व कला यांचा परिचय झाला. लवकरच आदिलशहाने शहाजीराजांना कर्नाटकातील नामाकीत राज्ये

जिंकण्याच्या मोहिमेवर पाठवले. या मोहिमेवर जाण्यापूर्वी शहाजी राजांनी जिजाऊ व शिवराय यांची पुणे जहागिरीकडे रवानगी केली. त्यावेळी त्यांच्या बरोबर शहाजीराजांनी हत्ती, घोडे, पायदळ, खजिना, ध्वज, तसेच विश्वासू प्रधान, शूर सेनानी आणि तज्ञ शिक्षक यांना धाडले.

शिवराय पुणे जहागिरीत आले, तरी त्यांचे शिक्षण जिजाबाईंच्या देखरेखीखाली चालूच राहिले. बंगळूरहून येतांना शहाजीराजांनी सोबत दिलेल्या नामवंत शिक्षकांनी शिवरायांना अनेक शास्त्र, विद्या व भाषा शिकवल्या उत्तम राज्यकारभार कसा करावा? शत्रूशी युद्ध कसे करावे? किल्ले कसे बांधावे? घोडे व हत्ती यांची परीक्षा कशी करावी, शत्रूच्या दुर्गम प्रदेशातून निसटून कसे जावे इत्यादी अनेक विद्या शिवरायांना अवगत झाल्या. शिवरायांची शिक्षणातील ही प्रगती पाहून जिजाऊंचा आनंद द्विगुणीत झाला.[१०]

**शिवछत्रपतींची साक्षरता**

शिवचरित्रातील अनेक शंकास्थळापैकी एक म्हणजे शिवछत्रपतींची साक्षरता होय. याबाबतीत इतिहासकारांचे दोन मत दिसून येतात. त्यापैकी एक मत जो शिवाजी महाराजांना ' निरक्षर' ठरवतो. त्यामध्ये ग्रॅट डफ, सर जदुनाथ सरकार इ. यांचा समावेश होतो. तर दुसऱ्या गटात सेतु माधवराव पगडी, आबा चांदोरकर यांचा समावेश होतो. हा दुसरा गट शिवाजी महाराजांना ' साक्षर ' म्हणतो. या संदर्भात ग्रॅट डफ म्हणतात की, ' बहुधा मराठे सरदार यास लिहिता वाचता येत नाही. ते असे समजतात की, हे काम कारकुनांनी करावे त्यांत शिवाजीला तर कधी आपले नावही लिहिता येत नव्हते'.

या शिवाय सर जदुनाथ सरकार म्हणतात की, "The Weight of Evidence is in favour of the view that shivaji was unlettered, like three other neroes of mdiaeval India-Akbar, Haidar Ali, and Ranjit Singh. The Many Europeghs who visited him never saw write anything when the presented

any petition to him the rajah always passed it on his ministers to be read to him. No piece of writing in his own hand is known to exist." [११]

सर जदुनाथ सरकारांच्या ' Shivaji and His times ' या ग्रंथात उपरोक्त आशयाची अनेक विधाने विखुरलेली आहेत. या बाबतीत सेतु माधवराव पगडी म्हणतात की, " वास्तविक पाहता सर जदुनाथांची ही विधाने हास्यास्पद ठरतात. परमानंदाचे ' शिवभारत ' हा एकच ग्रंथ या विधानाचा खोटेपणा दाखविण्यास पुरेसा आहे. पण सध्या तरी जदुनाथाचा हाच ग्रंथ सर्वमान्य असल्यामुळे आजच्या पिढीच्या असंख्य विद्यार्थ्यांनाही महाराजांच्या साक्षरतेसंबंधी शंका वाटत असल्यास नवल नाही. [१२]

शिवभारतमध्ये कवींद्र परमानंद म्हणतो की, " त्यानंतर शिवाजी सात वर्षाचा झाला तेंव्हा हा ' लिपिग्रहण योग्य ' म्हणजे अक्षर ओळख करुन देण्याच्या वयाचा झाला असे पाहून शहाजीने त्याला इतर समवयस्क मूलासह गुरुच्या हाती दिले. याचाच अर्थ त्याला धुळपाटीवर बसविले असा होईल. तेथे बालशिवाजी सर्व धूळाक्षरे फार लवकर शिकला एवढेच कवीने सांगितले आहे. मुळाक्षरे लिहिता वाचता येणे म्हणजे सर्व विद्या हस्तगत करुन घेण्याच्या विद्याचा पाया आहे. असे कवीने आपले मत नमूद केले आहे. ते आजही सर्वांना मान्य होण्याजोगे आहे. (अध्याय ९ श्लोक ७३).[१३]

उपरोक्त शिवकालीन साधन ग्रंथानंतर छत्रपती शिवाजी महाराजांची साक्षरता पटविणारे आणखी एक अस्सल साधन म्हणजे इतिहास संशोधक आबा चांदोरकर यांनी आपल्या " शिवशाहीचा लेखनालंकार ' या पुस्तकात छापलेले एक पत्र होय. या पत्राच्या शेवटी असणारी ' बहूत लिहिणे तरी तुम्ही सुज्ञ असा ' अशी चौदा अक्षरे खुद महाराजांच्या हातची उपलब्ध झाली आहेत.या पुराव्यावरुन शिवाजी राजे साक्षर होते हे सिध्द होते.[१४]

**स्वराज्य स्थापनेची शपथ**

छत्रपती शिवाजी महाराजांनी वयाच्या १५ व्या वर्षी पुण्याच्या नैऋत्येला असलेल्या रायरेश्वराच्या मंदिरात १६४५ साली आपल्या मावळयासह स्वराज्य स्थापनेची शपथ घेतली.

शिवराय अजून वयाने कितीतरी लहान होते, पण त्यांच्या मनाची भरारी मोठी होती. त्यांनी एक मोठा शिवधनुष्य उचला होता त्या देवालयात जमलेल्या सवंगड्यांना ते कळकळीने म्हणाले, "गड्यांनो, मी आज तुम्हांला माझ्या मनातील एक गोष्ट सांगू का? आमचे वडील शहाजीराजे विजापुरचे सरदार आहेत. त्यांनीच आम्हाला येथल्या जहागिरीचा अधिकार दिला आहे. पण गड्यांनो मला यात मुळीच आनंद वाटत नाही. सुलतानांच्या वतनदारीवर आपण संतुष्ट असावे का? आपल्या चारी बाजूंना अनेक परकीय राजवटी आहेत. त्याच्या मध्ये सारखी युद्धे चालू असतात. आपली माणसे या युद्धात नाहक मरतात. कुटुंबच्या कुटुंब देशोधडीला लागतात. आपल्या मुलखाची धुळधाण होते आणि इतके सोसूनही आपल्या पदरी काय ? तर गुलामगिरी! आपण हे किती दिवस सहन करायचे ? वतनांच्या लोभाने आपण हे असेच चालू द्यायचे का?" शिवराय आवेशाने बोलत होते. त्यांचा चेहरा रागाने लाल झाला होता. बोलता बोलता ते थांबले त्या तरुण सवंगड्याकडे पाहू लागले. रायरेश्वराच्या गाभाऱ्यात जमलेले ते तरुण मावळे शिवरायांच्या बोलण्याने थरारुन गेले. नवीच दृष्टी त्यांना मिळाली त्यांच्यापैकी एकजण म्हणाला, "बोला बालराजे, बोला आपल्या मनातील सांगा आम्हाला, तुम्ही जे सांगाल ते करण्यासाठी आम्ही एका पायावर तयार आहोत." हो राजे, तुम्ही जे सांगाल ते आम्ही करु ! त्यासाठी आम्ही बलिदानही देऊ तरुण वीर एका आवाजात बोलले. मावळ्यांच्या शब्दांनी शिवरायांना स्फुरण चढले एकेकाकडे पाहत ते आनंदाने म्हणाले, "आपल्या ध्येयासाठी आपण सर्वांनी झटायचे, सर्वांनी खपायचे, सर्वांनी प्राणही अर्पण करायचे." आपले ध्येय म्हणजे, ' हिंदवी स्वराज्य'! रयतेचे स्वतंत्र राज्य स्थापन करायचे. गुलामीतून मुक्त व्हायचे या रायरेश्वराला साक्ष ठेवू आपण प्रतिज्ञा करु स्वराज्य स्थापनेसाठी आता आम्ही आमचे सर्वस्व वाहणार. हिंदवी स्वराज्य निर्माण करायचे असे ठरविले. शिवराय शेवटी निश्चयाने बोलले. रायरेश्वराच्या देवालयातून सारे मावळे बाहेर पडले ते स्वराज्याच्या शपथा घेतल्यावरच शिवरायांचे मन उचंबळून आले. ते पुण्यास येताच लाल महालात मातोश्रीकडे गेले. घडलेला प्रसंग त्यांनी आई जिजाऊंना सांगितले हे ऐकून जिजाऊंना खूप आनंद झाला. [१५]

## शिवाजी महाराजांचे प्रेरणास्त्रोत राजामाता जिजाऊ

शहाजीराजांच्या व्यक्तिमत्वाचा तसेच त्यांनी स्वराज्य निर्मितीसाठी तयार केलेल्या पार्श्वभूमीचा छत्रपती शिवरायांना जितका उपयोग झाला, तितकाच प्रभाव मातोश्री जिजाऊ साहेबांच्या सहवास व शिकवणूकीचा झाला. म्हणून त्यांचे एकंदर व्यक्तिमत्व समजून घेणे आवश्यक आहे. देवगिरीच्या प्रख्यात यादव घराण्याचे वंशज बुलडाणा जिल्ह्यातील सिंदखेडराजा येथील लखुजी जाधवराव हे जिजामातेचे वडील होते. त्यांच्याकडे सिंदखेकडची देशमुखी होती. मराठे सरदार शूर व काटक होते पण ते विजापूर व अहमदनगरच्या सुलतानांच्या पदरी होते. सिंदखेडचे जाधव, फलटणचे निंबाळकर मुधोळचे घोरपडे, जावळीचे मोरे, वेरुळचे भोसले हे त्यापैकी होते. लखुजी निजामशाहाच्या पदरी होते. निजामशाहाने त्यांच्या पराक्रमावर खुश होऊन त्यांना पंचहजारी दिली, त्यामुळे सिंदखेड, परतूर वगैरे प्रदेश त्यांना खर्चासाठी मिळाला. जिजाऊंना दत्ताजी, अचलोजी, रघुजी आणि बहादुरजी अशी चार भावंडे होती.गिरजाबाई हे त्यांच्या आईचे नाव होते. जिजांऊचा जन्म १२ जानेवारी १५९८ रोजी सूर्योदयाच्या वेळी झाला. त्यांचा विवाह सिंदखेड राजा येथे इ.स. १६१० मध्ये शहाजीं राजेशी झाला.त्यामुळे जाधव व भोसले ही कर्तबगार घराणी एकमेकांशी जोडली गेली. पण त्यांचा विवाह आनंदी वातावरणात व रुढी परंपरनेच झाला असे उपलब्ध पुराव्यानुसार कळते.

शिवरायांच्या व्यक्तिमत्वाच्या जडणघडणीत जिजाऊंचा मोलाचा वाटा होता यात तीळमात्र शंका नाही. राज्यकारभारात त्यांनी जे काही मार्गदर्शन केले, त्यासंबधी काही पत्र मिळालेली आहेत. त्यावरुन त्या न्यायप्रिय व प्रेमळ होत्या असे दिसते. पुण्याच्या जवळ असलेल्या कलावंताची योग्य पारख करुन त्यांनी त्यांना आश्रय दिला होता. मता नावाच्या मुसलमान कलावंत स्त्रियांना त्यांनी म्हातारपणी वेतन देण्याची व्यवस्था लावून दिली होती, त्यावरुन त्यांच्यातील मानवता दिसून येते. त्यांच्या कर्तृत्वाचे उल्लेख शिवरायांच्या चरित्राच्या ओघात आपणास पहावयास मिळतील आयुष्याच्या शेवटी त्यांनी आपल्या पराक्रमी पुत्रास छत्रपती झालेले पाहून त्या धन्य झाल्या.[१६]

**छत्रपती शिवाजी महाराजांचे कुटुंब**

**वडील -** शहाजीराजे भोसले

**आई -** राजमाता जिजाबाई

**शिवरायांच्या पत्नी**

१. सईबाई निंबाळकर
२. सोयराबाई मोहिते
३. पुतळाबाई पालकर
४. लक्ष्मीबाई विचारे
५. काशीबाई जाधव
६. सगुणाबाई शिंदे
७. गुणवंतीबाई इंगळे
८. सकवारबाई गायकवाड

**वंशज**

**मुले**

१. छत्रपती संभाजी भोसले
२. छत्रपती राजाराम भोसले

**मुली**

१. अंबिकाबाई
२. कमळाबाई
३. दीपाबाई
४. राजकुंवरबाई
५. राणूबाई
६. सखुबाई

**सूना**

**छत्रपती संभाजी राजे**

१. येसूबाई

२. दुर्गाबाई

**छत्रपती राजाराम**

१. ताराबाई

२. राजसबाई

**नातवंडे**

१. संभाजीचा मुलगा - शाहू

२. ताराबाई राजारामाची मुले - दुसरा शिवाजी

**३.** राजसबाईची मुले - दुसरा संभाजी [१७]

**पहिली स्वारी - तोरणागडावर विजय**

१६४७ मध्ये वयाच्या सतराव्या वर्षी शिवाजी राजांनी आदिलशाहाच्या ताब्यातला तोरणागड जिंकून स्वराज्याची मुहुर्तमेढ रोवली. तोरणागड हे स्वराज्याचे तोरणच ठरले. त्याच साली शिवाजी राजांनी कोंढाणा (सिंहगड) आणि पुरंदर हे किल्ले आदिलशाहाकडून जिंकून पुणे प्रांतावर पूर्ण नियंत्रण मिळवले. या शिवाय तोरणागडा समोरील मुरुंबदेवाचा डोंगर जींकुन त्याची डागडुजी केली व त्याचे नाव राजगड असे ठेवले हेच राजगड पुढे स्वराज्याची पहिली राजधानी होती.[१८]

**शिवमुद्रा**

शिवरायांनी तयार केलेली ही मुद्रा संस्कृत भाषेमध्ये आहे त्यामध्ये लिहिलेल्या ओळींचा अर्थ असा आहे. " शहाजीचा पुत्र जो शिवाजी, त्याची ही मुद्रा आहे. (शुध्द पक्षातील ) प्रतिपदेच्या

चंद्रकलेप्रमाणे (दिवसे दिवस) वाढत जाणारी व विश्वातील सर्वांना मान्य होणारी ही मुद्रा, सर्वांच्या कल्याणासाठी होणारी ही मुद्रा, सर्वांच्या कल्याणासाठी शोभत आहे." स्वराज्याची स्थापना त्यांना करायची होती, ते रयतेच्या कल्याणासाठी राहिल हा स्पष्ट हेतू व ते राज्य उत्तरोत्तर वाढत राहील हा प्रबळ आत्मविश्वास या मुद्रेतून दिसून येतो. सोबतच या स्वराज्याला विश्वात सर्वत्र मान्यता मिळेल असा विश्वासही या मुद्रेतून व्यक्त झाला आहे. आज शिवरायांच्या शासनपध्दतीचा व त्यांच्या कर्तृत्वाचा विचार जगभर होत आहे. त्यावरुन त्यांच्या मोठेपणाची जाणीव होते. आपल्या सामर्थ्यांची स्पष्ट कल्पना शिवरायांनाही होती हे यावरुन दिसून येते. ज्या प्रतिकूल परिस्थितीमध्ये ही कल्पना मांडली गेली. तिचा विचार केल्यास मात्र त्यातील क्रांतिकारक आणखीनच उठून दिसते. त्यामुद्रेत शिवरायांनी स्वतःला शहाजीचा पुत्र म्हणून संबोधून शहाजी राजांबद्दल आदर व प्रेम व्यक्त केले आहेच, सोबतच आपल्या नम्रतेचा व वडिलांविषयी असणाऱ्या आदरभावाचाही परिचय करुन दिलेला आहे. सर्वांना हवेहवेसे वाटणारे चंद्राचे चांदणे जसजसे कलेकलने वाढत जाते व सर्वांना शीतल प्रकाशाची पखरण घालते, तसे शिवरायांच्या नेतृत्वाखाली स्वराज्य सर्वांना आपलस वाटेल अशी ग्वाही या मुद्रेत दिली आहे. विशेष म्हणजे यापूर्वी शहाजी व जिजाबाईंच्या ज्या मुद्रा राज्यववहारात वापरत होत्या त्या फारसी भाषा व अरबी लिपीमध्ये होत्या शिवरायांनी मात्र पहिल्यांदा देवनागरी लिपी व संस्कृत भाषा आपल्या मुद्रेवर वापरली यावरुन त्यांचा स्वदेशाभिमान दिसून येतो. महाराष्ट्र राज्य स्थापन झाल्यानंतर या मुद्रेतील ओळीचा स्वीकार नव्या राज्यकर्त्यांनी केला. शिवमुद्रेवरील या ओळी अशा आहेत.

*प्रतिपच्चंद्रलेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ।*

*शाहसुनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते ।।*

दिल्लीला मोगल बादशाहा, विजापूरला आदिलशाहा गोव्याला पोर्तुगीज व जंजिऱ्याचा सिद्दी असे प्रबळ सत्ताधारी असतांना शिवरायांनी केलेला हा निर्धार अधिक मोलाचा दिसून येतो.[१९]

**शिवाजी महाराजांचे मावळामधील सवंगडी आणि अन्य प्रसिध्द मावळे**

- कान्होजी जेधे
- बाजीप्रभू देशपांडे
- मुरारबाजी देशपांडे
- नेताजी पालकर
- बाजी पासलकर
- जिवा महाला
- तानाजी मालुसरे
- हंबीरराव मोहिते

**शिवाजी महाराजांचे सरसेनापती**

- नेताजी पालकर
- प्रतापराव गुजर
- हंबीरराव मोहिते

**शहाजीराजांना अटक व सुटका**

शिवाजीराजांच्या यशस्वी स्वाऱ्यांना बिथरुन शिवाजीराजांना आळा घालण्याची एक युक्ती म्हणून आदिलशाहाने शहाजीराजांना अटक केली. शिवाय सुमारे ५००० फौज घेऊन फत्तेखान नावाच्या सरदाराला शिवाजीराजांवर हल्ला करण्यास पाठवले. शिवाजीराजांनी पुरंदरावर फत्तेखानाचा पराभव केला. बाजी पासलकर सैन्यासकट पळत्या फत्तेखानाचा पाठलाग करत सासवडपर्यंत गेले. सासवडजवळ झालेल्या लढाईत बाजी पासलकराचा मृत्यू झाला. शिवाजीराजांनी मोगल बादशाह शाहजहाँन यास त्याच्या दखनच्या सुभेदाराकरवी (शहजादा मुरादबक्ष) पत्र पाठवून शहाजी राजासकट त्याच्या चाकरीत जायची इच्छा प्रकट केली. त्याचा

परिणाम म्हणून शाहाजहाँनने आदिलशाहावर दबाव आणला आणि परिणामी शहाजीराजेंची सुटका झाली. परंतु त्यासाठी शिवाजीराजांना कोंढाणा किल्ला आणि शहाजीराजांना बंगळूर शहर आणि कदर्पीचा किल्ला आदिलशाहाला द्यावा लागला.[२०]

**जावळी प्रकरण ( मोरे चंद्रराव)**

**१५ जानेवारी १६५६**

आदिलशाहाशी इमान राखणारा जावळीचा सरदार चंद्रराव मोरे शहाजी राजे आणि शिवाजीराजे यांच्या विरुध्द आदिलशाहाकडे कट-कारस्थान रचत असे. त्याला धडा शिकवण्यासाठी इ.स. १६५६ साली शिवरायांने रायरीचा किल्ला सर केला. त्यामुळे कोकण भागात स्वराज्याचा विस्तार  झाला. चंद्रराव मोरे कडून जिंकलेला हा रायरीचा किल्ला पुढे रायगड म्हणून नावारुपास आला. रायगड ही स्वराज्याची  दुसरी राजधानी झाली. छत्रपती शिवाजी महाराजांनी चंद्रराव मोरेंना स्वराज्य कार्यात सहभागी होण्यासाठी सहकार्य करयास सांगितले. परंतू चंद्रराव मोरेंनी शिवाजी महाराजांना सहकार्य न करता उलट शिवाजी महाराजांच्या कार्यात आडकाठी निर्माण करण्याचा प्रयत्न केला. कोकण भागात प्रवेश करण्यासाठी जावळी शिवरायांच्या ताब्यात असणे आवश्यक होते. म्हणून शिवाजी महाराजांनी इ.स. १६५९ मध्ये जावळीवर नियंत्रण प्राप्त केले. अशा प्रकारे शिवाजी महाराजांनी या जावळी विजयामुळे जवळपास पश्चिम घाटातील आणि कोकणातील चाळीस किल्ले जिंकून स्वराज्याचा साम्राज्य विस्तार केला.[२१]

**आदिलशाहीशी संघर्ष**

**अफझलखान भेट व वध (१० नोव्हे.१६५९)**

आदिलशाहाच्या ताब्यात असणारे किल्ले जिंकत राहिल्यामुळे इ.स. १६५९ साली आदिलशाहाने दरबारात शिवाजी महाराजांना संपविण्याचा विडा ठेवला. हा विडा दरबारी असलेल्या अफझलखान नावाच्या सरदाराने उचलला. मोठ्या सैन्यासह आणि लवाजम्यासह अफजलखान मोहिमेवर निघाला. अफझलखान् वाईजवळ आला. तेंव्हा शिवाजी राजांनी सध्याच्या महाबळेश्वर

जवळ असलेल्या प्रतापगडावरुन त्यास तोंड देण्याचे ठरवले. तहांची बोलणी सुरु झाली आणि अंतिम बोलणीसाठी शिवाजी महाराजांनी स्वत:यावे असा अफझलखानाचा आग्रह होता. पण शिवाजी राजांच्या वकिलांनी (पंताजी गोपीनाथ बोकिल यांनी ) अफझलखानाला गळ घालून प्रतापगडाला भेट घेण्यास बोलावले. भेटीच्या नियमांनुसार दोन्ही पक्षांकडील मोजकीच माणसे भेटीसाठी येतील आणि दरम्यान सर्वांनी नि:शस्त्र राहण्याचे ठरले. शिवाजीराजांना अफझलखानच्या दगाबाजपणाची कल्पना असल्यामुळे त्यांनी सावधगिरी म्हणून अंगात चिलखत चढविले आणि सोबत बिचवा तसेच वाघनखे ठेवली. बिचवा चिलखतामध्ये दडविला होता तर वाघनखे हाताच्या पंजाच्या आतमध्ये वळविलेली असल्यामुळे दिसणारी नव्हती शिवाजी महाराजांसोबत जिवा महाला हा विश्वासू सरदार होता. अफझलखान सोबत सय्यद बंडा हा तत्कालीन प्रख्यात असा दांडपट्टेबाज होता. प्रतापगडावरील एका छावणी मध्ये भेट ठरली भेटीच्या वेळी उंचपुऱ्या, बलदंड अफझ ालखानाने शिवाजी महाराजांना मिठी मारली आणि शिवाजीराजांचे प्राण कंठाशी आले. त्याच वेळी अफझलखानने कट्यारीचा वार शिवाजी महाराजांवर केला. परंतू चिलखतामुळे शिवाजीराजे बचावले अफझलखानांचा दगा पाहून शिवाजीराजांनी वाघनखे खानाच्या पोटात घुसवली. त्याच बरोबर अफझलखानाची प्राणांतिक आरोळी चहूकडे पसरली. सय्यद बंडानी त्याक्षणी शिवरायांवर दांडपट्ट्याचा जोरदार वार करणार तोच जिवा महालाने झेलला आणि शिवाजीराजांचे प्राण वाचविले यामुळेच," होता जिवा म्हणून वाचला शिवा " ही म्हण प्रचलित झाली. आधीच ठरलेल्या इशाऱ्याप्रमाणे स्वराज्यातील मावळ्यांनी खानाच्या छावणीच्या जवळपासच्या झाडाझुडपामध्ये दडून बसलेल्या मावळ्यांनी हल्ला करुन अफजलखानाच्या सैन्याची दाणादाण उडविली खानाचा मुलगा फाजलखान आणि इतर काही सरदार लपूनछपून वाईच्या मुख्य छावणीपर्यंत आले. इथे खानाचा जनाना होता. ते पाठलागावर असलेल्या नेताजीच्या सैन्यापासून वाचण्यासाठी खजिना, हत्ती व इतर जड सामान टाकून विजापूरला पळाले. शिवाजी राजांना जनतेत मिळालेला आदर आणि प्रेम अनेक शतकानंतरही टिकून आहे. त्यामागचे त्यांची सहिष्णू वृत्ती हे फार महत्वाचे कारण आहे. अफझलखानाच्या मृत्यूनंतर त्यांनी त्याच्या प्रेताचे अंत्यसंस्कार इस्लामी पध्दतीने करुन

त्याची एक कबर प्रतापगडावर बांधली आणि त्या कबरीच्या कायम देखभालीची व्यवस्था केली. अफझलखानच्या मृत्यूनंतर शिवाजीराजांनी दोरोजी नावाच्या सरदाराला कोकणपट्ट्यातील आणखी किल्ले आणि प्रदेश जिंकण्यास पाठवले. स्वतः राजे सातारा प्रांतात घुसून कोल्हापूर पर्यंत गेले व त्यांनी पन्हाळा जिंकून घेतला नेताजीने त्याच्या सैन्यासह जावळ विजापूर पर्यंत धडक मारली.[२२]

**सिद्दी जौहरचे आक्रमण**

**( २८ नोंव्हेबर १६५९)**

अफझलखानाच्या मृत्यूमुळे चिडलेल्या आदिलशहाने त्याचा सेनापती सिद्दी जौहर यास सर्व शक्तिनिशी हल्ला करण्याचा आदेश दिला. इ.स. १६६० साली झालेले हे आक्रमण स्वराज्यावरील अनेक मोठ्या संकटापैकी एक समजले जाते. त्यासुमारास शिवाजी राजे मिरजेच्या किल्याला वेढा घालून होते. सिद्दीच्या आक्रमणाची बातमी येताच राजे पन्हाळगडावर गेले आणि सिद्दी जौहरला त्याचा सुगावा लागताच त्याने गडालाच वेढा घातला आणि गडाची रसद तोडली. काही दिवस गडावरील सर्वांनी तग धरली पण सिद्दीचा वेढा उठण्याचे काही लक्षण दिसेना तेंव्हा सर्वांशी चर्चा करुन शिवाजी राजांनी जवळच्या विशालगडावर पोहचावे असा निर्णय घेतला पन्हाळ गडावरुन एके रात्री शिवाजीराजे आणि काही मंडळी गुप्त रस्त्याने शिताफीने निसटले ह्याचा पत्ता लागताच सिद्दी जौहरने सिद्दी मसउदच्या बरोबर काही सैन्य पाठलागावर रवाना केले. पन्हाळगडापासून काही अंतरावर वाटेत सिद्दीच्या सैन्याने त्यांना घोडखिंडीत गाठले आणि हातगाईची लढाई सुरु झाली. तेंव्हा शिवाजी राजांचे विश्वासू पराक्रमी सरदार बाजीप्रभू देशपांडे यांनी शिवाजी राजांना विनंती केली की, त्यांनी विशालगडासाठी पुढे कूच करावी आणि खिंडीतील लढाई स्वतः लढतील विशालगडावर पोहचताच तोफांचा आवाज ऐकू आला म्हणजे शिवाजीराजे सुखरुप गडावर पोहचले असा संदेश मिळेल. बाजीप्रभू देशपांड्यानी वचन दिले की जो पर्यंत तोफांचा आवाज ऐकू येणार नाहीत तो पर्यंत सिद्दी जौहरला खिंडीमध्येच झुंजवत ठेवतील शिवाजीराजांना ते पटेना पण 'बाजी' च्या विनंतीवजा हट्टामुळे त्यांनी यास मान्यता दिली आणि विशालगडासाठी कूच केले.

बाजींनी सिद्दीच्या सैन्याला रोखुन धरण्यासाठी प्रयत्नांची शर्थ केली पण संख्येने कितीतरी पटीने अधिक सैन्यापुढे बाजीप्रभूनी प्राणाची बाजी लावली ते स्वतः प्राणांतिक रितीने घायाळ झाले होते. शेवटी सैनिकांनी घायाळ बाजीप्रभूनां एके ठिकाणी आणून बसविले, पण बाजींचे प्राण कानाशी साठले होते. थोड्या वेळाने तोफांचा आवाज ऐकू येताच शिवाजीराजे गडावर पोहचल्याचा तो संदेश समजल्यावरच बाजीप्रभू देशपांडे यांनी आपले प्राण सोडले. शिवाजीराजांना ही बातमी फार चटका लावून गेली. बाजीप्रभू हे ज्या घोडखिंडीत लढले आणि स्वतःच्या प्राणांचे बलिदान दिले.त्या घोडखिंडीचे नाव शिवरायांनी पावनखिंड असे ठेवले. बाजीप्रभूच्या बलिदानाने पावन झालेली ती पावनखिंड होय. [२३]

**मोगल सत्तेशी संघर्ष**

मोगल सत्तेशी संघर्ष हा शिवचरित्राचा व्यापक आणि अविभाज्य भाग आहे. तत्कालीन मोगल साम्राज्य हे भारतातील सर्वात बलाढ्य होते आणि औरंगजेब हा अतिशय कठोर आणि कडवा मोगल बादशहा दिल्ली येथे शासन करीत होता.

**मोगल सेनापती शाहिस्तेखान प्रकरण - (६ एप्रिल १६६३)**

शिवरायांनी कोकण किनारपट्टी जवळ जवळ आपल्या ताब्यात घेतली. त्यामुळे मोगलांचे धाबे दणाणले . विजापूरची आदिलशाही गिळंकृत करुन नंतर शिवाजीचा बंदोबस्त करु अशी औरंगजेबाची योजना होती. पण ती खिळखिळ करुन नंतर शिवरायांनी हिंदवी स्वराज्य स्थापन केले. ही गोष्ट त्यांच्या जिव्हारी लागली. आता दक्षिणेकडील आपले साम्राज्य विस्ताराचे स्वप्न धुळीस मिळवू पाहणारा बलाढ्य शत्रू या दृष्टीने तो शिवरायांकडे पाहू लागला. म्हणून त्यांचा बंदोबस्त करण्याकरिता त्याने आपला मामा शाहिस्तेखान याच्यावर जवाबदारी टाकली. प्रथम तो आग्रा येथून निघाला. त्याने पाच महिने वेढा घालून चाकणचा किल्ला काबीज केला. ऑगस्ट महिन्यात हा किल्ला घेतल्यावर त्याने नोव्हेंबरच्या सुरुवातीला पुण्यास येऊन शिवरायांच्या लाल महालाचा ताबा घेतला. तेथेच मुक्काम ठोकून त्याने महाराजांच्या ताब्यातील प्रदेशात आपले लहान

मोठे सरदार पाठविले. त्यांनी खूप धुमाकूळ घातला तरीही शिवरायांनी दोन-अडीच वर्षे त्यांच्या कारवायांकडे कानाडोळा केला. शत्रू गाफील रहावा यासाठी त्यांनी हा पवित्रा घेतला होता. पण संधी मिळताच कारतलबखान हा मोगल सरदार कोकण प्रांतावर चढाई करु लागल्यावर महाराजांनी त्याला उंबर खिंडीत गाठले. तो शिवाजी राजासमोर शरण आला. त्याच्याकडून मोठी खंडणी वसूल करुन त्यांनी त्याला सोडून दिले.त्यानंतर सरदार बुलाखी याने देहरीस वेढा घातल्यावर महाराजांचा सरदार कावजी कोंढाळकर याने त्याच्या चारशे लोकांना ठार करुन वेढा उठविला . अशीच एक संधी चालून आल्यावर पेणजवळील मिरे डोगंरावर मोगल सरदार नामदारखान याला त्यांनी पाणी पाजले. यावेळी महाराजांचा पराक्रमी सरदार कृष्णाजी सुभेदार हा ठार तर वाघोजी तुपे जखमी झाला. या दरम्यान श्रृंगारपूर, पाली, प्रभानवल्ली, राजापूर इ. कोकणातील विजापूरकरांच्या ताब्यातील गावे महाराजांनी हस्तगत करुन त्या भोवतीचा प्रदेशही स्वराज्याला जोडला. त्यानंतर शाहिस्तेखानाला धडा शिकविण्याचे त्यांनी ठरविले. प्राणावर बेतले पण बोटावर निभावले अशी त्याची फजिती शिवरायांनी केली. ५ एप्रिल १६६३ हा दिवस होता. पुण्याच्या लाल महालात खान आरामात झोपला होता. शिवरायांनी निवडक लोक आपल्या सोबत घेतले व रात्रीच्या वेळी सभोवतालच्या खानाच्या सैन्यातून वाट काढीत लाल महालात प्रवेश केला. त्यांनी पाहिले की, सारे झोपी गेले आहेत. शिवाजी महाराजांनी थेट शाहिस्तेखानावर हल्ला चढाविला. खान जनानखान्यात शिरला व जिवाच्या आकांताने पळू लागला. शिवरायांनी त्याच्यावर तलवार उगारली तोच महालाच्या खिडकी वाटे बाहेर पडण्याचा त्याने प्रयत्न केला. या हल्ल्यात शाहिस्तेखान बचावला पण त्याच्या एका हाताची बोटे तुटली. तो पळून गेला म्हणून वाचला शत्रूच्या गोटात शिरुन त्याचा नायनाट करण्याची शिवरायांची ही योजना धाडसी होती. पण हे धाडस म्हणजे केवळ अविचार नव्हे, तर एका सुसूत्र योजनेची परिणती होती.[२४]

**सूरत स्वारी ( ६ जाने ते १० जाने १६६४)**

सूरत स्वारीची महारांजाची योजना म्हणजे साहसाची परिसीमा होती. ही योजना शिवरायांच्या अंतरीची तळमळ, उत्कृष्ट नियोजन आणि जीवाला जीव देणारे सहकारी असल्यामूळे त्यांची योजना यशस्वी झाली. कुठल्याही मुलखात मोहिमेवर धडकण्यापूर्वी महाराजंचे गुप्त हेर पहिले जाऊन धडकत. नंतरच महाराज पावले उचलत.आता या कामगिरीची जोखिम आली ती बहिर्जी नाईकांवर. बहिर्जीनी आपली कामगिरी चोख बजावली. पुणे ते सूरत दीडशे कोसांचे अंतर सगळा पट्टा मुघलांच्या ताब्यात होता. बहिर्जीनी तेथील सविस्तर माहिती काढली. सूरतेचा सुभेदार इनायतखान विषयी माहिती घेतली. शिवराय निवडक सैन्यासह माँसाहेबांचा आणि आई जगदंबेचा आशीर्वाद घेऊन डिसेंबर १६६३ रोजी राजगडावरुन निघाले. महाराजांचा प्रवास रात्री चाले आणि दिवसा ते विश्रांतीकरिता थांबत. त्यामुळे या फौजेकडे फारसे कुणाचे लक्ष गेले नाही. त्र्यंबकेश्वरहून ते कोळवण्यात गेले. कोळवणाहून ४ जाने १६६४ रात्रीच्या वेळी ते घणदेवीस पोहोचले. तिथे महाबतखानाच्या आदेशानुसार आपण अहमदाबादेस जाणार असल्याचे सांगितले. ५ जाने १६६४ रोजी शिवाजी राजे सूरतेस आल्याची बातमी पसरली. सूरतेमध्ये एकच गोंधळ उडाला. एकच धावाधाव सुरु झाली ती संपत्तीची विल्हेवाट लावण्याची सूरतेहून अवघ्या दोन सव्वा दोन कोसावर असलेल्या उधाना या गावी महाराज पोहचले. तरी अय्याशी इनायतखानाची धुंद उतरली नव्हती.[२५]

६ जानेवारी १६६४ रोजी शिवराय आपल्या सैन्यासह सकाळी अकरा वाजण्याच्या सुमारास सुरतेच्या बऱ्हाणपूर दरवाजापाशी पोहचले. बातमी इनायतखानास समजली पाठोपाठ शिवरायांचा वकीलही धडकला. त्याने इनायतखानासमोर खंडणीचा प्रस्ताव ठेवला पण इनायतखानाने ही बाब गंभीरतेने घेतली नाही. उलट आपल्या वकिलामार्फत उध्दटतेने उत्तर पाठविल्यामुळे इनायतखानाचा जासूद जेरबंद झाला. शिवरायांचे सैन्य सुरतेत उतरले. सुरत शहरात एक गोष्ट झाली. लोकांची प्रतिकार करण्याची मानसिकता अजिबात नव्हती. उलट स्वत:च्या जमेल तसे संपत्तीच्या बचावाला या लोकांनी प्राधान्य दिले. स्वतः इनायतखान किल्ल्याच्या आश्रयात गेला. त्यानेच पैसे देणाऱ्यांना बायका मुलासह आत घेतले. आता सुरत शहर महाराजांना लुटण्यासाठी मोकळे होते.सुरत म्हणजे

धनाढ्यांचे माहेर घर होते. या धनिकांच्या धनावर धाड पडली. सोने, नाणे, हिरे, मोती, माणिक पाचू जडजवाहिर पहिल्याच दिवशी अमाप संपत्ती जमा झाली. जकात घरावरील हल्यात अगणित रक्कम मिळाली. धन देण्याचे नाकारले तर काय हाल होतील याचा नेम नव्हता. मात्र ही लुट करतांना आबाल वृध्द, गरीब, धर्मस्थाने यांना शिवरायांनी  धक्काही लागू दिला नाही.  इनायतखान किल्याच्या आत तर महाराजांचे सैन्य शहरात असे चित्र सुरतमध्ये होते.[२६]

उघड्यावरील मराठ्यांचा तळ त्यांच्या निर्भयतेची  साक्ष देत होता. दिसेल ती संपत्ती हिंदवी स्वराज्याच्या संस्थापकाच्या पायाशी जमा होत होती. सात जानेवारीला लुटसत्राचा दुसरा दिवस बहरजी बोहरा वाडा सोडून किल्यात पळाला होता. त्याच्या वाड्यात घुसून मराठ्यांनी ऐंशी लाख रुपयांची संपत्ती लुटली. अशा या विलक्षण धाडसत्रात शिवरायांच्या जिवावर बेतणारे अनेक संकट उभे राहिले असाच हा प्रसंग इनायतखानाने किल्यातून खास आपला वकिल शिवरायांच्या भेटीस पाठवला महाराजांच्या परवानगीने तो आत आल्यावर इनायतखानाच्या  अटी सांगू लागला. बातचित दरम्यान अकस्मात तो वकील हत्यार घेऊन महाराजांच्या काळजाचा वेध घेत पुढे सरसावला तेवढ्यात मराठा सैनिकांनी  त्याचा कट्यार घेतलेला हात समशेरीने तोडला. महाराजांचा खातमा करण्यासाठी किल्याच्या आतमध्ये लपून बसलेल्या इनायतखानाची ही दगाबाजी बघून शामियान्यात एकच गोंधळ उडाला मराठे चवताळले. शामियानातील कैद्याची कत्तल करीत ते सुटले शिवराय केवळ प्रांत मुलुख जिंकून राजे बनले नव्हते तर प्रजेची मने जिंकून रयतेच्या ऱ्हदयसिंहासनी बसून अधिराज्य करीत होते. ते आपल्या राजास जिवापाड जपत होते या दगाबाजीमुळे मराठे भडकले. त्यांनी सुरतमध्ये ठिकठिकाणी आगी लावल्या रात्रीच्या प्रहरी आगीच्या भक्ष्यस्थानी पडलेल्या सुरतचा चेहरामोहरा भयावह दिसत होता. महाराज कुठलीही मोहीम फार दक्षतेने पार पाडत सुरतेच्या जवळपासच्या प्रदेशात महाराजांनी हेर पेरुन ठेवले होते. गुप्तहेरांनी खबर आणली. सरदार महाबतखान मोठ्या लष्करासह सुरतेस येत आहे. १० जाने १६६४ रोजी महाराजांना महाबतखानाची बातमी मिळताच प्रचंड लुट घेऊन त्यांनी घोड्यास टाच मारली. ६ जाने ते १० जानेवारी सुरत नुसते धगधगत होते. महाबतखान १७ जानेवारी १६६४ ला सुरत शहरात

पोहचला. तेंव्हा शहर बेचिराख झाले होते. इनायतखानशी केवळ खंडणीची बोलणी महाराजांनी केली होती. त्याऐवजी त्याने अख्या शहराची व संपत्तीची आहुती दिली. त्याच्या बुध्दिची कीव करावी तेवढी कमी आहे. शाहिस्तेखानाची बातमी ताजीच होती. तेवढ्यात सुरत लुटीची बातमी औरंगजेब बादशहास समजली.[२७]

**राज्यसंकल्पक राजे शहाजींचे निधन ( २३ जाने १६६४)**

कर्नाटकमध्ये होदीगेरे या ठिकाणी शहाजीराजे होते. बेदनुरच्या भद्राप्पा नाईक आणि शिवाप्पा नाईक यांचा बंदोबस्त लावण्याची कामगिरी त्यांनी नुकतीच पार पाडली होती. या मोहिमेवर असतांना शिकारीसाठी म्हणून ते आपल्या मंडळीसह जंगलात गेले,जेंव्हा त्यांना शिकार दिसली तेंव्हा त्यांनी घोड्याला टाच मारली. सावजाचा पाठलाग करण्याच्या उद्देशाने ते वेगाने दौडू लागले. त्यांची नजर सावजावर होती. तेवढ्यात वेगात असलेल्या घोड्याचा पाय मंडोळीत अडकला आणि शहाजी राजे धाडकन कोलमडले. अपघातात राजे जखमी झाले. त्यामध्येच त्यांचे देहावसान झाले. जिजाऊसाहेबांना राजगडावर बातमी समजली त्यांच्या शोकाला पारावार उरला नाही. महाराजांवर दुःखाचा डोंगर कोसळला. पितृछत्राच्या ताकदीवर त्यांनी शत्रूशी दोन हात करण्याचे धाडस उरी बागळले होते. आणि आई जिजाऊसाहेब तर त्यांचे सर्वस्व होते.परमदैवत होते. शिवबा मातृवेडे होते. जिजाऊसाहेबांनी सती जाण्याचा निर्धार केला. त्यांचा निर्धार अटळ होता. शिवराय अश्रूभरल्या नयनांनी मातेस आर्जव करीत होते. आम्हाला सोडून जाऊ नका. सानथोर मंडळी आऊसाहेबांस विनवू लागली. मात्र आईसाहेब ढळल्या नाही. शेवटी शिवबानी त्यांना शपथ घातली अखेर जिजामातेने आपला निर्धार मागे घेतला तिकडे शहाजीराजांची उत्तरक्रिया व्यंकोजीराजांनी पार पाडली राजांची मनसब व्यंकोजीराजांना मिळाली . होदीगरे येथे शहाजीराजांची समाधी बांधली. हे व्यंकोजीराजे तुकाबाईचे पुत्र होते. याशिवाय शहाजी महाराजांना नरसाबाई नावाची राणी होती. त्यांच्यापासून संताजीराजे नावाचे पुत्र महाराजांना झाले.[२८]

**सिंधुदुर्ग किल्याची निर्मिती (२५ जानेवारी १६६४)**

२५ जानेवारी १६६४ रोजी शिवाजीराजे मालवण बंदरात आले. तेथील कुरटे बेटावर सिंधुदुर्ग किल्ला बांधण्यास सुरुवात केली. अनेक कारागिर काम करु लागले. त्यांना रोख पगार देऊन राजांनी त्यांच्या कलेचा आदर केला. किल्ला बांधताना वडार, पाथरवट, गवंडी, सुतार, लोहार यांना राजांनी मानाची वस्त्रे व रोख बक्षीस दिली. शिवरायांनी जलदुर्गाबरोबरच आरमार दलाची (नौसेना) उभारणी केली. भारताला जास्तीत जास्त समुद्र किनारा असल्यामुळे समुद्रमार्गे शत्रूची आक्रमणे होतात. हे थांबविण्यासाठी सुसज्य आरमारदल असणे देशहिताचे आहे. हे ओळखणारे शिवाजी राजे हे देशातील पहिले राजे आहेत. सुरतेवरुन मिळालेल्या पैशातून राजांनी अत्याधुनिक आरमारदल उभारले यासाठी पोर्तुगीज कारागीर देखील राजांनी ठेवले. आधुनिक शस्त्रसाठा खरेदी केला. तराफे, युध्दनौका, जहाज, आगबोटीचे बांधकाम समुद्रकिनाऱ्यावर नालासोपारा पासून ते सिंधुदुर्गापर्यंत सुरु केले. राजे स्वतः पाहणी करत होते. कारागिरांना महत्वपूर्ण सूचना देत होते. आरमारदलाचे काम पूर्ण होताच राजांनी इब्राहिम दौलतखान आणि मायनाक भंडारी यांची आरमारदलाचे प्रमुख म्हणून नेमणूक केली.

देशरक्षणासाठी नाविक दलाची स्थापना करणारे शिवाजीराजे हे भारतातील पहिलेच राजे होते. आज नौसेना अत्याधुनिक आहे याचे श्रेय शिवरायांकडे जाते.[२१]

**शिवरायांची बसरुरवर आरमारी स्वारी (८ फेब्रुवारी १६६५)**

शिवराय करवारच्या दक्षिणेला असलेल्या बसरुर शहरावर स्वारी करण्यास फेब्रुवारी १६६५ च्या सुमारास निघाले. अंदाजे सहा हजार सैन्य, जहाजे, गलबते घेऊन ते गेले. यावेळी कारवारात ( कडवाड) सरदार शेरखान आला होता. शेरखानाला महाराजांच्या आगमनाची बातमी मिळाली. त्यास खऱ्या अर्थाने बुध्दी होती, असे म्हणावे लागेल. त्याने कारवारातील धनाढ्याकडून मोठी रक्कम जमाविली ती रक्कम आणि इंग्रजांनी दिलेली रक्कम अशी मोठी राशी, त्याने

महाराजांकडे रवाना केली. करवारवरील तात्पुरते संकट टळले तरी महाराजांचा हा प्रांत स्वराज्यात असावा, ही इच्छा कायम होती.[३०]

## पुरंदरवर मुरारबाजीचे बलिदान

दिलेरखान पाच हजार पठाणासह बालेकिल्याच्या सर दरवाजाच्या रोखाने निघाला. मुरारबाजीचे सातशे लोकांचे पथक हरहर महादेवाच्या गर्जनेसह सर दरवाजा उघडून बाहेर पडले. दिलेरखानाचे पाच हजार पठाण पुढे सरसावले. ढाल, तलवारी एकमेकींना भिडल्या. मुरारबाजीचे रणकौशल्य, क्रौर्य बघून स्वतः दिलेरखान स्तंभित झाला. लष्कराचे ते अक्राळ विक्राळ रुप बघून दिलेरखान आपल्या छावणीत गेला. मराठ्यांनी पाचशेहून अधिक पठाणांना कंठस्नान घातले. शिवाय कित्येक बहलिया पायदळाची त्यांनी कत्तल केली मुरारबाजी दिलेरखानाच्या छावणीत गेले. मुरारबाजीला जे आडवे आले त्यांना यमसदनी पोहचवले. त्यांच्या अद्वितीय शौर्याने दिलेरखान चकीत झाला. त्याने मुरारबाजीला मुघली सैन्यात चाकरी करण्याबद्दल सूचविले. मात्र यामुळे मुरारबाजी अधिकच चेतले. सरळ दिलेरखानावर घाव घालण्यात ते निघाले मात्र त्याचवेळी दिलेरखानाच्या बाणाने मुरारबाजीच्या कंठाचा वेध घेतला. १६ मे १६६५ रोजी मुरारबाजी देशपांडे पडले. पुरंदरचा वेढा उधळून लावण्यासाठी मुरारबाजीने प्राणाची बाजी लावली. दिलेरखान निहायत खुश झाला. मुरारबाजीच्या जाण्याने पुरंदरही दुःखाश्रू गाळू लागला. मुरारबाजीसारखा धुरंधर योध्दा गेला. शिवरायांचे सैन्य माघार घेणारे नव्हते आणखी जिद्दिने लढले. अद्याप भगवा फडकत होता. मिर्झाराजा जसा चाणाक्ष तसा दक्ष होता. सोबतीला अफाट मोगली सैन्य अफाट युध्दसाहित्यासह मुरारबाजी धारातीर्थी पडल्यावर स्वराज्याचा मुलुख मुघलांनी बेचिराख केल्यावर आणि गडावर फार कमी बळ शिल्लक असतांना महाराज चिंतेत पडले.गड आणखी काही काळ लढवत ठेवणे योग्य नव्हते. मे. १६६५ च्या शेवटी मिर्झा राजाने कोंढाण्यावर फौजा रवाना केल्या आणि कोंढाण्यावर आई जिजाऊ होत्या. पुण्यातही मोगल सरदार तळ ठोकून बसले. महाराजांची चिंता वाढली दिलेरखानाने डोक्यावरचे पागोटे उतरवून शपथ घेतली. किल्ला घेतल्याशिवाय डोक्यावर

पागोटे घालणार नाही. किल्यावरील सैन्याचे बळ क्षीण होत चालले होते आणि शिवरायांस बाहेरुन मदत पाठवणे अवघड झाले. यावर उपाय म्हणून जयसिंहाशी तह करणे आवश्यक झाले होते.[३१]

## पुरंदरचा तह -१३ जून १६६५

पुरंदरचा तह म्हणजे छत्रपती शिवाजी महाराजांच्या युध्दनीतीचे चाणाक्ष आणि दूरदृष्टीचे उदाहरण आहे. शिवरायांनी पुरंदरचा तह केला. मोगलांचा मुसद्दी सेनापती मिर्झाराजे जयसिंह प्रत्यक्ष औरंगजेब बादशहाच स्वराज्यावर चालून आला होता म्हणून तह करणे योग्य ठरले.

औरंजेब बादशाहाने केलेली मिर्झाराजे जयसिंग यांची निवड मोठी अचूक होती. जयसिंगाचा युध्दानुभव दांडगा होता. आशियापासून विजापूर पर्यंत आणि कंदाहारपासून मोंघीरपर्यंत अनेक मोहिमेमध्ये या शूर रजपूत सरदाराने जातीने भाग घेतला होता. तसेच रणनिती प्रमाणे राजनितितही जयसिंग कुशल होते.

दख्खनच्या स्वारीसाठी मिर्झाराजे जयसिंग यांची नेमणूक करण्यात आली. त्यांच्या सोबत दिलेरखान, दाऊदखान, रायसिंग, सुजनसिंग बुंदेले, जयसिंगाचा मुलगा किरीटसिंग अशी आग्रा दरबारातील बडीबडी मंडळी देण्यात आली.प्रंचड सैन्य सोबत घेऊन मिर्झाराजे जयसिंग आग्र्याहून निघाले आणि ९ जानेवारी १६८५ या दिवशी त्यांनी नर्मदा ओलांडून दक्षिण भारतात पदार्पण केले. त्यानंतर महिन्याभराणे म्हणजे १० फेब्रुवारीला ते मोगल सत्तेचे प्रमुख ठाणे असलेल्या औरंगाबादला पोहचले त्यांनी दख्खनचा सुभेदार मुआझ्झम याच्याशी विचारविनिमय केला. शिवरायासबंधी मिळेल तेवढी माहिती गोळा केली आणि पुण्याच्या रोखाने प्रस्थान केले ३ मार्चला जयसिंग पुण्यात येऊन दाखल झाले. आणि पुण्याच्या व्यवस्थेची सारी सुत्रे त्यांनी जसवंतसिंगाकडून स्वतःकडे घेतली.

मिर्झाराजे जयसिंगाने शिवाजी महाराजांकडील किल्ले जिंकून घेण्याची योजना आखली. जयसिंग आणि दिलेरखान यांनी पुरंदर किल्यास वेढा दिला. स्वराज्याच्या विविध भागांत मोगल सैनिकाच्या तुकड्या पाठवण्यात आल्या मोगल सैन्याने स्वराज्याचा भूप्रदेश बेचिराख केला. शिवरायांनी मोगलांना प्रतिकार करण्याचे प्रयत्न केले. मोगलांनी घातलेल्या पुरंदरच्या वेढ्याच्या

वेळी मुरारबाजी देशपांडे याने आपल्या पराक्रमाची शर्थ केली. त्यास वीरमरण आले. मोगलाबरोबरच्या या संघर्षामध्ये आपले व आपल्या प्रजेचे मोठे नुकसान होत आहे. हे लक्षात घेऊन महाराजांनी जयसिंगाबरोबर सलोख्याची बोलणी सुरु केली. महाराजांनी जयसिंगाची भेट घेतली. जयसिंग व महाराज यांच्यात जून १६६५ मध्ये तह झाला हा पुरंदरचा तह म्हणून ओळखला जातो. या तहानुसार महाराजांनी मुघलांना तेवीस किल्ले व त्यांच्या भोवतालचा वार्षिक चार लाख होन उत्पन्नाचा प्रदेश दिला महाराजांनी आदिलशाही विरुद्ध मुघलांना मदत करण्याचे आश्वासनही दिले.[३२]

**आग्रा भेट आणि सुटका (१७ ऑगस्ट १६६६)**

पुरंदरच्या तहानुसार शिवराय आगऱ्याला जायला तयार झाले तरीही आपल्या भविष्याबाबत त्यांना अनिश्चितता वाटत होती. औरंगजेबासारखा हिंदू समाजाबाबत अतिशय असहिष्णु असलेला बादशहा कदाचित आपल्याला धोका देईल किंवा कदाचित कोणाकडून ठारही मारील हा संभव शिवरायांना दृष्टी आड करता येण्यासारखा नव्हता. म्हणून त्यांनी आपल्या पश्चात स्वराज्याचे काम सुरळीत चालू रहावे या दृष्टीने स्वराज्य जिवंत ठेवण्याचे कार्य केले. व्यक्तीपेक्षा तिने उभारलेल्या कार्याचे मोल अधिक आहे असलेच पाहिजे अशी शिवरायांची धारणा होती. मॉसाहेबांचा, महाराण्यांचा आणि सहकाऱ्याचा निरोप घेऊन शिवरायांनी ५ मार्च १६६६ या दिवशी रायगड सोडला. राजपुत्र संभाजी, आणि सात मदतनीस सोबत निवडक सैन्य घेऊन निघाले.

पुरंदरच्या तहानुसार शिवरायांना औरंगजेबाचे मांडलिकत्व पत्करावे लागले. त्याचप्रमाणे त्यांना औरंगजेबाच्या भेटीकरीता आग्र्याला जाणे भाग पडले. शिवाजी राजे युवराज संभाजींना सोबत घेऊन २००-३०० निवडक लोकांसह आग्रा येथे गेले. पहिल्याच भेटीत औरंगजेब शिवरायाशी अपमानास्पद रितीने वागला. शिवरायांच्या मानी स्वभावाला ही गोष्ट खूपच बोचली. ते बादशहास म्हणाले, "मी वस्त्रे घेणार नाही. बादशहाने मला मुद्दामच जयवंतसिंगाच्या मागे उभे केले. मला मारायचे असेल तर मारा, कैदेत टाकायचे असेल तर टाका मी वस्त्रे स्विकारणार नाही."

महाराजांच्या या बाणेदारपणामुळे मोगली अधिपत्याखालील जनतेला हादरा बसला. कारण की मोगल दरबारात असे बिनधास्त उदगार यापूर्वी कुणी काढले नव्हते समकालीन राजस्थानी पत्रव्यवाहात या विषयी अशी प्रतिक्रिया उमटली आहे. आगे तो सेवाजी की मरदानगी व हिमती ते खलक सराही थी (पूर्वी जनता शिवाजींची मुर्दुमकी व हिंमत यांची स्तुती करीत होती) और अब ओंठो पातशाहजीकी कुजुरी भी आई सखती करी करडा जवाब कहया, तीथे खलक सेवाजी की मरदानगी ते बहूत सरा हो छोजी (आणि आता तर शिवाजी बादशहाच्या दरबारात येऊन प्रत्यक्ष तोंडावर कडक उत्तरे देतो हे पाहून जनता शिवाजीच्या पराक्रमाची खुपच स्तुती करु लागली.)"

बारा मे रोजी औरंजेबाचा पन्नासावा वाढदिवस होता म्हणून त्या दिवशी खास दरबार भरणार होता. दिवाण ए आम झुंबरातोरणांनी आणि पुष्पमाळांनी शृंगारण्यात आला होता. बादशहाचे दरबारात आगमन व्हायच्या अगोदर, दरबाराचे सर्व मानकरी आपापल्या हुद्याप्रमाणे नियोजित जागी उभे होते. कुमार, रामसिंगासमवेत शिवराय दरबारात आले. त्यांच्या बरोबर संभाजी आणि दहा सैनिक होते. सुवर्णतुला झाल्यावर बादशहा औरंगजेब दरबारात आला. एकेक सरदार पुढे येऊन बादशहाला नजराणा पेश करीत होता. शिवरायांनीही पंधराशे सुवर्णपुष्पाचा आणि सहा हजार रुपयांचा नजराणा आणला होता.

छत्रपती शिवरायांनी औरंगजेब बादशहाचा सन्मान केला. परंतु औरंगजेब शिवरायाविषयी आधीच पूर्वग्रहदूषित होता. औरंगजेबाच्या इशाऱ्यानुसार रामसिंग त्यांना सर्वात मागच्या रांगेकडे घेऊन चालला. औरंगजेबाने दरबाराचे काम सुरु केले. औरंगजेबाने ज्या पध्दतीने शिवाजी महाराजांचा अपमान केला त्यामुळे शिवाजी महाराज संतापले पंचहजारी प्राप्त सेनापतीच्या रांगेत उभे करुन शिवरायांचा अपमान केला होता. त्यामुळे शिवराय संतापून म्हणाले हा काय प्रकार आहे. मी काय पंचहजारी सरदार आहे. अरे ! ही पंचहजारी तर माझा मुलगा संभाजीला आहे.

शिवरायांच्या उत्तराने बादशहा संतापला व महाराजांना धडा शिकवावा या हेतूने त्याने जयसिंगाचा मुलगा रामसिंग व फुलादखान यांच्या निगराणीखाली आग्रा येथे कडक पहाऱ्यात ठेवले. तीन महिने महाराज आग्रा येथील कैदेत होते. मृत्यूच्या प्रतिक्षेत असल्यासारखे हे दिवस

त्यांनी काढले व शेवटी आपल्या जिविताला धोका आहे हे लक्ष्यात आल्यावर योजनाबध्द रीतीने वर्ष पालटून गेल्यावर संभाजी राजासह शिताफीने आग्ऱ्याहून निसटले. १७ ऑगस्ट १६६६ रोजी निघून अतिशय खडतर प्रवास करुन राजगडास पोहचले. आग्ऱ्याच्या कैदेत असतांना आपला जीव धोक्यात टाकून महाराजांची सुटका करणारा कोवळ्या वयाचा स्वामिनिष्ठ होता मदारी मेहतर मुस्लिम होता परंतु तो महाराजांचा विश्वासू नोकर होता. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांची कबर रायगडावर बांधण्यात आली. रायगडावर चढतांना डावीकडे ती स्पष्टपणे दिसते. हिरोजी फर्जंद हाही त्यावेळी मदारी महेतर सोबत होता. दोघेही नंतर सुखरुपणे परतले. तेंव्हा महाराजांनी दोघांचाही मोठा सन्मान केला. महाराजांच्या आयुष्यातील अचाट साहसाच्या कृत्यांत या कृत्याला पहिला क्रमांक द्यावा लागेल असे या घटनेवर भाष्य करतांना इतिहास संशोधक ग.ह. खरे यांनी म्हटले आहे. यावरुन शिवरांयाविषयीचे जनमानसातील स्थान लक्षात येते.[३३]

## शिवरायांची सुरतेवरील दुसरी स्वारी (ऑक्टोबर १६७०)

छत्रपती शिवाजी महाराजांनी मुघल साम्राज्यातील संपन्न असे शहर सुरत १६६४ मध्ये पहिल्या स्वारीतून मोठ्या प्रमाणात संपत्ती मिळवून त्या संपत्तीचा उपयोग स्वराज्य निर्मितीत केला. असाच धाडसी प्रयत्न शिवरायांनी ऑक्टोबर १६७० मध्ये केलेला आपल्याला दिसून येतो. पुरंदरच्या स्वारी दरम्यान मुघलांनी स्वराजाचा खूप मोठा प्रदेश उध्वस्त करुन टाकला होता. त्याचा बदला घेण्यासाठी शिवरायांनी दुसऱ्यांदा सुरतेवर स्वारी केली. यात त्यांनी मोठ्या प्रमाणात रोकड, मोहरा, हिरे, मोती, चांदी हस्तगत केली. रक्तरंजित मार्गाचा अवलंब न करता आपल्याला आवश्यक असलेली संपत्ती शिवरायांनी घेतली. तेवढ्यात बऱ्हाणपूरहून मुघलांची कुमक सुरतेकडे येत आहे. समजताच महाराजांनी तळ हलवण्याचे आदेश दिले. या सुरत स्वारीत महाराजांच्या हाती दोन कोटी रुपयांची संपत्ती आली असे काही ठिकाणी उल्लेख आहे. कृष्णाजी अमात्यांनी पाच कोटी संपत्ती मिळाल्याचे सांगतात तर मोगल दरबारात महाराजांनी त्रेपन्न लाखाची संपत्ती सुरतहून नेली असा उल्लेख आहे. महाराज ५ ऑक्टोबरला दुपारच्या सुमारास सुरतेहून बागलानच्या मार्गाने स्वराज्यात परत आले.[३४]

## शिवरायांचा राज्याभिषेक ( ६ जून १६७४)

छत्रपती शिवाजी महाराजांनी वयाच्या पंधराव्या वर्षी १६४५ मध्ये रायरेश्वराच्या मंदिरात स्वराज्याची शपथ घेतली. ती शपथ ६ जून १६७४ रोजी स्वतःस राज्याभिषेक करवून घेऊन पूर्ण केली. त्यासाठी त्यांना खूप संघर्ष करावा लागला. यात स्वकीय आणि परकीय यांच्या सोबत लढावे लागले. त्यात जावळीचे मोरे, सावंतवाडीचे सावंत,शृंगारपुरचे सुर्वे, सिद्दी, पोर्तुगीज, मुघल, विजापूरचे आदिलशाही या सर्वांसोबत संघर्ष करून शिवरायांनी स्वराज्य स्थापन केले.

मध्ययुगातील राज्यपध्दतीनुसार एखाद्या प्रदेशाच्या प्रमुखावरुन त्या प्रदेशाला प्रतिष्ठा आणि महत्त्व दिल्या जात होते. शिवरायांना बंडखोर म्हणूनच त्यांच्याकडे पाहिल्या जात होते. एका जहागिराचा मुलगा म्हणूनच त्यांच्याकडे पाहिल्या जात होते. जिथं त्या प्रदेशाच्या प्रमुखाला मान नाही, सन्मान मिळत नाही तर त्या प्रजेला रयतेला सन्मान मिळण्याचा विषय नव्हता ही गोष्ट जेंव्हा शिवरायांच्या लक्षात आली तेंव्हा आपल्या प्रजेला, आपल्या रयतेला मान, सन्मान मिळवून देण्यासाठी आपल्याला स्वराज्याची स्थापना केलीच पाहिजे. म्हणून स्वतःस राज्याभिषेक करवून घेतला. शिवरायांचा राज्याभिषेक म्हणजे मध्ययुगीन भारताच्या इतिहासातील एक युग क्रांतीकारी घटना होती.

शिवरायांनी मोगलांच्या ताब्यात असलेले आपले किल्ले घेण्याची मोहीम चालू ठेवली. त्याच प्रमाणे आदिलशाही व कुतूबशाही तसेच पोर्तुगीज व इंग्रज यांच्याशीही लढत दिली. १६७० मध्ये वणी-दिंडोरी येथे मुघल सेनापती दाऊदखान याचा समोरासमोर संघर्ष करुन पराभव केला. १६७२ मध्ये साल्हेरचा किल्ला अतुलनीय पराक्रमाने काबीज केला. त्यामुळे प्रभावी अशा मोगलांना त्यांनी नामोहरम केले. १६७२ मध्ये दुसरा आदिलशाही मृत्यू पावला व १६७३ मध्ये त्याच्या ताब्यातील पन्हाळा किल्ला महाराजांनी स्वराज्याला जोडला. अशा उत्तरोत्तर यशोशिखरावर स्वराज्याचा वारु चौखूर दौडू लागतानाच १६७४ च्या फेब्रुवारी महिन्यात शिवरायांचा शूर सेनापती प्रतापराव गुजर हा बहलोलखानाशी लढताना मृत्यू पावला. या काळात

औरंगजेब काबूलच्या आफ्रीदी टोळ्यांशी सामना देण्याकरिता वायव्येकडील मोहिमांमध्ये स्वतःगुंतल्यामुळे त्याला दक्षिणेकडील शिवरायांच्या हालचालीकडे लक्ष द्यायला फुरसत नव्हती. पोर्तुगीजांशी लढण्याकरिता शिवाजी राजांनी भरभक्कम आरमाराची उभारणी केली होती. त्याप्रमाणे दंडाराजपूरी हे ठिकाण ताब्यात घेऊन सिद्दी जौहरचा बंदोबस्त केला. धावपळीतच त्यांच्या आयुष्यात एक दुःखद घटना घडली  काशीबाई या शिवरायांच्या पत्नी १८ मार्च १६७४ रोजी मृत्यू पावल्या. त्यांच्या अंत्यविधीनंतर राजांनी प्रतापराव गुजर यांच्या जागेवर आनंदराव मोहिते यांची सेनापती म्हणून नेमणूक केली. कारण राज्याभिषेक व स्वराज्याच्या नव्या राजधानी संबंधाची योजना या आधीच शिवरायांनी अमलात आणली होती.

६ जून १६७४ म्हणजेच जेष्ठ शुध्द १२, शके १५९६ शुक्रवार हा तो शुभ दिवस उजाडला. रायगडाभोवती भव्य शामियाने उभारले होते. गडावरही मोठा मंडप उभारण्यात आला होता. एक लक्षांवर मांडलिक सरदार, शिपाई व आमंत्रित येथून थांबले होते. सप्त धातूंची व सप्त धान्यांची तुला करुन ते सर्व गोरगरीबांना वाटण्यात आले. पांढरा शुभ्र पोषाख धारण करुन महाराज सोन्याच्या चौरंगावर येवून बसले. डाव्या बाजूला महाराणी सोयराबाई व मागे युवराज संभाजी राजेही स्थानापन्न झाले. मंगलवाद्ये वाजत होती. सर्वांच्या मनातला आनंद चेहऱ्यावरुन ओसंडत होता. शिवाजी राजे छत्रपती झाल्याची घोषणा झाली. या सोहळयासाठी जमलेल्या उपस्थित पाहुण्यांनी नजराणे भेटी देऊन शिवरायांचा सन्मान केला. इंग्रजांचा वकील हेन्री ऑक्सडनने हिरेजडीत अंगठी, शिरपेच, सलकड़ी सादर केली. इंग्रज, फ्रेंच, डच असे परकीयही उपस्थित होते. भेटी नजराणे स्विकारल्यानंतर महाराजांनी आलेल्या पाहुण्यांना भेटी देऊन सन्मान केला. या राज्याभिषेक सोहळयाला एक कोटी ४२ लक्ष होन खर्च आल्याचे जाणकारांचे मत आहे. महाराज सिंहासनावर आरुढ  झाले. जिजाऊ मॉसाहेबांना अत्यानंद झाला. या दिवसापासून शिवशक सुरु होऊन महाराज शककर्ते झाले. महाराजांना मॉसाहेबांनी ऱ्हद्याशी लावून कवटाळले. डोळयातून आनंदाचे समाधानाचे अश्रू आले. आपल्या पुत्राचा अलौकिक स्वसामर्थ्यांचा राज्याभिषेक सोहळा पाहून त्यांचे स्वप्न साकार झाले.[३५]

**राज्याभिषेकाची आवश्यकता का होती ?**

छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वतःस राज्याभिषेक का करुन घेतला? याचा विचार करीत असतांना मध्ययुगीन काळातील धार्मिक, सामाजिक आणि राजकीय परिस्थिती समजून घेणे अतिशय आवश्यक आहे. स्वतःस राज्याभिषेक करवून न घेतल्यामुळे शिवाजी महाराजाला जहागिरदाराचा मुलगा म्हणून एक बंडखोर म्हणून त्यांच्याकडे पाहिले जात होते या सर्व प्रश्नाला उत्तर म्हणून शिवरायांनी राज्याभिषेक केलेला आपल्याला दिसून येतो. शिवरायांची काही उद्दिष्ट्ये आपल्याला पुढील प्रमाणे दिसून येतात.

- शिवरायांना मोगल बादशहा जमीनदार समजत आणि आदिलशहाला शिवराय एका जहागिरदाराचा बंडखोर पुत्र वाटे. ते शिवरायांना राजा मानत नव्हते.
- मराठे सरदार,जमीनदार व जहागिरदारही शिवरायांना राजा म्हणून मान्य करत नव्हते.
- प्रजाही शिवरायांना पूज्य मानत होती पण राजा मानत नव्हती. यामुळे स्वामीनिष्ठेत अनेक अडचणी येत होत्या.
- परकीय सत्ताधिशांशी बरोबरीच्या नात्याने तह करण्यातही अडचणी येत होत्या.
- चौथाई, सरदेशमुखी व इतर कर वसुलीतही अडथळे येत असत.
- शिवरायांना जावळीच्या मोऱ्यांसारखे विजापूरचे अंकित रहाणे पसंत नव्हते.
- महाराष्ट्रातील काही पंडित शिवरायांना क्षत्रिय समजत नव्हते.

या सर्व कारणास्तव शिवरायांने स्वतःस कायदेशीर स्वतंत्र क्षत्रिय छत्रपती सिध्द करण्यासाठी राज्याभिषेक केला. याहीपेक्षा महत्वाचे कारण सांगतांना वा.सी.बेंद्रे म्हणतात, राजकारभारातील दुसरी मोठी अडचण म्हणजे ब्राम्हण गुन्हेगारांच्या शासनाबाबतचे परावलंबित्व कोणताही वाद ब्राम्हणांनी उपस्थित केला तर शिवाजी महाराजांना निर्णय घेण्यास रुढीने मान्यता नव्हती. ब्राम्हणाकडून सर्व वाद सोडवावे लागत. तत्ससबंधीची आज्ञा पंडीतरावाच्याच नावाने

काढणे भाग असे इतर लोकांना त्यामुळे त्रास होई. शिवरायांना राजा म्हणून प्रतिष्ठा नसल्याने शिवाजीराजांना सामाजिक व धार्मिक बाबतीत निर्णय घेण्याचा अधिकार नव्हता. हा रुढीचा दंडक राज्य कारभारात आडवा येऊ लागला. अशा परिस्थितीत उभारलेले राज्य वाढत्या तेढीने लयास जाण्याची धास्ती वाटू लागली. प्रजेलाही हा त्रास जाणवत होता म्हणून छत्रपती शिवाजी महाराजांनी सर्वसामांन्याना न्याय देण्यासाठी रयतेचे राज्य निर्माण करुन शिवरायांनी स्वत:स राज्याभिषेक करवून घेतला.[३६]

**मातोश्री जिजाऊंचे निधन ( १७ जून १६७४)**

राजमाता जिजाऊंचे ह्या शिवरायांचे प्रेरणा स्त्रोत होत्या. त्या स्वराज्य संकल्पिका होत्या. या उभ्या महाराष्ट्रात स्वराज्य निर्माण व्हावे हे जिजाऊंचे स्वप्न होते. त्या स्वप्नांच्या पूर्ततेसाठी मातोश्री जिजाऊंनी वेळोवेळी शिवरायांना मार्गदर्शन आणि सहकार्य केले. कठिण प्रसंगी शिवरायांना आधार दिला. अशा जिजाऊंचे निधन झाल्यामुळे शिवराय खचले. पण त्यातून त्यांना लगेच सावरणे आवश्यक होते. कारण स्थापन झालेल्या स्वराज्याचे रुपांतर सुराज्यात करावयाचे होते आई साहेब जिजाऊ उतरत्या वयाकडे झुकल्या होत्या त्या थकल्या होत्या. रायगडावरील हवा त्यांना सोसवत नव्हती. त्यामुळे त्यांच्या राहण्याची व्यवस्था 'पाचाड' येथे महाराजांनी केली होती. राज्याभिषेकासाठी त्या रायगडावर आल्या. राज्यभिषेक सोहळा संपल्यानंतर त्या पुन्हा पाचाड येथे जाऊन राहिल्या महाराजांच्या राज्याभिषेकानंतर मॉसाहेब धन्य झाल्या. आता काही बाकी नव्हते. पाचाडला गेल्यावर मॉसाहेबांची प्रकृती खालावली आणि आता या आजारपणातून उठणे शक्य नव्हते. महाराजांच्या उरी घालमेल झाली. खूप प्रयत्न झाले. मात्र वैद्य हरले. १७ जून १६७४ रोजी राजमाता राष्ट्रमाता जिजाऊंचे निधन झाले. स्वराज्य शोकसागरात बुडाला. राजमाता जिजाऊंनी शिवरायांना लहानपणापासून जे संस्कार करुन शिवरायांना स्वराज्य स्थापनेसाठी तयार केले होते. ते सर्व संस्कार शिवरायांच्या डोळ्यापुढे तरळू लागले कठिण प्रसंगी जिजाऊंनी शिवरायांचे स्वराज्य स्थापनेचे प्रेरणास्थान आणि प्रेरणास्त्रोत होत्या.त्यांच्या जाण्याने स्वराज्यात खूप मोठी पोकळी निर्माण झाली.[३७]

**दुसरा शिवराज्याभिषेक - ( २४ सप्टें. १६७४)**

छत्रपती शिवाजी महाराजांनी दुसऱ्यांदा राज्याभिषेक का केला? हा सर्व अभ्यासकांच्या आणि जाणकारांच्या चिंतनाचा विषय आहे. पहिल्या राज्याभिषेकाच्या वेळेस एक गट शिवरायांवर नाराज होता. आणि त्या गटाचा प्रमुख होता. निश्चलपुरीचा गोसावी हा व्यक्ती तांत्रिक विद्येत प्राविण्य होता. त्याचे असे म्हणणे होते की, पहिल्या राज्याभिषेकावेळेस काही चुका झाल्या म्हणून अनेक अनिष्ट घटना घडल्या त्यात महत्त्वाची घटना म्हणजे मातोश्री जीजाऊंचे निधन झाले असे समजण्यात येऊ लागले. परंतू पहिल्या राज्याभिषेकाचा आणि मातोश्री राजमाता जिजाऊ यांच्या निधनांचा काहीही सबंध नव्हता.मातोश्री  जिजाऊंचे खूप वय झाले होते.त्या वार्ध्यक्याकडे झुकल्या होत्या म्हणून त्यांचे निधन झाले.त्यामुळे जिजाऊंचे निधन आणि राज्याभिषेक यांचा सबंध जोडून अंधश्रध्दा मानणे अतिशय चुकीचे आहे ही गोष्ट शिवरायांना पुर्णपणे माहीत होती. आधीच ठरल्याप्रमाणे ६ जून १६७४ रोजी राज्याभिषेक झाला. आणि अवघ्या १० दिवसांनी म्हणजे १७ जून १६७४ रोजी जिजाऊंचे निधन झाले. ही गोष्ट योगायोगाने घडून आली होती. यात शुभ किंवा अशुभ असे काहीच नव्हते. यातून शिवरायांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

छत्रपती शिवाजी महाराजांना आपल्या स्वराज्याच्या कार्यात सर्व समाज घटकांना सामावून घ्यायचे होते. तत्कालीन समाजात धार्मिक घटकाचा प्रभाव होता. एवढेच नाही तर त्या धर्मातील विविध संप्रदायाचा सुध्दा प्रभाव होता. निश्चलपुरीचा गोसावी हा प्रमुख होता. निश्चलपुरीचा गोसावी हा तांत्रिक विद्येत प्रवीण होता.

छत्रपती शिवाजी महाराज हे वैज्ञानिक दृष्टिकोन मानणारे होते. त्यामुळे कोणत्याही अंधश्रध्देला बळी पडून छत्रपती शिवाजी महाराजांनी दुसरा राज्याभिषेक केला नाही तर सर्व वर्गाना सामावून घेण्यासाठी शिवाजी महाराजांनी दुसरा राज्याभिषेक केलेला होता.

अशा प्रकारे २४ सप्टें १६७४ रोजी छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वतःस दुसरा राज्याभिषेक करवून घेतला.[३८]

**दक्षिण दिग्विजय मार्च १६७७ (दक्षिणेतील मोहीम)**

प्राचीन काळापासून ते मध्ययुगीन काळापर्यंत आणि पुढे उतर मध्ययुगीन काळात एखाद्या राजाने एखाद्या सम्राटाने राजगादी प्राप्त केल्यानंतर, मोहिमेवर जाऊन पराक्रम गाजविण्याची प्रथा होती. त्या प्रथेप्रमाणे छत्रपती शिवाजी महाराजांनी दक्षिण मोहिम काढण्याचे ठरविले.

शिवरायांनी  मार्च १६७५ मध्ये रायगडाहून दक्षिणेकडे प्रयाण केले.त्यांनी पहिला मुक्काम केला तो राजापूरला तेथे ते तीन दिवस राहिले. छत्रपती शिवरायांच्या जीवनातील त्यांची दक्षिणेतील मोहीम म्हणजे त्यांची रणनीती, राजनीती आणि त्यांच्या दूरदृष्टीचे दर्शन घडविणारी अत्यंत यशस्वी मोहीम होती. या मोहिमे मागील एक अंतस्त हेतू असा होता की, पूर्वी दक्षिणेतील चार सुलतानांनी एकत्र येऊन नष्ट केलेल्या विजयनगरच्या हिंदू साम्राज्याचे पुनर्जीवन करण्याचा यशस्वी प्रयत्न करुन दक्षिणेतील सर्व हिंदूमध्ये तसा आत्मविश्वास निर्माण करावा म्हणजे भविष्यात त्याचा उपयोग उत्तरेकडून होणाऱ्या मुघल आक्रमणाच्या वेळी करता येईल. आणि झालेही तसेच शिवरायांनी या मोहिमेत जिंकून घेतलेल्या जिंजीच्या किल्याचा उपयोग खुद्द शहेनशहा औरंगजेब दक्षिणेत सर्व शक्तिनिशी येऊन स्वराज्यातील एका पाठोपाठ एक किल्ले घेत सुटला असताना, दुय्यम राजधानी म्हणून छत्रपती राजाराम महाराजांना अत्यंत प्रभावीपणे करता येऊन स्वराज्य औरंगजेबाच्या वावटळीपासून राखता आले.

गेली अनेक वर्ष मुसलमानांचे मांडलिकत्व मान्य केलेले दक्षिणेतील लहान लहान राजे, दक्षिणेतील मुसलमानी राजवट खिळखिळ होताच शिवरायांच्या खंबीर, झुंजार आणि प्रभावी नेतृत्वाचे स्वागत करतील ही खात्रीलायक बातमी बंगलोर येथे शहाजी राजांची जहागिर शिवरायांचा सावत्र भाऊ व्यंकोजी यांच्या वतीने सांभाळणारे मुत्सदी रघुनाथ हणमंते यांनी समक्ष येऊन शिवरायांना दिली होती. ती माहिती लक्षात ठेवूनच आपले विश्वासू सहकारी येसाजी कंक, सुर्याजी मालुसरे आणि सरनौबत हंबीरराव मोहिते यांच्या नेतृत्वाखाली २५००० स्वार, किल्ले जिंकण्यासाठी निवडक सैनिक बरोबर घेऊन ते निघाले होते. वाटेत जंगल तोडणे, दगड फोडणे, सुरुंग पेरेणे या

कामातील वाकबगार कामगारानाही सोबत घेतले होते. संपूर्ण स्वारीचा सरंजाम एखाद्या छत्रपतीला साजेसा ठेवून दक्षिणेतील संबधितांवर छाप पडेल असा ठेवला. असला तरी, अनावश्यक चैनीच्या वस्तू आणि स्त्रिया, त्यांच्या स्वारी बरोबर नव्हत्या, कारण तो प्रवास शत्रूच्या भागातून होणार असल्याने वेग आणि गुप्त हालचालींना जास्त महत्व देण्यात आले.[३९]

## स्वराज्याची व्यवस्था

आपण दक्षिणेत असताना स्वराज्याच्या संरक्षणाची त्यांनी चोख व्यवस्था करुन ठेवली होती. उत्तरेला साल्हेर पर्यंतच्या मुलुखाची जबाबदारी मोरोपंत पेशव्यांवर तर रायगड पन्हाळ्यापर्यंतचा मुलुख आण्णाजी दत्तो आणि पन्हाळ्यापासून कारवारपर्यंत दत्ताजी त्र्यंबक यांच्या देखरेखीसाठी नेमून दिला होता. खुद्द रायगड रावजी सोमनाथाच्या ताब्यात दिला होता. दक्षिणेतील या स्वारीच्या खर्च्याच्या सोयीसाठी गोवळकोंड्याचा सुलतान कुतुबशाहा यांच्या कडून परस्पर करवून घेतली होती.[४०]

## दक्षिण मोहिमेला प्रस्थान

६ ऑक्टोबर १६७६ ला विजयादशमीच्या दिवशी शिवरायांनी रायगड सोडले. आणि सह्याद्रीच्या आडोशाने ते पटगावापर्यंत आले. तेथे आपल्या सैन्याचे दोन भाग करुन एक भाग सरनोबत हंबीरराव मोहित्यांच्या नेतृत्वाखाली विजापूरच्या दक्षिणेकडून पाठविले. याचा हेतू असा होता की, विजापूरी सैन्याला शिवरायांची मोठी मोहीम विजापूरच्या दक्षिणेकडून जात असल्याचे समजून त्याचे सारे लक्ष त्या सैन्यावर केंद्रित होईल आणि विजापूरच्या उत्तरेकडून विजापूरच्याच प्रदेशातून गोवळकोंड्याकडे वेगाने निघालेल्या खुद्द शिवरायांना सुखरुप निघून जाता यावे आणि झाले ही तसेच हंबीरराव मोहित्यांच्या मराठी फौजेची बातमी विजापूरास कळताच विजापूरी सरदार हुसेनखान मियांना याने स्वत: धाव घेऊन त्यांना गदग जिल्ह्यातील येलबर्गा येथे रोखण्याचा प्रयत्न केला. पण हंबीरराव यांनी शिवरायांच्या युध्दनितीप्रमाणे आपणच हुसेनखानावर जोराचा हल्ला

केला. विजापूर सैन्याचे खूप नुकसान केले. खुद्द हुसेनखान मराठ्यांचा कैदी झाला. हंबीररावाने या लढाईत दोन हजार घोडे आणि काही हत्ती ही मिळवले. १६७७ च्या जानेवारीत ही लढाई झाली. हंबीररावाच्या या हालचालीमुळे विजापूरच्या उत्तरेकडून गोवळकोंड्याकडे विजापूरकरांच्या हद्दीतून जात असलेल्या शिवरायांकडे त्यांचे लक्षच गेले नाही. शिवराय पाच फेब्रुवारीला भागानगरला सुखरुप पोहचले. प्रत्येक हालचालीतील ही सावधगिरी हे शिवरायांच्या युध्द नितीचा एक भाग होता.[४१]

**गोवळकोंड्याला भेट : (मार्च १६७७)**

छत्रपती शिवराय दक्षिण स्वारीवर निघाले. दक्षिण स्वारीवर जाताना त्यांनी गोवळकोंड्याचा अबुलहसन कुतुबशाहा याने त्यांना भेटीचे आमंत्रण दिले होते, तेंव्हा प्रथम कुतुबशाहाच्या राजधानीला भेट देऊन मग दक्षिण दिग्विजयासाठी पुढे जायचे, अशी योजना त्यांनी आखली. गोवळकोंडा हीच कुतुबशाहाची राजधानी होती. कुतुबशाहाने महाराजांच्या स्वागतासाठी मोठी तयारी केली. भेटीसाठी खास तंबू उभारला. शिवराय राजधानीत येऊन दाखल झाले. त्यांचे दर्शन घेण्यासाठी रस्तोरस्ती लोक दुतर्फी उभे होते. त्यांच्या पराक्रमाच्या बातम्या देशात चहूकडे पसरल्या होत्या अफजलखानाचा वध, शाहिस्तेखानाची फजिती आणि आगऱ्याहून सुटका या रोमहर्षक प्रसंगाची हकीकत देशभर पसरली होती. त्यामुळे तेथे महाराजांचे प्रचंड स्वागत झाले घराघरांतून लोक महाराजांवर फुलांचा वर्षाव करत होते. लोकांचे स्वागत स्वीकारुन महाराज कुतुबशाहाच्या दरबारात आले. कुतुबशाहा त्यांना सामोरा गेला. खास तयार केलेल्या बरोबरीच्या सिंहासनावर त्याने महाराजांना बसवले. त्याने महाराजांच्या सत्कारात कसलीही कमतरता राहू दिली नाही.

छत्रपती शिवाजी महाराजांनी दक्षिणेच्या मोहिमेवर जातांना कुतुबशाहाची फौजही आपल्या सोबत घेतली. १० मार्च १६७० ला गोवळकोंडा सोडले. त्यांचे १६००० घोडदळ आणि ३२००० पायदळ त्यांच्या सोबत होतेच दक्षिणेतील प्रदेश जिंकल्याबरोबर तेथील राज्यकारभार त्यांच्या हाती सोपविता येईल असे बिनलष्करी अधिकारी ही त्यांनी सोबत घेतले होते. आपण दक्षिणेत आणखी

खाली जात असतांना विजापूरी बहलोलखानाने येऊन त्रास देऊ नये म्हणून गोवळकोंड्याचा कारभारी मादण्णा आणि सेनापती इब्राहिमखान यांना २००० घोडेस्वार आणि खूप मोठे पायदळ घेऊन विजापूरी हद्दीकडे पाठविण्यास राजे विसरले नाहीत. यावरुन छत्रपती शिवाजी महाराज मोहीमेवर असतांना किती दक्ष असत हे लक्ष्यात येते. भागानगर सोडल्यावर महाराज कृष्णा आणि तुंगभद्रा ओलांडून कर्नुलला पोहचले. तेथून काही मोजके लोक बरोबर घेऊन ते श्रीशैल्यमचे दर्शन घेण्यासाठी श्रीशैल्यमला आले. तोपर्यंत त्यांची सेना आत्माकुरला येऊन पोहचली होती. त्यानंतर तिरुपतीला जाऊन त्यांनी बालाजीचे दर्शन घेतले. मग मे महिन्याच्या सुरुवातीला ते मद्रासला पोहचले आणि तेथून त्यांनी लगेच जिंजीला पोहचले.[४२]

## शिवरायांनी जिंजीचा किल्ला जिंकला ( २० मे १६७७ )

छत्रपती शिवाजी महाराज पूर्वकिनाऱ्यावर आले. चेन्नईच्या दक्षिणेस जिंजीचा किल्ला आहे. हा रायगडाप्रमाणेच प्रचंड आणि मजबूत होता. त्याला वेढा घालून महाराजांनी तो किल्ला जिंकला. दक्षिणेत स्वराज्याचे एक मजबूत ठाणे तयार झाले. नंतर त्यांनी वेलूरच्या किल्ल्याला वेढा दिला. कित्येक महिने वेढा देऊनही किल्ला ताब्यात येईना. तेंव्हा वेलूरजवळच्या डोंगरावरुन शिवरायांनी त्या किल्यावर तोफाचा मारा केला आणि किल्ला सर केला. त्यांनी कर्नाटकात एकूण वीस लक्ष उत्पन्नाचा प्रदेश आणि कित्येक छोटे मोठे किल्ले जिंकले.[४३]

## व्यंकोजीराजांची भेट (जुलै १६७७)

छत्रपती शिवाजी महाराजांनी आपले सावत्र भाऊ व्यंकोजी राजे यांना भेटीसाठी बोलावले तेव्हा ते नाखुशीने आले. महाराजांनी त्यांचा योग्य सत्कार केला. त्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. स्वराज्याच्या कार्यात व्यंकोजीराजांनी सहकार्य करावे, अशी त्यांनी त्यांना गळ घातली. काही दिवस व्यंकोजीराजे महाराजांबरोबर राहिले, परंतु एका रात्री महाराजांना काही न कळवता ते तंजावरला निघून गेले आणि उलट त्यांच्या फौजेवरच त्यांनी हल्ला केला. तेंव्हा महाराजांच्या

फौजेने त्यांचा समाचार घेतला. व्यंकोजीराजांचा पराभव झाला. आपल्या भावाच्या अशा वागणूकीमुळे महाराजांना फार वाईट वाटले. त्यांनी व्यंकोजीराजांना समजुतीची पत्रे पाठवली जिंजीच्या दक्षिणेकडील काही प्रदेश त्यांना दिला. त्यांची पत्नी दिपाबाई यांनाही महाराजांनी चोळी बांगडीसाठी कर्नाटकातील थोडा प्रदेश दिला. महाराजांनी व्यंकोजीराजांना पत्रात लिहिले परक्या शत्रूंचा भरवसा धरु नये पुरुषार्थ गाजवावा.

अशा प्रकारे छत्रपती शिवाजी महाराजांनी आपले सावत्र भाऊ व्यंकोजीराजे भोसले यांना स्वराज्याच्या कार्यात सामावून घेण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यात त्यांना यश आले नाही तरीही आपल्या भावाविषयी असलेले त्यांचे प्रेम कमी झाले नाही. या घटनेतून शिवरायांचे मोठेपण आपल्याला दिसून येते.[४४]

**छत्रपती शिवाजी महाराजांचे निधन ( ३ एप्रिल १६८०)**

छत्रपती शिवाजी महाराजांनी वयाच्या १५ व्या वर्षी १६४५ मध्ये रायरेश्वराच्या मंदिरात स्वराज्याची शपथ घेतली आणि ६ जून १६७४ रोजी स्वराज्याची स्थापना करुन स्वतःस राज्याभिषेक करवून घेतला हा २९ वर्षाचा कालखंड अनेक संकटाने भरलेला होता. या अनेक संकटातून मार्ग काढून छत्रपती शिवाजी महाराजांनी हे स्वराज्य निर्माण केलेले होते.

छत्रपती शिवाजी महाराजांनी युवराज राजाराम महाराजांचे वयाच्या १० वर्षी लग्न आपल्या समक्ष केले. त्यानंतर सेनापती प्रतापराव गुजर ज्यांनी बहलोलखानाच्या अफाट फौजेवर केवळ सहा वीरांना सोबत घेऊन हल्ला केला आणि मरण पत्कारले. प्रतापरावांच्या या बलिदानाला उतराई म्हणून महाराजांनी त्यांची मुलगी जानकीबाई हिच्याशी राजारामाचा विवाह ठरवला. १५ मार्च १६८० रोजी हा विवाह सोहळा पार पाडला. छत्रपती शिवाजी महाराजांना तर संपूर्ण भारतखंड जिंकायचा होता. मात्र आता हे आजारपण मागे हटण्याचे नाव घेईना. महाराज रायगडावर होते. त्यांचे ध्येय महाराष्टापुरते मर्यादित नव्हते. कर्नाटकाची मोहिम याची साक्ष देते. रामेश्वरापर्यंत सत्ता स्थापनेची त्यांची मनिषा होती. पश्चिमेकडे आरमार उभारणीसाठी त्यांनी प्रयास केले. दीव-दमण पर्यंत ठाणी

बसविली. आयुष्याच्या शेवटच्या दशकात त्यांनी गुजरात मध्ये स्वाऱ्या केल्या. आणखी बरेच कर्तव्य बाकी होते. पण भारत भूमीस मुक्त करण्याच्या ह्या कार्यास आणखी काही काळ हवा होता. परंतु तसे झाले नाही. तसे तर महाराजांचे अर्धे आयुष्य अजूनही बाकी होते. इ.स. १६८० च्या एप्रिल महिन्यास जेमतेम सुरुवात झाली होती. पण नियतीसमोर कुणाचे काय चालणार? पोटशूळ मस्तकशूळ, गुडघेदुखी यासारखे आजार सततच्या दगदगीमुळे अविरत घोडदौडीमुळे बळावले. ज्वरास उतार पडत नव्हता. त्यातच ३ एप्रिल १६८० रोजी छत्रपती शिवरायांचे निधन झाले त्यामूळे स्वराज्य पोरके झाले.[४५]

**छत्रपती शिवाजी महाराजांच्या ताब्यातील प्रदेश :-**

छत्रपती शिवाजी महाराजांनी वयाच्या १५ व्या वर्षी तोरणा किल्ला जिंकून जणू स्वराज्याचे तोरणच बांधले. उतरोत्तर शिवरायांच्या स्वराज्याचा विस्तार होत गेला. शिवाजी महाराजांच्या राज्याचे दोन भाग होते.

१. **स्वराज्य :-** स्वतःच्या ताब्यात असलेला प्रदेश.

२. **मोगलाई :-** परकीयांच्या ताब्यात असलेले परंतु मराठ्यांना खंडणी देणारा प्रदेश.

छत्रपती शिवाजी महाराजांच्या ताब्यात असलेला प्रदेश पुढील प्रमाणे आहे.

- छत्रपती शिवाजी महाराजांच्या वडिलोपार्जित पुण्याचे आसपासच्या जहागिरीचा प्रदेश.
- मावळप्रांत - यांत हल्लीचे मावळ, सासवड जुन्नर आणि खेड हे तालुके येतात. यात अठरा डोंगरी किल्ले होते.
- वाई, सातारा आणि कऱ्हाड प्रांत, हल्लीच्या सातारा जिल्ह्याचा पश्चिम भाग, यांत पंधरा किल्ले होते.
- पन्हाळप्रांत - यात कोल्हापूरचा पश्चिम भाग येतो. यात तेरा किल्ले होते.

- दक्षिण कोकण, म्हणजे हल्लींचा रत्नागिरी जिल्हा यांत जलदुर्गाचा समावेश झाल्यामुळे ५८ किल्ले होते.
- उत्तर कोकण म्हणजे ठाणे यात १२ किल्ले होते.
- बागलाण त्रिंबक म्हणजे नाशिक जिल्ह्याचा पश्चिम भाग, यात ६२ डोंगरी किल्ले येतात.
- वनगड प्रांत म्हणजे हल्लींच्या धारवाड जिल्ह्याचा दक्षिण भाग यात २२ किल्ले असून संरक्षणासाठी स्वतंत्र फौज ठेवावी लागत होती.
- म्हैसूर संस्थान -म्हैसूर संस्थानात बेदनूर, कोलार व श्रीरंगपट्टण हा भाग येत होता यात १८ किल्ले समाविष्ट होते.
- कर्नाटक प्रांत - कृष्णेच्या दक्षिण तीराचा नविन जिंकलेला प्रदेश होता. यात १८ किल्ले समाविष्ट होते.
- वेल्लुर प्रांत - वेल्लूर प्रांत म्हणजे हल्लीचा अर्काट जिल्हा होय. यात पंचवीस किल्ले होते.
- तंजावर प्रांत यात ६ किल्ले होते .

अशा प्रकारे वरील सर्व प्रांत आणि किल्ले स्वराज्यात समाविष्ट होते.त्यामुळे स्वराज्य सक्षम आणि बलशाली झाले होते.[४६]

**छत्रपती शिवरायांची लष्कर व्यवस्था**

प्राचीन काळापासून आधुनिक काळापर्यंत प्रत्येक राज्याला, प्रदेशाला, देशाला आपल्या देशाचे संरक्षण करण्यासाठी संरक्षण व्यवस्था सज्ज ठेवावी लागते. छत्रपती शिवाजी महाराजांचा काळ तर मध्ययुगीन काळखंड होता. या काळात सैन्याला अतिशय महत्वाचे स्थान होते. आपले जे राज्य वाढणार होते. ते या सैनिकांच्या बळावरच वाढणार होते. म्हणून छत्रपती शिवाजी महाराजांनी आपल्या लष्कर व्यवस्थेकडे लक्ष दिले.

छत्रपती शिवरायांचे लष्कर हे दोन प्रकारचे होते. एक घोडदळ व दुसरे पायदळ,

१. घोडदळ

२. पायदळ

घोडेस्वाराहून पायदळचा भरणा मोठा असे. दहा पायदळावर एक नाईक असे. अशा पाच तुकड्यावर एक हवालदार असे. दोन हवालदारावर एक जुमलेदार व दहा जुमलेदारावर एक हजारी असे. अशा पाच हजार फौजेवर सरनोबत असे.

पायदळातील शिपाई मावळे व हेटकरी या दोन जातींचे असत . मावळे हे घाटमाथ्यावर राहणारे व हेटकरी कोकणात राहणारे. दोघेही अवघड जागी चढून जाण्यात पटाईत असत. बंदूक, ढाल, तलवार, बरची, तीरकमठा ही त्यांची हत्यारे असून ती त्यास आपल्या स्वःखर्चाने घ्यावी लागत. दारुगोळा मात्र सरकारातून मिळे. प्रथमतःनोकरीत ठेवतांना उसने धान्य देऊन ठेवीत . परंतु पुढे हुशारी दिसून आल्यावर त्यास एकपासून तीन होना पर्यंत दरमहा पगार दिले जात असत. जुमलेदारास दरवर्षाला शंभर होन, पगार दिली जात असे. तर एक हजारी यास दर वर्षाला पाचशे होन व पंचहजारी यास दरवर्षाला अडीच हजार होन पगार मिळत असे. शिवाय पंचहजाऱ्यास सरकारांतून पालखी मिळत असे.

अशा प्रकारे छत्रपती शिवरायांनी आपल्या स्वराज्याची उभारणी करतांना लष्करला किती महत्व दिले होते हे यावरुन दिसून येते.[४७]

**छत्रपती शिवरायांच्या लष्कराची रचना**









**छत्रपती शिवाजी महाराजांनी किल्ल्यांचे ओळखलेले महत्व**

मध्ययुगामध्ये किल्ल्याचे महत्व अनन्य साधारण होते. किल्ला ताब्यात असला की, आजूबाजूच्या प्रदेशावर नियंत्रण ठेवता येत होते. परचक्र आल्यास किल्याच्या आश्रयाने प्रजेचे रक्षण करता येते. किल्यावरती लष्करी शिबंदी अन्यधान्य, युद्धोपयोगी साहित्य, दारुगोळा यांचे भांडार उभे करता येते. स्वराज्यस्थापनेच्या कार्योतील किल्याचे महत्व आज्ञापत्रात सांगितलेले आहे. ते असे, हे राज्य तर तीर्थरुप थोरले कैलासवासी स्वामींनी गडावरुनच निर्माण केले.

स्वराज्यामध्ये सुमारे २४० किल्ले होते. या किल्यांच्या बांधणी व दुरुस्तीवर महाराजांनी मोठा खर्च केला. प्रतापगड, पावनगड, राजगड यासारखे डोंगरी किल्ले बांधले. प्रत्येक किल्यावर कारखानीस, किल्लेदार व सबनीस हे अधिकारी असत. याखेरीज किल्यावरील धान्याची कोठी आणि युध्द साहित्याची व्यवस्था पाहण्यासाठी कारखानीस हा अधिकारी असे.

छत्रपती शिवाजी महाराजांना किल्याचे खूप महत्व वाटत होते. म्हणून त्यांनी आपल्या उत्पन्नाचा मोठा भाग किल्यावर खर्च केला होता. परंतू त्यांच्या जवळच्या व्यक्तीनी शिवरायांना

किल्यांवरचा खर्च जास्त होतो असे म्हटले. तेंव्हा छत्रपती शिवाजी महाराजांनी दिलेले उत्तर विलक्षण आहे. "जैसा कुळंबी शेतास माळा घालून शेत राखितो, तसे किल्ले राज्यास रक्षण आहेत. तारवांस खिळे मारुन बळकट करितात. तशी राज्यास बळकटी किल्यांची आहे. किल्यांच्या योगाने औरंगशहा सारख्याची उमर गुजरुन जाईल." आपणास धर्मस्थापना व राज्यसंपादन करणे सर्वास अन्न देऊन, शत्रूप्रवेश न होय, ते किल्यामुळे होते, सर्वांचा निर्वाह आणि दिलिंद्रासारखा शत्रु उरावर आहे. तो आला तरी नवे जुन्ने तीनशे साठ किल्ले आजमीतीसआहेत. एक एक किल्ला वर्ष वर्ष लढला, तरी तीनशे साठ वर्ष पाहिजेत."

यावरुन छत्रपती शिवाजी महाराजांची दूरदृष्टी आणि स्वराज्याच्या बळकटीसाठी किल्यांचे असलेले महत्त्व दिसून येते.[४८]

**भारतीय आरमाराचे जनक - छत्रपती शिवाजी महाराज**

भारताच्या पश्चिम किनारपट्टीवर गोव्याचे पोर्तुगीज, जंजिऱ्याचे सिद्दी तसेच सुरत व राजापूरचे इंग्रज वखारवाले हे शत्रू स्वराज्य विस्ताराच्या कार्यात अडथळा आणत. या अडथळयास, पायबंद घालणे आणि पश्चिम किनारपट्टीचे रक्षण करणे याची आवश्यकता होती. यासाठी महाराजांनी आरमार उभे केले. 'ज्याच्याजवळ आरमार त्याचा समुद्र' हे महाराजांनी ओळखले होते.

आरमाराबरोबरच महाराजांनी सागरी किल्यांचेही महत्व ओळखले होते. त्यांनी बांधलेल्या जलदुर्गापैकी मालवणचा सिंधुदुर्ग हा उत्कृष्ट सागरी किल्ला आहे. या किल्याच्या बांधणी मध्ये भक्कमपणा यावा यासाठी किल्याच्या पायाभरणीसाठी पाच खंडी शिसे ओतले होते. सिद्दीला शह देण्यासाठी राजापूरीसमोर पदमदुर्ग नावाचा सागरी किल्ला बांधला. आपल्या एका पत्रात या किल्याविषयी महाराज म्हणतात, पदमदुर्ग वसवून राजपुरीच्या उरावरी दुसरी राजपुरी उभी केली.

आरमारात विविध प्रकारची चारशे जहाजे होती. यांमधील गुराब, गलबत व पाल ही लढाऊ जहाजे होती. कल्याण भिवंडीची खाडी विजयदुर्ग, मालवण येथे जहाजे बांधली जात. मायनाक भंडारी व दौलतखान हे आरमाराचे प्रमुख अधिकारी होते.[४९]

## छत्रपती शिवाजी महाराजांचे प्रशासन

छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वराज्याची स्थापन केली. स्वतःस राज्याभिषेक करवून घेतला. राज्याभिषेकानंतर महाराजांनी दक्षिण दिग्विजय केला. स्वराज्याचा विस्तार झाला. या स्वराज्यात महाराष्ट्रातील नाशिक, पुणे, सातारा, सांगली , कोल्हापूर, सिंधूदुर्ग, रत्नागिरी, रायगड व ठाणे या जिल्ह्यामधील बराचसा प्रदेश अंतर्भूत होता. तसेच कर्नाटक राज्यातील बेळगाव, कारवार व धारवाड जिल्ह्यातील काही भाग आणि तमिळनाडू राज्यातील जिंजी, वेल्लोर आणि आसपासचा भाग स्वराज्यात समाविष्ट झालेला होता. स्वराज्याचा कारभार सुरळीतपणे व्हावा, त्यामध्ये लोकांचे कल्याण साधले जावे यासाठी महाराजांनी स्वराज्याची घडी बसवली.

### अष्टप्रधान मंडळ -

शिवाजी महाराजांनी राज्याभिषेक प्रसंगी अष्टप्रधान मंडळाच्या नेमणूका केल्या राज्यकारभाराच्या सोईसाठी आठ खात्यांमध्ये विभागणी केली. प्रत्येक खात्याच्या प्रमुखपदी मंत्र्यांची नेमणूक केली. असे एकूण आठ मंत्री होते. हेच ते 'अष्टप्रधान' मंडळ होय. मंत्र्यांची नेमणूक करणे किंवा त्यांना त्यांच्या पदावरुन दूर करणे, हा महाराजांचा अधिकार होता. आपापल्या खात्याच्या कारभारासाठी हे मंत्री महाराजांना जबाबदार होते.

पुढील प्रमाणे आठ मंत्र्यांना आप आपल्या कामाची विभागणी करुन देण्यात आली होती.

### १. मुख्यप्रधान पेशवा - प्रधान खाते

यांच्याकडे मुलकी व लष्करी अशा दोन्ही खात्यांची जबाबदारी असे. खलिते राजपत्र, फर्मानावर शिक्कमोर्तब करण्याचा अधिकार त्यांना असे. त्यांना राज्यकारभार करतांना युध्दाच्या वेळी ससैन्य स्वारीवर जावे लागत असे. बाकी महाराजांच्या आदेशात राहून इतर लष्कर सरदारास पंतप्रधानांच्या आदेशात रहावे लागत असे. या पदावर मोरोपंत पिंगळेंची नेमणूक करण्यात आलेली होती.

**२. अमात्य (मुजुमदार )**

राज्यकारभाराची आर्थिक घडी सुव्यवस्थित राखण्यासाठी जमाखर्च ठेवल्या जाई. विविध प्रांत, किल्ले लष्कर या सगळयांचा हिशेब ठेवण्याकरिता पुष्कळ कारकून असायचे अमात्यास दप्तरदार फडणीसांकडून सगळी कामे करुन घ्यावी लागत. नारो निळकंठ आणि रामचंद्र निळकंठ यांच्याकडे अमात्यपद होते.

**३. सुरनीस पत्रव्यवहार महसूल**

हे पद अण्णाजी दत्तो यांच्याकडे देण्यात आले. यांच्याकडे पत्रव्यवहार तपासण्याचे काम असे पत्रे वाचून कमी-जास्त मजकूर बघणे संमत असे खुण करावी लागत असे.

**४. वाकनीस - खाजगी कारभार**

दत्ताजी त्र्यंबक यांच्याकडे हे पद देण्यात आले होते. यांना राज्यकारभारातील दैनंदिन घटनामध्ये सावधानता बाळगावी लागत असे. महाराजांची दिनचर्या लिहिणे. हुजूरपणा, अठरा कारखाने, बारा महाल, याची व्यवस्था बघणे, येणाऱ्या जाणाऱ्यावर सक्त नजर ठेवावी जेणेकरुन दगाफटका टळेल.

वरील चारही पदांवरील अधिकाऱ्यांची जागा महाराजांच्या उजवीकडे असे.

**५. सेनापती - सरनोबत**

हंबीरराव मोहीते हे सेनापती होते. घोडदळ आणि पायदळ या दोन्ही विभागाचे दोन लष्करी अधिकारी होते. घोडदळावरील लष्करी अधिकारी हा सेनापती म्हणून संबोधल्या जात असत.

**६. सुमंत - डबीर**

सुमंताचा संबंध परप्रांतातील पत्रव्यवहाराशी असायचा, परप्रांताशी पत्रव्यवहार करणे, युध्दाबाबत सल्ला मसलत करणे, गुप्तहेर या सगळयांची जबाबदारी सुमंतावर असे. रामचंद्र त्र्यंबक सुमंत या पदावर होते.आजच्या काळातील परराष्ट्र खात्याचे काम सुमंत करत होते.

**७. न्यायधीश**

न्यायाधिशाकडे मुलकी आणि दिवाणी कामे असत. न्याय-अन्यायावर विचारविमर्श करुन महाराजांना सांगितले जाई, या पदावर निराजी रावजी यांची निवड न्यायधीश म्हणून करण्यात आलेली होती.

**८. पंडितराव**

रघुनाथराव पंडीत या पदावर होते. जातीजातीतील वाद निवारण करणे. देवस्थानातील कामकाजासाठी व्यक्तीची निवड करणे.

सेनापती,सुमंत, न्यायधीश, पंडीतराव या अधिकाऱ्यांची जागा महाराजांच्या डावीकडे असे. या अष्टप्रधान मंडळास मदत करण्यासाठी दिवाण, मुजूमदार, हिशेब तपासनीस, फडणीस, महसूल हिशेबासाठी, सबनीस, दफ्तरदार कारखानीस, पुरवठा अधिकारी, चिटणीस, जामदार खाजिनदार, पोतनीस, नाणेतज्ञ असत. राज्य संवर्धनाबरोबर सुरळीत राज्यकारभार करणे महत्वाचे झाले होते. त्यादृष्टीने अष्टप्रधान मंडळ तयार केले. अष्टप्रधानाकडे अठरा कारखाने आणि बारा महालाची जबाबदारी असे. अठरा कारखान्यामध्ये खजिना, तोफखाना, शरबतखाना (औषधी), अंबरखाना, जवाहिरखाना, उष्ट्रखाना, मुतबकखाने, जिरातखाना शेती, जामदारखाना, दफ्तरखाना, पीलखाना, नगारखाना, तालीमखाना, फरासखाना, शिकारखाना, अबदरखाना, दारुखाना, शरतखाना होते.

बारा महालमध्ये कोठी,पालखी, इमारत, पोते, सौदागर, दरुणी शेरी, पात्रा, बहिली, भट्टी, टाकसाळ, छाबीन हे होते.

अशा प्रकारे छत्रपती शिवाजी महाराजांनी आदर्श प्रशासन व्यवस्था निर्माण करुन स्वराज्याचे रुपांतर सुराज्यात केले.[५०]

# संदर्भ सूची


| | | |
|---|---|---|
| १. डॉ. अ.रा.कुलकर्णी | : | शिवकालीन महाराष्ट्र, राजहंस प्रकाशन पुणे,प्रथम आवृत्ती १९९९, पृ.क्र. २१ |
| २. डॉ. अ.रा. कुलकर्णी | : | अशी होती शिवशाही राजहंस प्रकाशन पुणे,आवृत्ती पाचवी,सप्टे.२०१२ पृ.क्र.९५ |
| ३. संपादक अ.रा.कुलकर्णी, ग.ह. खरे. | : | मराठ्यांचा इतिहास खंड - १ (द्वि.आ.) कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे २००६ पृ.क्र. ३४१ |
| ४. त्र्यंबक शंकर शेजवळकर | : | श्री.शिवछत्रपती संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना, आराखडा व साधने - १९६४ मराठा मंदिर प्रकाशन डॉ. नायर रोड मुंबई-८ पृ.क्र.४९ |
| ५. सेतु माधवराव पगडी | : | छत्रपती शिवाजी नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया नवी दिल्ली पहिली आवृत्ती १९८९ पृ.क्र. ३ |
| ६.कै.न्यायमूर्ती महादेव रानडे अनु.नरहर रघुनाथ फाटक | : | मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष (Rise of the Maratha Power) साहित्य आणि संस्कृती मंडळ महाराष्ट्र राज्य पृ.क्र.३३ |
| ७. अ.रा.कुलकर्णी | : | अशी होती शिवशाही राजहंस प्रकाशन प्रा.लि.पुणे, आवृत्ती पाचवी सप्टे.२०१२, पृ.क्र.४२ |
| ८. गोविंद सखाराम सरदेसाई मुख्य संपादक - स.मा. गर्गे | : | मराठी रियासत खंड-१ शहाजीराजे भोसले शककर्ता शिवाजी पॉप्युलर प्रकाशन मुंबई . दुसरे पुनर्मुद्रण जानेवारी २०११ पृ.क्र.३२ |
| ९. संपा.अ.रा.कुलकर्णी , ग.ह.खरे | : | मराठ्यांचा इतिहास खंड - १ प्रथम आवृत्ती -१९८४ कॉन्टीनेन्टल प्रकाशन पुणे पृष्ठ क्र. - ११२ |

१०. देशपांडे प्र.न. : मराठ्यांचा उदय आणि उत्कर्ष मोघे प्रकाशन कोल्हापूर पहिली आवृत्ती १९७४ पृ.क्र.५४

११. डॉ. जयसिंगराव पवार : शिवाजी व शिवकाल , फडके प्रकाशन, कोल्हापूर पृ.क्र. ५१

१२. सेतू माधवराव पगडी : शिवचरित्र एक अभ्यास शिवाजी विद्यापीठ प्रकाशन कोल्हापूर पुनर्मुद्रण २०१२ पृ. १४३

१३. सेतू माधवराव पगडी : पूर्वोक्त पृ. १४४-१४५

१४. डॉ.जयसिंगराव पवार : शिवछत्रपती : एक मागोवा सुमेरु प्रकाशन, डोंबिवली (पूर्व)द्वितीयावृत्ती २००७ पृ.क्र. १७

१५.गुरुवर्य कृष्णराव अर्जून केळुसकर : छत्रपती शिवाजी महाराज वरदा प्रकाशन पुणे- पाचवी आवृत्ती १९९१ पृ.९४

१६. बेन्द्रे वा.सी. : श्री.छत्रपती शिवाजी महाराज यांचे विकिचित्सक चरित्र (पूर्वाध)साहित्य सहकार मुद्रणालय अलिबाग कुलाबा, प्रथम आवृत्ती १ मे. १९७२ पृ.क्र. ३१

१७. गोविंद सखाराम सरदेसाई मुख संपादक - स.मा. गर्गे : मराठी रियासत - शहाजीराजे भोसले, शककर्ता शिवाजी खंड-१ पॉप्युलर प्रकाशन मुंबई दुसरे पुनर्मुद्रण २०११ पृ.क्र. ३४४

१८. डॉ. अ.रा.कुलकर्णी : अशी होती शिवशाही राजहंस प्रकाशन पुणे,आवृत्ती पाचवी सप्टे.२०१२, पृ.क्र. ९५

१९. संपादक अ.रा.कुलकर्णी, ग.ह.खरे : मराठ्यांचा इतिहास खंड-१ कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे प्रथम आवृत्ती - १९८४ पृ.क्र.१३२

२०. वि.का.राजवाडे : राधामाधव विलास चंपू (जयराम पिंडयेकृत) , चित्रशाळा छापखाना, पुणे, शके १८४४ (सन १९२२) पृ.क्र. २६४

२१. त्र्यंबक शंकर शेजवलकर : श्री.शिवछत्रपती संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना आराखडा व साधने मराठा प्रकाशन डॉ.नायर रोड मुंबई पृ.क्र. १०३

२२. गजानन मेहेंदळे : श्री राजा शिवछत्रपती, खंड-१ श्रीसाई एन्टरप्रायजेस, पुणे २००२ भाग-२ पृ.क्र. ८०१

२३. देशपांडे प्र.न. : मराठ्यांचा उदय आणि उत्कर्ष, मोघे प्रकाशन कोल्हापूर पहिली आवृत्ती १९७४ पृ. ११४

२४. बेंद्रे वा.सी. : श्री.छत्रपती शिवाजी महाराज विकित्सक चरित्र (पूर्वाध) साहित्य सहकार मुद्रणालय अलिबाग, कुलाबा प्रथम आवृत्ती १ मे १९७२ पृ.क्र. ९८

२५. त्र्यंबक शंकर शेजवळकर : श्री शिवछत्रपती संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना आराखडा व साधने मराठा प्रकाशन,डॉ.नायर रोड मुंबई,पृ.क्र.१९४

२६. पूर्वोक्त : पृष्ठ क्र. १९६

२७. पूर्वोक्त : पृष्ठ क्र.१९९

२८. गुरुवर्य कृष्णराव अर्जुन केळूसकर : छत्रपती शिवाजी महाराज वरदा प्रकाशन पुणे पाचवी आवृत्ती १९९१ पृ.क्र. २२१

२९. वि.का. राजवाडे : राधामाधव विलासचंपू ( पिंडयेकृत) , चित्रशाळा छापखाना, पुणे, शके १८४४ (सन १९२२) पृ.क्र. २९९

३०. स.म. दिवेकर (संपा) : कविंद्र परमानंदकृत श्रीशिवभारत भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे पुरस्कृत ग्रंथमाला क्रमांक-३ शके १८४९ (सन १९२७) पृ.१२१

३१. सेतु माधवराव पगडी : छत्रपती शिवाजी नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया नवी दिल्ली पहिली आवृत्ती १९८९ पृक्र. ५८

३२. गोविंद सखाराम सरदेसाई मुख्य संपादक स.मा.गर्गे : मराठी रियासत खंड-१ शहाजीराजे भोसले, शककर्ता शिवाजी पॉप्युलर प्रकाशन मुंबई दुसरे पुनर्मुद्रण जानेवारी २०११ पृ.क्र. २०२

३३. कै.न्यायमूर्ती महादेव रानडे अनु.नरहर रघुनाथ फाटक : मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष ( Rise of the Maratha Power) साहित्य आणि संस्कृती मंडळ महाराष्ट्र राज्य पृ.क्र. १०७

३४. बेंद्रे वा.सी. : श्री.छत्रपती शिवाजी महाराज यांचे विकिचित्सक चरित्र - साहित्य सहकार मुद्रणालय अलिबाग, कुलाबा १ मे.१९७५,प्रथमावृत्ती पृ.क्र. ३६५

३५. गोविंद सखाराम सरदेसाई मुख्य संपादक स.मा.गर्गे : मराठी रियासत खंड - १ शहाजीराजे भोसले, शककर्ता शिवाजी पॉप्युलर प्रकाशन मुंबई, दुसरे पुनर्मुदण जानेवारी २०११ पृ.क्र. २९३

३६. गजानन मेहेंदळे : श्री.राजा शिवछत्रपती खंड - १ ,श्री साई एन्टर प्रायजेस, पुणे २००२ भाग - २ पृ.क्र. ८४७

३७. प्रा.अशोक राणा : स्वराज्य संकल्पिका - राष्ट्रमाता जिजाऊ, जिजाई प्रकाशन पुणे प्रथम प्रकाशन १२ जानेवारी २००१ पृ.क्र. ६२

३८.गोविंद सखाराम सरदेसाई : मराठी रियासत खंड -१ शहाजीराजे भोसले, शककर्ता
मुख्य संपादक स.मा.गर्गे शिवाजी पॉप्युलर प्रकाशन मुंबई दुसरे पुनर्मुद्रण जानेवारी २०११ पृ.क्र. २९९

३९.त्र्यंबक शंकर शेजवलकर : श्री.शिवछत्रपती संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना आराखडा व साधने, मराठा मंदिर प्रकाशन डॉ. नायर रोड मुंबई-८ १९६४ पृ.क्र.१६९

४०. वि.का. राजवाडे : राधामाधवविलासचंपू (जयराम पिंड्येकृत) चित्रशाळा छापखाना, पुणे शके १८४४ (सन १९२२) पृ.क्र. २७५

४१. देशपांडे प्र.न. : मराठ्यांचा उदय आणि उत्कर्ष, मोघे प्रकाशन कोल्हापूर पहिली आवृत्ती १९७४ पृ.क्र. ३०२

४२. सेतू माधवराव पगडी : छत्रपती शिवाजी नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया नवी दिल्ली पहिली आवृत्ती १९८९ पृ.क्र. १२९

४३. कै.न्यायमूर्ती महादेव रानडे : मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष (Rise of the Maratha
अनु.नहरह रघुनाथ फाटक Power ) साहित्य आणि संस्कृती मंडळ महाराष्ट्र राज्य पृ.क्र. १५३

४४. गुरुवर्य कृष्णराव अर्जुन : छत्रपती शिवाजी महाराज वरदा प्रकाशन पुणे पाचवी
केळूसकर आवृत्ती १९९१ पृ.क्र. २८८

४५. अ.रा.कुलकर्णी : अशी होती शिवशाही राजहंस प्रकाशन पुणे आवृत्ती पाचवी सप्टेंबर २०१२ पृ.क्र. ९०

४६. गोविंद सखाराम सरदेसाई : मराठी रियासत खंड -१ शहाजीराजे भोसले, शककर्ता
मुख्य संपादक स.मा.गर्गे शिवाजी, पॉप्युलर प्रकाशन मुंबई दुसरे पुनर्मुद्रण जानेवारी २०११ पृ.क्र. ३६५

४७. पूर्वोक्त : पृष्ठ क्र.३७४

४८.संपादक अ.रा. कुलकर्णी, ग.ह.खरे : मराठ्यांचा इतिहास खंड - १ कॉन्टीनेन्टल प्रकाशन पुणे प्रथम आवृत्ती १९८४ पृ. ३१७

४९. नरहर कुरुंदकर : छत्रपती शिवाजी महाराज जीवन रहस्य, इंद्रायणी साहित्य प्रकाशन पुणे- ३०, १५ ऑगस्ट २००३ पृ.क्र. ५३

५०. त्र्यंबक शंकर शेजवळकर : श्री.शिवछत्रपती संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना आराखडा व साधने, मराठा मंदिर प्रकाशन डॉ. नायर रोड मुंबई - ८ , १९६४ पृ.क्र. ५४३

## प्रकरण -तिसरे

## <u>स्थापत्य शास्त्रातील वैज्ञानिक दृष्टिकोन</u>

**स्थापत्य म्हणजे काय ?**

स्थापत्य शास्त्राचा अभ्यास करीत असतांना, याचा मागोवा घेत असतांना याची सुरुवात हडप्पा व मोहेंजोदडो पासून सुरुवात होते. हडप्पा व मोहेंजोदडा उत्खनातही काही बांधकामांचे अवशेष सापडले आहेत. अशा पाच हजार वर्षांपूर्वीच्या स्थापत्य अवशेषांपासून ते शिवशाहीतील किल्ले,गढ्या व वाड्यांच्या अवशेषांपर्यंतचा अभ्यास व संशोधन ज्या विषयात केले जाते ती विषयशाखा म्हणजे 'स्थापत्यशास्त्र' होय. या शाखेचा प्रारंभही अलीकड नव्याने पाश्चात्यांच्या अभ्यासप्रेरणेतून झाला. प्राचीन भारतीयांना स्थापत्य कलेचे, शिल्पकलेचे, मूर्तिकलेचे ज्ञान होते. त्यांनी रचलेले ग्रंथही उपलब्ध झाले आहेत, परंतु या कला अवशेषाला इतिहासाचे साधन मानून त्यांचा अभ्यास करण्याची परंपरा मात्र पाश्चात्य इतिहासकारांनी सुरु केली. या कला अभिव्यक्तीतून प्रतिबिंबीत झालेले समाजजीवन, पोषाख पध्दती, जीवनशैली, कलाशैली या साऱ्यांचा अभ्यास होऊ लागला. पर्सी बाउन यांनी *Indian Architecture* या ग्रंथाच्या रुपाने या अभ्यासशाखेची मुहूर्तमेढ रोविली होती. फर्गसन यांनी भारतीय स्थापत्यांचा तौलनिक आभ्यास करुन *Eastern and Western Architecture* हा ग्रंथ लिहीला.

गतकालीन पाऊलखुणांचा शोध घेण्याच्या प्रयत्नातून शिलालेखापासून ते पुराभिलेखशास्त्रापर्यंत अनेक अभ्यासशाखा इतिहासाच्या पूरक अभ्यासशाखा म्हणून विकसित झाल्या. या दुय्यम अभ्यास शाखामुळे गतकालीन वाटचाल स्पष्ट होण्यास मदत होत गेली. खरे तर या शाखांनी गतकालीन पुराव्यांना विशिष्ट अर्थ प्राप्त करुन दिला. सत्यशोधनाला पुष्टी मिळाली. वस्तुनिष्ठ इतिहास लेखनाला गती आली. इतिहासाच्या या दुय्यम अभ्यासशास्त्रामुळे इतिहासाला शास्त्रशुध्द अभ्यासाची बैठक प्राप्त झाली. इतिहासपूर्वकालीन मानवाची वाटचाल अभ्यासणे पुरातत्वशास्त्रामुळेच शक्य झाले. उत्खननाचे तंत्र विकसित झाल्यामुळेच अनेक वर्षापूर्वीच्या

मानवी वाटचालीच्या पाऊलखुणांचा शोध लागला. शिलालेखांच्या वाचनाने गतकालीन वाटचालीतील अनेक प्रसंग इतिहासात नोंदवले गेले. नाण्यांच्या अभ्यासामुळे अनेक अज्ञात राजांच्या कारकिर्दीविषयी माहिती उपलब्ध झाली.

तात्पर्य इतिहासाच्या या दुय्यम अभ्यासशाखांनी इतिहासलेखनाला आवश्यक अशी साधनरुप लेखन सामग्री उपलब्ध करुन दिली पुराव्यांचा अन्वयार्थ लावण्यास मदत केली व इतिहास लेखन प्रक्रिया समृध्द झाली.[१]

**प्राचीन महाराष्ट्राचे स्थापत्य**

सातवाहनापासून महाराष्ट्राला एक व्यवस्थित राज्ययंत्रणा प्राप्त झाली. सोने, चांदी, शिसे, तांबे यांची नाणी सापडल्याने प्राकृत भाषाचा पुरस्कार झाला. शिलालेख,ताम्रपट,नाणी,मंदिरातील लेख,मुर्ती वरील लेख यासाधनाद्वारे प्राचीन इतिहासाच्या अभ्यासावर प्रकाश पडलेला आहे. अनेक राजांनी मोठमोठे प्रताप करुन राज्याचा विस्तार झाला. शकाची नव्याने गणना सुरु झाली. पुढील राजवटीत पैठण, बदामी, मल्लखेड, कल्याण (कल्याणी) देवगिरी अशी राजधानीची गावे उदयास आली. मंदिर, मठ, स्तूप, चैत्य विहार ,वाडे,गड अथवा दुर्गे तलाव, घाट, रस्ते,चैत्य विहार इ.निर्मिती प्राचीन काळात झालेली दिसते. शिव, विष्णू, देवी, गणपती इत्यादी देवांची भव्य मंदिरे उभारली गेली. सुवर्ण, रुपे, तांबे, पितळ, लोखंड, पाषाण अशांच्या मूर्ती तयार झाल्या राजाज्ञेने मंदिरांची निर्मिती प्रत्येक राजवटीत झालेली दिसून येते. पंढरपूरच्या पांडुरंगाचे मंदिर, वेरुळचे कैलास लेणे, अमरावतीचे अदित्यमंदिर, कोल्हापूरच्या महाकालीचे मंदिर, अंबरनाथाचे आम्रेश्वर सिन्नर येथील गोंदेश्वराचे मंदिर, अशा अनेक मंदिरांच्या रचना-बांधणी वरुन प्राचीन महाराष्ट्राच्या स्थापत्याचे दर्शन होण्यासारखे आहे.जैनाची मंदिरे व बौध्दांचे लेणी व विहार महाराष्ट्रात अऩेक ठिकाणी दिसतात. हेमाद्री पंडिताच्या नावाशी निगडित असलेली हेमांडपंथी देवळेही महाराष्ट्रात आहेत. शिलामंदिरे, लेणे यांचीही निर्मिती महाराष्ट्रात अनेक ठिकाणी दिसून येते. उभ्या खडकात कोरलेली दोन-दोन , तीन-तीन मजल्यांची लेणी स्थापत्य व खोदकला यांचे उत्कृष्ट नमुने आहेत. याच लेण्यांच्या आसपास वा लागून भिक्षुंसाठी, साधकासाठी विहार अथवा आश्रम आणि चैत्य

म्हणजे उपासनामंदिरे यांचीही निर्मिती झालेली दिसते. प्रत्येक विभागात आरामासाठी वा बसावयाचा ओटा, वस्त्रे ठेवण्यासाठी दांड्या व खुंट्या, पोथ्या- पुस्तकासाठी कोनाडे, हवेसाठी खिडक्या इत्यादीची सोय असते. खोल्यांच्या संख्येवरुन चतुगर्भ, पंचगर्भ, सप्तगर्भ, अष्टगर्भ अशी नावे विहारांना असत.

बौध्द स्थापत्यात चैत्य अतिशय प्रेक्षणीय व भव्य आहेत. बौध्दांच्या काळी चैत्यांना मंदिरासारखे रुप प्राप्त होऊन त्यात उपासना, प्रार्थना सुरु झालेल्या दिसतात. हे चैत्य कधी मोकळ्या जागी तर कधी पर्वताच्या कडा खोदून तयार झालेले आहेत. कार्ले भाजे, कान्हेरी, जुन्नर, अंजिठा, पितळखोरे इत्यादी लेण्यांतील चैत्यगृह नावाजलेले आहेत. मृतांच्या अवशेषांवर छत्र्या बांधण्याच्या चाली प्रमाणे बौध्द परंपरेत स्तूपांची कल्पना वाढीस लागली. मृतांच्या अस्थी किंवा रक्षा स्तूपासाठी असत. कधी सोन्याचे मणी, नाणी, अथवा रत्नेही पुरल्याची उदाहरणे सापडतात. स्तंभ, तोरणे, वेदिका म्हणजे कठडे यांचाही उल्लेख या बौध्द स्थापत्याशी संबंधित आहे. जुन्नर , कार्ले, कान्हेरी, नाशिकजवळ त्रिरश्मी, अजंठा, वेरुळ, घारापूरी, मंडपेश्वर, जोगेश्वरी इत्यादी ठिकाणाचे प्राचीन स्थापत्य वाखण्यासारखे दैदिप्यमान व वैभवशाली आहे.[२]

**महाराष्ट्राची नैसर्गिक घडण आणि मराठ्यांचा इतिहास -**

मराठ्यांच्या इतिहासाचा विचार करतांना सह्याद्री, कोकणची किचकट चिंचोळी खडकाळ किनारपट्टी, देशावरची पठारे आणि बेसाल्ट, मान्सूनचा लहरीपणा, काळी माती आणि एकंदरीत निसर्गाची अवकृपा असलेला हा महाराष्ट्र आपल्या डोळ्यांसमोर येतो. महाराष्ट्राच्या ह्या भूमीत मनुष्यवस्तीची चाहूल ४० हजार वर्षापूर्वीच लागते. हा माणूस भटक्या आणि आपले खाद्य गोळा करणारा होता. तो कोण होता हे सांगता येत नाही, कारण त्याची अश्मिभूत हाडे आजपर्यंत कुठेच मिळाली नाहीत. त्याच्या अस्तित्वाची खूण फक्त त्याने केलेल्या आणि वापरलेल्या दगडी हत्यारावरुनच येते. त्याच्या वस्तीला योग्य असा हा महाराष्ट्राचा कमी पावसाचा पठारी प्रदेश होता. परंतु तो जास्त पावसाच्या जगंलमय कोकण-भूमीत पण गेला होता. ह्याचा पण पुरावा मिळाला

आहे. हा अश्मयुगीन भटका मानव निसर्गाशी जुळवूनच घेत होता. सुमारे ४००० वर्षापूर्वी महाराष्ट्रात शेतकी-संस्कृतीची सुरुवात शेतकरी खोऱ्यात झाली आणि मानवी जीवनाला एक प्रकारचे स्थैर्य प्राप्त झाले. महाराष्ट्राच्या पठारी प्रदेशातून वाहणाऱ्या तापी, गोदावरी, भीमा ह्या नद्या आणि त्यांच्या काठची काळी कसदार माती ह्यावरच ही शेती प्रधान संस्कृती बहरायला सुरुवात झाली. जवळ जवळ इ.पूर्व ६०० वर्षापर्यंत ही ताम्राश्मयुगीन संस्कृती महाराष्ट्रात होती. ह्या काळात मनुष्य नैसर्गिक संपत्तीचा उपयोग जास्त हुशारीने करु लागला. महाराष्ट्रात दुष्काळीभाग म्हणून प्रसिध्द असलेला पुणे जिल्ह्यातील शिरुर तालुका ह्या तालुक्यात घोडनदी काठी (भीमेची उपनदी) ईमानगाव येथे ताम्रयुगीन संस्कृती इ.पू. १६०० पासून इ.स. ६०० पर्यंत बहरली होती.[३]

**महाराष्ट्रातील किल्ले**

सह्याद्रीच्या घाटमाथ्यावर आणि त्याच्या थोडेसे पश्चिमेकडे महाराष्ट्रातील बरेच गिरिदुर्ग आहेत. ह्या किल्ल्याची भूशास्त्रीय दृष्ट्या वैशिष्ट्ये म्हणजे हे किल्ले बहुतांश घट्ट बेसाल्टच्या थरावर वसले आहेत. ह्या घट्ट बेसॅाल्टमधील संधीमुळे त्याचे विदरण (Weathering) असे होते की, त्या थरातील खंड (Blocks) अगर स्तंभ (Columns) जरी अलग होऊन कोसळून बाहेर पडले, तरी मूळ थरात एक प्रकारचा तीव्र उताराच्या भिंती सारख्या कडा निर्माण होतात. ह्या कड्यामुळे एक प्रकारची नैसर्गिक भिंतच तयार होते. ह्या कड्यावर मग तट,बुरुज वगैरे बांधून संरक्षण व्यवस्था मजबूत करणे शक्य झाले. परंतु घट्ट बेसॅाल्टमध्ये जलधारकता चांगली असल्यामुळे पठारी प्रदेशापासून उंचावर किल्यावर पाणी मिळणे तितकेसे अवघड नव्हते हा घट्ट बेसॅाल्ट बांधकामाला पण चांगला होता.तेंव्हा दुर्गमता पठारापासून उंची आणि सभोवतालच्या प्रदेशावर ताबा ठेवण्यात उपयुक्त असे हे सह्याद्रीवरील किल्ले मराठी राज्याला वरदानच ठरले. या उलट जे किल्ले उदा.पुरंदर, सिंहगड सह्याद्रीच्या पूर्वेकडील पठारी प्रदेशात होते त्याची तुलनात्मक दृष्ट्या दुर्गमता कमी होती व म्हणून ते किल्ले मराठ्यांना ताब्यात ठेवणे नेहमीच जड गेले. महाराष्ट्रातील सागरी किल्ले पण समुद्रात शिरलेल्या कठीण खडकांच्या सुळक्यावरच बांधले आहेत. थोडक्यात महाराष्ट्राची भूमिरचना गिरिदुर्ग आणि सागरी दुर्गांना पोषक होती. त्याचा फायदा मराठ्यांना

विशेषतः छत्रपती शिवाजी महाराजांना या दुर्गम भागाचा खूप उपयोग झाला आणि शिवरायांनी त्याचा पुरेपूर उपयोग करुन घेतला.[४]

**मध्ययुगीन काळात किल्ल्यांचे महत्व :-**

मध्ययुगीन काळात किल्यांना खूप महत्वाचे स्थान होते. किल्ला ताब्यात असला म्हणजे आजुबाजूच्या प्रदेशावर नियंत्रण ठेवता येत. एवढेच नव्हे तर वेळप्रसंगी शत्रूचे आक्रमण होत असतांना आपल्या प्रजेला, रयतेला किल्याच्या आश्रयाने सुरक्षित ठेवता येत असत. ज्यांचे किल्ले जास्त त्यांचा प्रदेश जास्त असे समीकरण मध्ययुगात निर्माण झालेले होते. वास्तविक पाहता संरक्षणासाठी किल्ले बांधण्याची कला प्राचीन काळापासून भारतामध्ये अस्तित्वात होती. मध्ययुगामध्ये भारतावर वर्चस्व प्रस्थापित करणाऱ्या इस्लामी राज्यकर्त्यानाही किल्ल्यांचे महत्व माहित होते. एवढेच नव्हे तर भारतात आल्यानंतर किल्ल्यांच्या वास्तुशास्त्रामध्ये कितीतरी परिणामकारक बदल किंवा सुधारणा इस्लामी राज्यकर्त्यांनी केल्या परंतु किल्ल्यांचा विशेषतः डोंगरी किल्ल्यांचा राज्यस्थापनेसाठी आणि विस्तारासाठी पुरेपुर उपयोग करुन घेऊन मराठ्यांनी दैदिप्यमान इतिहास घडविला आजही छत्रपती शिवरायांचा इतिहास जगासाठी प्रेरणादायी ठरतो. [५]

**दख्यन (दक्षिण) प्रदेशाची भौगोलिक वैशिष्ट्ये**

ज्या भागात मराठ्यांचे राज्य स्थापन झाले आणि तो भाग मध्ययुगामध्ये दखखन ( The Deccan) या नावाने ओळखाल जात होता. दखखन विभागाच्या सीमा वेगवेगळ्या कालखंडात भिन्न स्वरुपाच्या असल्यामुळे या प्रदेशाची भौगोलिक व्याख्या निश्चितपणे सांगणे कठीण आहे. साधारणपणे उत्तरेला तापी नदीपर्यंत आणि दक्षिणेला कोकण व कृष्णा नदी पर्यंत विस्तृत असलेला प्रदेश मध्ययुगात, विशेषतः शिवकालात दखखन या नावाने ओळखला जात असे. या प्रदेशात स्थूलमानाने खानदेश, पश्चिम महाराष्ट्र, मराठवाडा, कोकण आणि विजापूर व बेळगाव या जिल्ह्यातील काही भाग समाविष्ट होता. भूगर्भशास्त्राच्या दृष्टीने दखखनचा प्रदेश 'दखखनचा पठार '

(The Deccan Plaateau) या नावाने ओळखला जातो. हे पठार बेसाल्ट (Baslat) नावाच्या खडकापासून बनलेले असून या विशिष्ट प्रकारच्या खडकामुळे सह्याद्रीच्या पश्चिमेकडील पर्वतराजीमध्ये आणि सातमाळा , अजिंठे, बालाघाट आणि महादेव या श्रेणीतील डोंगरामध्ये उत्तुंगकडे ( Scarps) माथ्यावर विस्तृत प्रदेश असलेल्या अनेक टेकड्या गिरिदुर्गासाठी उपलब्ध झाल्या.[६]

छत्रपती शिवाजी महाराजांनी ज्या किल्ल्यांचा आधारे स्वराज्याची स्थापना केली त्या किल्ल्यांचे विभाजन पुढील प्रमाणे आहे.

- ❖ घाटमाथ्यावरील किल्ले
- ❖ मावळातील किल्ले
- ❖ देशावरील किल्ले
- ❖ कोकणामधील किल्ले

### ❖ घाटमाथ्यावरील किल्ले

घाटमाथ्यावरील महत्वाचे गिरिदुर्ग म्हणून खालील किल्यांचा उल्लेख करता येईल. हरिश्चंद्रगड, जीवधन, सिंहगड, शिवनेरी, प्रबळगड, राजमाची, लोहगड, तुंग, तिकोना , ईसागड ,सिंहगड, पुरंदर , राजगड, तोरणा, रायगड, रोहिडा, प्रतापगड, हातगड, गुणवंतगड, विशालगड, पन्हाळा, साल्हेर, मुल्हेर इत्यादी.

घाटमाथ्यावरील किल्ल्यांना शिवकालात अनन्यसाधारण महत्व प्राप्त झालेले होते. तोरणा, प्रचंडगड, पुरंदर , राजगड, सिंहगड, रायगड या किल्यांवरुन शिवाजी महाराजांनी महत्वपूर्ण राजकीय हालचाली केल्या . राजगड आणि रायगड हे किल्ले तर महाराजांनी राजधानीसाठी निवडले प्रतापगड बांधून महाराजांनी पार घाटावर नियंत्रण प्रस्थापित केले. या किल्ल्यापैकी अनेक किल्ले मावळ भागात आढळून येतात.

## ❖ मावळातील किल्ले

मध्ययुगामध्ये राजकीय दृष्ट्या मावळ प्रदेशाला अनन्यसाधारण महत्व प्राप्त झाले होते. मावऴातल्या प्रत्येक किल्ल्याने रोमांचकारी इतिहास घडविला . या किल्यांचे भौगोलिक स्थानही वैशिष्ट्यपूर्ण असल्याचे दिसून येते शिवछत्रपतीचे जन्मस्थान असलेला शिवनेरीचा किल्ला बहमनी काळातही महत्वपूर्ण मानला गेला होता. शिवनेरी आणि जुन्नर या दोन मावळांवर शिवनेरीचा जागता पहारा असलेला दिसून येतो. मध्ययुगात व्यापारी दृष्ट्या भरभराटीस आलेले जुन्नर हे शहरही शिवनेरीच्या संरक्षणाखाली दिमाखाने नांदत होते. चाकणचा भूईकोट किल्ला घोटण आणि पौड या मावळांना संरक्षण देण्यास समर्थ होता. लोहगड या गिरीदुर्गावरुन नाणे आणि आंदर मावळावर नजर ठेवणे सुलभ होते. तुंग आणि तिकोना या दोन गिरीदुर्गामुळे पवन मावळाचे संरक्षण सहजसाध्य झालेले होते. सिंहगडावरुन मुसे, तर रोहिड यावरुन हिरडस मावळ, तसेच रोहिडखोरे या भागावर नियंत्रण राखता येत असे. तोरणा आणि राजगड या किल्यांवरुन गुंजण मावळ आणि कानद व वेळवंड ही दोन खोरी यावर वर्चस्व राखणे शक्य असे. मावळातल्या गिरीदुर्गांच्या आश्रयानेच शिवरायांने स्वराज्याची स्थापना आणि प्रारंभीचा राज्यविस्तार केला. बहमनी काळात सिंहगड, शिवनेरी यासारखे किल्ले अपवाद म्हणून वगळल्यास इतर गिरीदुर्गाकडे शाही राज्यकर्त्यानी दुर्लक्षच केलेले होते हा उपेक्षित भूप्रदेश मराठ्यांच्या स्वराज्याचा केंद्र बिंदू ठरला.

## ❖ देशावरील किल्ले

महाराष्ट्राच्या पठारात किंवा देश या विभागात मोडणारी सातमाळा अजिंठा ही डोंगराची रांग प्राचीन काळापासून संस्कृति-संवर्धनासाठी प्रसिध्द आहे. याच रांगेत जगप्रसिध्द अजिंठा व वेरुळ येथील लेणी कोरलेली आहेत. यादव काळामध्ये राजधानीचे वैभव उपभोगलेले चांदवड आणि देवगिरी हे दोन गिरीदुर्ग ही याच रांगेत आहेत. सातमाळा अजिंठ या रांगेत असलेल्या गिरीदुर्गाचे स्थान अऩेक दृष्टीने वैशिष्ट्यपूर्ण मानावे लागेल. उत्तरेतून दक्षिणेत शिरणारे रस्ते या

रांगेला वळसा घालून जात असल्यामुळे टेहळनीच्या आणि संरक्षणाच्या दृष्टीने अजिंठा रांगेतील विशेषतः नाशिक जिल्ह्यातील गिरीदुर्गांना मध्ययुगात महत्व प्राप्त झालेले होते. या रांगेत असलेल्या किल्यांचे दुसरे वैशिष्ट्ये म्हणजे किल्यांच्या प्रवेशासाठी मुद्दाम तयार केलेले व खडकात कोरलेले भूयारी मार्ग हे होय. देवगिरी किल्ल्याला भूयारी मार्ग प्रसिध्द आहेच परंतु अशा प्रकारचे भूयारी मार्ग नाशिक जिल्ह्यातील घेडप आणि हातगड येथील किल्ल्यांनाही आढळून येतात सातमाळा अजिंठा व त्याचे फाटे यामध्ये देवगिरी, चांदवड, धोडप, हातगड, अहीवंत, राजधैर, अंकाई, टंकाई इत्यादी अनेक गिरिदुर्ग आहेत. हे गिरिदुर्ग आपल्या वर्चस्वाखाली ठेवण्यासाठी मोगल आणि मराठे यांच्यामध्ये वारंवार संघर्ष झाले याची साक्ष इतिहास देतो किल्ल्यावरील ताब्यासाठी घनघोर युध्द झालेले दिसून येते.

हरिश्चंद्र बालाघाट रांग व तिचे फाटे यामध्ये हरिश्चंद्रगड, औढा, पट्टा, रतनगड, कुरगगड, त्रिंगलगड यासारखी अनेक गिरिदुर्ग आहेत. महादेव रांग व तिचे फाटे यामध्ये चंदन, वंदन, वैराटगड, कमलगड, केळंजा, पाडवगड, सज्जनगड, वसंतगड, भूषणगड असे कितीतरी गिरिदुर्ग आहेत. हरिश्चंद्र बालाघाट आणि महादेव या दोन रांगा म्हणजे महाराष्ट्र-पठाराचा गाभा असल्यामुळे येथील गिरिदुर्गांना महत्व प्राप्त झाले होते.

डोंगराच्या रांगा सोडल्यास, नद्यांच्या खोऱ्यांतून राजकीय आणि लष्करी हालचालींच्या दृष्टिकोनातून महत्वाच्या ठिकाणी दक्षिणेतील मुसलमानी राज्यकर्त्यांनी भूईकोट किल्ले बांधलेले आढळून येतात. (अहमदनगर, सोलापूर, नळदुर्ग, परांडा) या किल्यांचा येथे आवर्जून उल्लेख केला पाहिजे.मोगलांनी ज्यावेळी मराठ्यांचे गिरिदुर्ग जिंकण्यासाठी वेढे घातले, त्यावेळी या किल्यांनी रसद, शस्त्रात्रे, दारुगोळा पोहोचविण्याचे कार्य केले. साताऱ्याचा अजिंक्य-तारा आणि कोल्हापूर जवळ असलेला पन्हाळा हे दोन गिरिदुर्ग मराठ्यांनी मोगलांबरोबर दिलेल्या प्रदीर्घ स्वातंत्र्यलढ्याच्या वेळी (इ.स. १६८२-१७०७) अनोमल कामगीरी करणारे ठरले.

## ❖ कोकणातील किल्ले

सह्याद्री पर्वतामुळे कोकणपट्टीच्या पूर्वेकडील वलाटी प्रदेशाला नैसर्गिक तटबंदी लाभली आहे. कोकणातून देशावर येण्यासाठी निरुंद असलेले अनेक घाट उत्तुंग पर्वतराजीमध्येच आहेत. या घाटांच्या परिसरात मोक्याच्या जागी गिरीदुर्ग स्थापन करुन संरक्षणव्यवस्था भक्कम केलेली आढळते.

घाटावरील बहुतेक गिरिदुर्ग शिवपूर्व काळापासून पहारा करण्याचे कार्य बजावत होते. कोकणपट्टीच्या पश्चिमेला अरबी समुद्र आहे. सातव्या आठव्या शतकापासून अरबांनी समुद्रमार्गे कोकणाशी, पर्यायाने महाराष्ट्राशी व्यापारी सबंध प्रस्थापित केले होते. [७]

## छत्रपती शिवाजी महाराजांनी बांधलेले किल्ले

छत्रपती शिवाजी महाराजांनी महाराष्ट्रात सह्याद्रीच्या अंगाखांद्यावर जागोजागी प्रचंड प्रमाणात किल्ले बांधले. साहजिकच आपणाला प्रश्न पडतो की, एवढ्या मोठ्या प्रमाणात किल्ले बांधण्याची गरज काय होती? एका-एका किल्ल्याचे महत्व काय होते हे छत्रपती शिवरायांनी ओळखले होते. म्हणून शिवरायानी आयुष्यभर पैसा जमा झाला की, नविन किल्ल्याचे बांधकाम केले. महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेर असे मिळून १११ नविन किल्ले बांधले एवढ्या कमी क्षेत्रफळावर एवढे जास्त किल्ले कशासाठी तर महाराज एके ठिकाणी म्हणतात " आजमीतीस ३६० किल्ले आहेत. एक-एक किल्ला एक-एक वर्ष जरी लढला तरी दिल्लीकरांना ३६० वर्ष लागतील स्वराज्य जिंकायला ही दूरदृष्टी शिवाजी महाराजांकडे होती म्हणून त्यांनी किल्ले उभारणीला महत्त्व दिले.

छत्रपती शिवाजी महाराजांच्या हे लक्ष्यात आले होते की, स्वराज्य जसं जसं वाढणार तसं तसे शत्रू देखील वाढणार आणि म्हणून हे शत्रू एकत्रितपणे जरी जमीन आणि समुद्र या दोन्ही बाजूंनी चाल करुन आले तरी स्वराज्य अजिंक्यच रहावे यासाठी जमिनीवर दर ५० किलोमीटरवर एक किल्ला तर ७५० किलोमीटर सागरी सीमेवर दर १२ किलोमीटरला एक किल्ला या प्रमाणात

महाराजांनी किल्ले बांधून स्वराज्य अजिंक्य केले. महाराजांकडील इंजिनियर मंडळींना आयुष्यभर भरपूर काम होते. प्रत्येकवेळी नवनवीन प्रयोग करण्याचा महाराजांचा भर होता. शत्रूने जमिनीवरुन आक्रमण केले तर सागरावर सरकायचे आणि सागरावरुन आक्रमण केले की जमिनीवरील किल्यांचा आश्रय घायचा हे पहिले धोरण होते. जर दोन-चार शत्रू मिळून एकत्रितपणे जमीन आणि समुद्र या दोन्ही बाजूंनी स्वराज्य कोंडीत पकडू पाहतील तर हे युध्द थेट दक्षिणेला मद्रासपर्यंत जिंजिपर्यंत खेचून शत्रूला एकाचवेळी तीन ठिकाणी विभाजित करुन पराभूत करायचा ही महाराजांची भविष्यासाठी रणनीती होती. तीच रणनीती राजाराम महाराज, महाराणी ताराबाई यांच्या काळात संताजी-धानाजीने २७ वर्ष औरंगजेबाला सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यात मोकळया हातांनी फिरवले आणि शेवटी पराभूत केले.

छत्रपती शिवाजी महाराजांनंतर स्वराज्याचे रक्षण झाले. किल्ले बांधणीमुळे आणि त्यासाठी वापरलेल्या वेगवेगळया बांधकाम शैलीमुळे प्रत्येक किल्यात नवीन प्रयोग करण्यावर महाराजांचा भर असे. बऱ्याच ठिकाणी तर हे किल्ले एवढे जवळ जवळ आहेत की किल्यांचे पुंजकेच वाटावेत या पुंजक्यामुळेच स्वराज्य औरंगजेबाच्या पंज्यात जाऊ शकले नाही. छत्रपती शिवरायांची सत्तेचे केंद्र विभागा आणि पराभूत करा ही रणनीती अवलंबली होती. या रणनीतीद्वारे त्यांनी आपल्या स्वराज्याला अजिंक्य ठेवले.शिवरायांनी किल्ल्यांची जी साखळी निर्माण केली त्यामुळे स्वराज्य औरंजेबाच्या ताब्यात जाऊ शकले नाही. अशा काही किल्ल्यांची निवडक उदाहरणे पाहिले म्हणजे शिवरायांच्या दूरदृष्टीची प्रचिती येते.

- पुणे जिल्हा - तोरणा, राजगड, सिंहगड, पुरंदर
- सातारा जिहा - प्रतापगड, मकरंदगड, महिपतगड, झुंजारगड,रसाळगड, वासोटा
- नाशिक जिल्हा - अचला,अहिवंतगड, रवळा, जवळा, मार्कंडा, धोडप, कांचन, राजदेहेर,कोळ, धैर, इंद्राई,चांदवड
- सिंधुदुर्ग जिल्हा - सिंधुदुर्ग, पद्मदुर्ग, राजकोट, सर्जेकोट, भरतगड,भगवंतगड, वेताळगड, रामगड, सिधगड,निवती

❖ रायगड जिल्हा - सोनगड, चांभारगड,महाडचा कोट, पन्हाळगड,चंद्रगड,उर्फ ढवळागड,कांगोरी,बिरवाडीचाकोट,भवानीगड,तळेगड, घोसाळगड, लिंगाणा,मानगड,कोकणदिवा

छत्रपती शिवाजी महाराजांनी जमिनीवरुन शत्रू आला तर किमान तीन जिल्हे त्याला विभाजित करुन मारता येईल. आणि समुद्रावरुन आला तर किमान दोन जिल्ह्यात शत्रूची सगळी सेना विभाजित करुन जागोजागच्या या किल्यावरुन छापे टाकून, रसद रोखून शत्रुला अडवून शत्रूची नाकेबंदी शिवरायांनी केलेली होती.

शिवरायांनी कमी कालावधीत एवढे प्रचंड किल्ले बांधले गेले. हे काम एका दिवसात झालेले नाही. एका महिन्यात बांधून होत नाही. प्रचंड मोठे नियोजन, भविष्याचा मोठा अभ्यास भरपूर पैसा असल्याशिवाय हे कार्य शक्य होणार नव्हते. परंतु शिवरायांनी किल्ल्यांचे महत्त्व ओळखून त्या प्रमाणात पैसाचे नियोजन केलेले होते. शिवरायांनी जवळपास ३५ वर्ष ही बांधकामे चालूच ठेवली होती. उन, वारा, पाऊस यांचा विचार न करता महाराजांचे इंजिनियर्स, गवंडी, बेलदार,कामगार आणि हजारो सैनिक सतत काम करत राहिले. सतत किल्ले बांधत राहिले. जगातील एकमेव राज्य म्हणजे स्वराज्य होय. आणि म्हणूनच महाराजांनी ३५ वर्षात १११ किल्ले बांधले. किल्ले बांधणीत स्वराज्याचे भविष्य लपलेले आहे हे शिवरायांनी ओळखले होते.

परमानंद कवीच्या 'शिवभारता ' मध्ये सोनोपंत डबीर महाराजांना किल्याचे महत्व सांगत असल्याचा एक प्रसंग आलेला आहे. त्यातील पुढील तीन श्लोक अभ्यासनीय आहेत.

*न दुर्गमित्येव दुर्गमं मन्यते जन : ।*
*तस्य दुर्गमता सैव यत्प्रभुस्तस्य दुर्गमः ।।*
*प्रभूणा दुर्गमं दुर्ग प्रभुदुगण दुर्गम : ।*
*अदुर्गमत्वादुभयोर्विद्विषन्नेव दुर्गमः ।।*
*ति ये यानि दुर्गाणी तानि सर्वाणि सर्वथा ।*
*यथा सुदुर्गमणि स्युस्तथा सद्यो विधीयताम ।।*

शिवभारत अ. १६, ६१-६३

या श्लोकाचा अर्थ असा होतो की, दुर्गाला केवळ दुर्ग म्हणूनच लोक दुर्गम मानत नाहीत, तर त्याचा स्वामी दुर्गम असणे हीच त्याची दुर्गमता होय. प्रभुमुळे दुर्ग दुर्गम होतो व दुर्गामुळे प्रभु दुर्गम होतो. दोघांच्याही अभावी शत्रूच दुर्गम होतो. तुमचे जे दुर्ग आहेत ते सर्व ज्यायोगे सर्वस्वी अत्यंत दुर्गम होतील असे त्वरित करा.

स्वराज्याच्या सर्वच दुर्गावर शिवाजी महाराजांनी अपरंपार प्रेम केले. ९१ कलमी बखरीत महाराजांच्या तोंडी पुढील प्रमाणे उद्‌गार घातलेले आढळतात. ' जैसा कुळंबी शेतास माळा घालून शेत राखितो असे किल्ले राज्यास रक्षण आहेत. तारवांस खिळे मारुन बळकट करितात तशी राज्यास बळकटी किल्यांची आहे. शिवरायांनी लष्करी प्रशासनातील अत्यंत महत्त्वाचा घटक म्हणजे किल्ला आहे हे लक्षात घेवून किल्ल्यांच्या बांधकामावर भरपूर खर्च केलेला दिसून येतो.[८]

**किल्ल्यांची व्यवस्था :**

स्वराज्याची मदार किल्ल्यावर आहे हे जाणून शिवाजी महाराजांनी किल्याची व्यवस्था अत्यंत चोख ठेवली आहे. सभासदाने आपल्या बखरीमध्ये शिवाजी महाराजांच्या ताब्यात असलेल्या २४० किल्यांची यादी दिली आहे. चिटणीस बखरीमध्ये ३१७ तर शिवदिग्विजया मध्ये ३६१ किल्यांची यादी दिलेली आढळते. शिवकालीन कागदपत्रांतून येणाऱ्या उल्लेखांच्या आधारे काही अस्सल साधन ग्रंथांच्या आधारे सुमारे २०० किल्ले शिवाजी महाराजांच्या वर्चस्वाखाली होते.

किल्ल्यांच्या देखरेखसाठी प्रत्येक गडावर हवालदार किंवा सरनोबत,सबनीस आणि कारखानीस हे तीन मुख्य अधिकारी असत. हवालदार हा मुद्राधारी असून किल्यावरील शिबंदी त्याच्या नियंत्रणाखाली असे. किल्याला जर माची असेल, तर माचीसाठी सरनोबत नेमला जात असे. त्याचप्रमाणे तटांच्या रक्षणासाठी तट सरनोबत या नावाच्या जागा निर्माण केलेल्या होत्या माचीचे आणि तटाचे सरनोबत मुख्य हवालदाराच्या आदेशाप्रमाणे काम करीत असत. किल्ला अधिक महत्वाचा असेल. तर, त्याच्या व्यवस्थेसाठी एकापेक्षा अधिक हवालदार नेमून त्यांच्यावर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी सरहवालदारावर सोपविण्यात येई. सभासद बखरीत किल्यावरील

अधिकाऱ्याच्या नेमणुकीबाबत महाराजांचे धोरण विशद केले आहे. 'गडावरि लोक हवालदार व सरनोबत मराठे जातिवंत ठेवावे त्यास जामीन आपले हुजरातीस लोक असतील. त्यापैकी घेऊन मग ठेवावे  सबनीस ब्राम्हण हुजरातीचे ओळखीचे ठेवावे व कारखानीस प्रभू ठेवावे. असे एकास एक प्रतिमेळ ठेवावे एक हवालदाराचे हाती किल्ला नाही.'

सबनीसाचे मुख्यकाम म्हणजे हिशेब ठेवण्याचे होय. कारखानीस म्हणजे गडावर असलेल्या सर्व कारखान्यांचा दप्तरदार किंवा नियंत्रक, हवालदार, सबनीस आणि कारखानीस या तिघांचाही अधिकार सारखा असल्यामुळे एका हवालदारचे हाती किल्ला नाही असे सभासद म्हणतो. हवालदार मराठा, सबनीस ब्राम्हण आणि कारखानीस प्रभू असला पाहिजे असे सभासद आणि इतर बखरकार लिहितात, परंतु शिवाजी महाराजांनी गडावरील अधिकारी नेमताना जातीचा विचार न करता व्यक्तीच्या गुणवत्तेला महत्त्व देवून शिवरायांनी त्यांची नेमणूक केली हे सिध्द होते.

गडावरील अधिकारी निःस्पृह वृत्तीचे, आपापल्या कामात कुशल आणि स्वामीनिष्ठ असले पाहिजेत असे अमात्यांनी आग्रहाने सांगितले आहे.हवालदाराची किंवा कोणत्याही अधिकाऱ्याची जागा वंशपरंपरागत चालू नये याची खबरदारी शिवाजी महाराजांनी घेतलेली आढळते. गडावरील मुख्याधिकाऱ्यांच्या ठराविक कालमर्यादेनंतर बदल्या कराव्यात असे अमात्य आग्रहाने प्रतिपादन करतात. वंशपरंपरागत पदाचा धोका लक्षात घेऊन अमात्यांनी म्हटले आहे. ' किल्याचा हवालदार सरनोबती करीत असता तो मृत्यू पावला असता तो मामला त्याचे पुत्रास अथवा भाऊबंदास न सांगावा '.  किल्याच्या घेऱ्यात असलेल्या देशमुख, देशपांडे आदि वतनदारांना जवळच्या किल्यावर सेवा न सांगता दहा पाच गावे दूर असलेल्या किल्यावर सेवा द्यावी असा धूर्त सल्ला अमात्यांनी दिलेला आढळतो. हवालदाराचा दिनक्रम कसा असावा याचे उत्कृष्ट वर्णन चिटणीसाने आपल्या बखरीत दिलेले आहेत.

शिवाजी महाराज वेषांतर करुन हवालदारांच्या निष्ठेची किंवा प्रामाणिकपणाची कसोटी घेत असत, अशा आशयाच्या काही कथा प्रचलित आहेत. निरनिराळ्या गडांना महाराज भेट देत असत ही गोष्ट मात्र कागदपत्रांच्या आधारे सिध्द करता येण्यासारखी आहे. किल्यावरील अधिकाऱ्यांनी

भ्रष्टाचारी वर्तन केले किंवा स्वामीद्रोह केला, तर त्याची गय केली जात नसे. विश्वास घातकी अधिकाऱ्यांना अत्यंत कडक शासन अमात्यांनी ' अज्ञापत्रात ' सांगितले आहे.

किल्ला जेवढा महत्वाचा असेल त्या प्रमाणात शिबंदी ठेवली जात असे. पुरंदरच्या किल्यावर शांततेच्या काळात १००० शिबंदी असे. आणीबाणीच्या प्रसंगी शिबंदीमध्ये वाढ केली जाई. गडावर काम करणाऱ्या लोकांना गडकरी अशी संज्ञा होती. गडाच्या रखवालीचे काम रामोशासारख्या जमातीतील लोकांकडे सोपविले जाई. गडावर गस्त घालण्याचा परिपाठ होता.

शिबंदी शिवाय गडावर ब्राम्हण, ज्योतिषी, शस्त्रवैद्य, लोहार, सुतार, पाथरवट,चांभार इत्यादी लोकांनाही गुणपरत्वे स्थान मिळत असे. कोणताही व्यक्ती  रिकामा ठेवू नये, असे अमात्य सांगतात. बारगीर, नाईकवाडी, रजपूत याचा समावेश शिबंदीमध्ये केला जाई.

किल्यावर अन्नधान्याचा साठा भरपूर असला पाहिजे, असे शिवाजी महाराजांचे धोरणच होते. सुरतेच्या इंग्लिश गव्हर्नरने २२ जानेवारी १६७७ रोजी लिहिलेल्या एका पत्रात ' शिवाजी धान्य गोठा मोठ्या प्रमाणावर गोळा करुन आपल्या किल्यावर साठवतो ' अशा आशयाची तक्रार केलेली आढळते. फेंच प्रवाशी ॲबे कॅरे याने रसाळगड आणि प्रचितगड या किल्यांकडे धान्याची पोती घेऊन चाललेल्या खेडुताची माहीती दिलेली आहे. त्यावरुन किल्यावरील धान्यसाठ्या बाबत मराठे अत्यंत जागरुक होते हे स्पष्ट होते. दोन किल्ले जवळजवळ असले म्हणजे त्यातील एक किल्ला कोठार म्हणून उपयोगात आणला जाई. रायगड जवळ असलेला लिंगणा किल्ला हे शिवकालीन धान्याचे कोठारच होते. इ.स.१६८२ मध्ये मोगलांनी ज्यावेळी रामसेजला वेढा घातला तेंव्हा केशो त्र्यंबक पेशवा याने जवळच असलेल्या त्रिंबकच्या किल्ल्याचा आश्रय घेऊन रामसेजच्या शिबंदीला धान्य आणि इतर सामान पुरविले होते. १८ व्या शतकात लिहिल्या गेलेल्या ' मेस्तक पुस्तका' तून गडावर कोणकोणत्या वस्तूंचा साठा करावा याची माहिती दिलेली आढळत. एक मेस्तककार लिहितो.

*धान्य आणि दुर्गे । शाबित असता शत्रु भंगे ।*
*सेना देश अवघे । सहजची मिळती ।।*

मराठ्यांच्या इतिहासामध्ये शिवकालात राज्यविस्तार आणि राज्यरक्षण किल्यांमुळे झाले. हे अमात्य सुध्दा मान्य करतात. त्यांच्या शब्दात शिवकालातील गटकोट दुर्गाचे महत्व सांगायचे म्हणजे गडकोट हेच राज्य ; गडकोट म्हणजे मूळ गडकोट म्हणजे सैन्याचे बळ, गडकोट म्हणजे राज्यलक्ष्मी, गडकोट म्हणजे आपली वसतिस्थळे, गडकोट म्हणजे सुखानिद्रागार, किंबहुना गडकोट म्हणजे आपले प्राणसंरक्षण होय.

अशा प्रकारे छत्रपती शिवाजी महाराजांनी किल्यांचे महत्व ओळखून किल्यांची व्यवस्था नीटपणे लावली होती.प्रत्येक व्यक्तीतील कौशल्य लक्षात घेऊन शिवरायांनी त्यांना त्या पध्दतीने काम दिले. म्हणून प्रत्येक व्यक्तीच्या हाताला काम मिळाले आणि स्वराज्याच्या उभारणीत सगळ्यांचे हातभार लागले. [१]

**छत्रपती शिवाजी महाराजांनी जिंकलेले किल्ले**

छत्रपत्री शिवाजी महाराजांनी जिंकलेले किल्ले जिल्ह्यानुसार

- **रत्नागिरी**

  आंबोळगड, बाणकोट , बारवाई , भवानीगड ,फत्तेगड / फत्तेदुर्ग, गोवा किल्ला,गोपाळगड,गोवळकोट,कनकदुर्ग ,कोळकेवाडी दुर्ग,महिमतगड,महिपतगड, मंडणगड,माणिकदुर्ग ,रसाळगड ,रत्नदुर्ग (भगवतीचा किल्ला) ,सुमारगड , सुवर्णदुर्ग

- **सिंधुदुर्ग**

  भगवंतगड , भरतगड , देवगडचा किल्ला, डच वखार (वेंगुर्ला कोट) ,हनुमंत गड, खारेपाटण, कोटकामते , महादेवगड, मनोहर मनसंतोष गड,नारायणगड (आंबोली), निवतीचा किल्ला, पधमगड (मालवण), राजकोट,रामगड, सर्जेकोट (मालवण), शिवगड, सिध्दगड (मालवण),सिंधुदुर्ग , वेताळगड ,यशवंतगड (रेडीचा किल्ला)

## ❖ रायगड

अवचितगड,भीमाशंकर,भिवगड/भिमगड,बिरवाडी,चांभारगड,चंद्रगड ते आर्थरसीट रेंज ट्रेक,चंद्रगड(ढवळगड),कुलाबा किल्ला,ठाकचा बहिरी, द्रोणागिरी, घोसाळगड, इरशाळ,जंजिरा,कर्नाळा,खांदेरी,खुबलढा किल्ला (थळचा किल्ला ),कोर्लई ,कुर्डुगड (विश्रामगड),लिंगाणा,मानगड,मंगळगड,माणिकगड,मिरगड(मिराडोंगर/सोनागिर), मृगगड, पदरगड,पद्मदुर्ग (कासा किल्ला),पालगड,पन्हाळेदुर्ग ( पन्हाळ गड किल्ला ), पेब (विकटगड),पेठ कोथळीगड ,प्रबळगड, रायगड,देवदंडा,सागरगड (खेडदुर्ग),सामरा जगड ,सांकशीचा किल्ला,सरसगड,सर्जेकोट (रायगड),शिवथरघळ,सोंडाई,सोनागिरी (कर्जत जवळ),सुधांगड,तळगड,उंदेरी

छत्रपती शिवाजी महाराजांनी किल्ल्यांचे महत्व ओळखले होते. म्हणून महाराजांनी दोन पातळयावर किल्यांच्या बाबतीत विचार केला. एक जास्तीत जास्त किल्ले जिंकणे आणि जिथे कुठे किल्ला बांधण्यासाठी योग्य जागा आहे. अशा ठिकाणी किल्ल्यांचे बांधकाम करणे.हे शिवरायांचे महत्त्वाचे कार्य होते.[१०]

## छत्रपती शिवाजी महाराजांच्या ताब्यातील किल्ले

छत्रपती शिवाजी महाराजांच्या ताब्यात असलेली किल्ले पुढील प्रमाणे आहेत. यात डोंगरी किल्ले, भूईकोट व सागरी किल्यांचा समावेश होतो. तसेच महाराष्ट्र, कर्नाटक तामिळनाडू व गोवा या सध्याच्या राज्यातील किल्याचाही समावेश आहे. यापैकी सुमारे १११ किल्ले छत्रपती शिवाजी महाराजंनी बांधलेली आहेत. अशी सभासद बखरीत आहे. तसेच त्यांनी ४९ किल्ले डागडुजी करुन त्यात आवश्यक ते बदल केले व ते अभेद्य बनविले या किल्यात शिवाजी महाराजांच्या अखत्यारीत ( स्वराज्याच्या मालकीची ) त्यावेळी असलेल्या (छत्रपती शिवरायांनी जिंकलेल्या, छत्रपती शिवरायांनी बांधलेल्या) किल्यांचा समावेश आहे. या यादीचा उद्देश छत्रपती शिवाजी महाराजांचे थोरपण व त्याचे लढवय्या स्वरुप दाखविण्याचा आहे. त्याची मजल कोठपर्यत होती हा सांगण्याचा उद्देश आहे.

छत्रपती शिवरायांनी स्वराज्याची सुरुवात बारा मावळ या प्रदेशातून केली हा प्रदेश जरी लहान होता तरी तो जंगल झाडी, डोंगर व नद्या यांनी मुक्त होता, तेथे आठ किल्ले होते. हा प्रदेश लष्करी दृष्टीतून अजिंक्य असाच होता. शिवाजी महाराजांचा कल अजिंक्य भूभागावर किल्ले बांधण्याचा होता. त्यांनी घाट तेथे किल्ला हे धोरण अंगिकारले होते. हे किल्ले एक प्रकारच्या तपासणी चौक्याच होत्या. तेथून कोणीही आत प्रवेश करु शकत नव्हते. प्रवेश केलाच तर वापस जाण्याची हमी नव्हती.

**घाट व तेथे बांधलेले किल्ले**

- अंबाघाट - रसाळगड
- कामथाघाट - कांगोरी
- कुंडीघाट - मौजगड
- कुंभीर्लीघाट - जयगड
- कुसूरघाट - भिवगड, टाकगड
- पिपरी घाट - सुधागड
- माताघाट - भवानगड
- रणतोंडी घाट - प्रतापगड
- विशाळगड घाट - विशाळगड, माचाळगड
- शेवल्या घाट - मानगड

हे किल्ले म्हणजे एक प्रकारचे पहारेकरीच होते. तसेच त्यांनी समुद्रावरुन मारा होऊ नये म्हणून किनार पट्टीही सुरक्षित केली. त्यांनी तेथे प्रत्येक १० ते १२ मैलावर सागरी किल्ला बांधला. एकट्या रत्नागिरी जिल्ह्यात त्यांचे ५२ किल्ले होते. पुण्यात ३० डोंगरी व २ भुईकोट असे ३२ किल्ले होते. ज्या रस्त्याने शत्रू येण्याची शक्यता होती. त्या मार्गात जास्त किल्ले बांधले गेले.

स्वराज्य अजिंक्य रहावे म्हणून त्यांनी किल्यांची रिंगणे तयार केली. बारा मावळ क्षेत्रात असलेल्या ८ किल्यांना अशेरी किल्ला, विशाळगड, सिंहगड, पुरंदर, वज्रगड, रायगड, तोरणा, तळा, घासाळ आणि सुधागड अशा बाहेरच्या रिगणातील किल्यांचे संरक्षण होते. ह्यास पूरक म्हणून त्यांनी त्याबाहेरही साल्हेर, मुल्हेर, रोहिडा, रांगणा असे रिंगण तयार केले. त्यासोबतच त्यांनी सागरी किल्ले  किल्यांची ही एक साखळी तयार केली. सिंधुदुर्ग, विजयदुर्ग, पदमदुर्ग, खांदेरी, कुलाबा, सुवर्णदुर्ग यांनी स्वराज्य अभेद्य ठेवले. शिवरायांनी समुद्रावर वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठी सागरी किल्ल्यांची निर्मिती केली होती.[११]

**छत्रपती शिवरायांच्या ताब्यातील किल्यांची यादी**

छत्रपती शिवाजी महाराजांच्या ताब्यात असलेले मावळ प्रांतातील किल्ले

(सध्याचे मावळ, सासवड, जुन्नर आणि खेड हे तालुके) येथे त्यांचे एकूण १९ किल्ले होते.

कुंवारी किल्ला,केळना किल्ला,तिकोना किल्ला,तुंग किल्ला,तोरणा किल्ला,दातेगड किल्ला,दौलत मंगल किल्ला,नारायणगड किल्ला,पुरंधर (पुरंदर) किल्ला,मोरगिरी किल्ला,राजगड किल्ला,राजमाची किल्ला,रुद्रमाळ किल्ला,रोहिडा किल्ला,लोहगड किल्ला,वासोटा किल्ला,विसापूर किल्ला,शिवनेरी किल्ला,सिंहगड किल्ला

**छत्रपती शिवाजी महाराजांचा ताब्यात असलेले सातारा व वाई प्रांतातील किल्ले एकूण ११ किल्ले**

कमलगड किल्ला,चंदनगड किल्ला,तायवडा किल्ला,नांदगिरी किल्ला,परळी (सज्जनगड) किल्ला,पांडवगड किल्ला,महिमानगड किल्ला,वंदनगड किल्ला,वर्धनगड किल्ला,वैराटगड किल्ला,सातारा किल्ला

**कऱ्हाड प्रांतातील किल्ले**

यात ४ किल्ले होते.

कसबा कऱ्हाड किल्ला,भूषणगड किल्ला,मच्छिंद्रगड किल्ला,वसंत गड किल्ला

**पन्हाळा प्रांतातील किल्ले**

एकूण १३ किल्ले

खेळणा किल्ला,गगनगड किल्ला,गजेंद्रगड किल्ला,पन्हाळा किल्ला,पावनगड किल्ला,बावडा किल्ला,भिवगड किल्ला,भुदरगड किल्ला,भूपाळगड किल्ला,मदनगड किल्ला,रांगणा किल्ला,विशाळगड किल्ला

**कोकण , बंधारी व नळदुर्ग प्रांतातील किल्ले**

एकूण ६० किल्ले आहेत.

मालवण,सिंधुदुर्ग,विजयदुर्ग,जयदुर्ग,रत्नागीरी,सुवर्ण दुर्ग,खांदेरी,उंदेरी,कुलाबा,राजकोट, अंजनवेल,रेवदंडा,रायगड,पाली,कलानिधीगड,आरनाळा,सुरंगगड,मानगड,महिपतगड, महिमंडन,सुमारगड,रसाळगड,कर्नाळा,भोरप,बल्लाळगड,सारंगगड,माणिकगड,सिंदगड, मंडणगड,बाळगड,महिमंतगड,लिंगाणा,प्रचीतगड,समानगड,कांगोरी,प्रतापगड,तळागड, घोसाळगड,बिरवाडी,भैरवगड,प्रबळगड,अवचितगड,कुंभगड,सागरगड,मनोहरगड, सुमानगड,मित्रगड,प्रल्हादगड,मंडणगड,सहनगड,सिकरागड,वीरगड,महीधरगड,रणगड,सेट गागड,मकरंदगड,भास्करगड,माहुली,काबन्ही, पालगड.

**त्र्यंबक प्रांतातील किल्ले**

त्र्यंबक,बाहुला,मनोहरगड,थळागड,चावंडस,मृगगड,करोला,राजपेहर,रामसेज,माणसागड, हर्षण,जवळागड,चांदवड,सबलगड,आवढा,कणकई,गडगडा,सिध्दगड,मनरंजन,जीवधन, हडसर, हरींद्रगड,मार्कडेयगड,पटागड,टणकई

**बागलाण प्रांतातील किल्ले**

सालेरी,नाहावा,हरसळ,मुलेरी ,कणेरा,अहिवंत गड,धोडप

**बनगड प्रांतातील किल्ले**

(धारवाड जिल्ह्यातील बराचसा भाग)

वनगड,गहनगड,चिमदुर्ग,नलदुर्ग,मिरागड,श्रीमंतदुर्ग,श्रीगदनगड,नरगुंद,महंतगड,कोपलगड, बाहदुरबिंडा,व्यंकटगड,गंधर्वगड,ठाकेगड,सुपेगड,पराक्रमगड,कनकादिगड,ब्रम्हगड,चित्रदुर्ग, प्रसन्नगड,हडपसरगड,कांचनगड,अचलागिरीगड,मदनगड

**फोंडे बिदनूर प्रांतातील किल्ले**

कोंडफोंडे,कोट काहूर,कोट बकर,कोट ब्रम्हनाळ,कोट कडवळ,कोट अकोले, कोट कठर,कोट कलबर्ग,कोट शिवेश्वर,कोट मंगरुळ,कोट कडणार,कोट कृष्णागिरी

**कोल्हापूर, बाळापूर प्रांतातील किल्ले**

कोल्हार,ब्रम्हगड,वडन्नगड,भास्करगड,महीपाळगड,मृगमदगड,आंबेनिराईगड,बुधला कोट, माणिकगड,नंदीगड,गणेशगड,खळगड,हातमंगळगड,मंचकगड,प्रकाशगड,भीमगड, प्रेईवारगड,सोमसेखरगड,मेदगिरीचेनगड,श्रीवर्धनगड,बिदनूरकोट,मलकोल्हारकोट,ठाकूरग, सरसगड, मल्हारगड,भूमंडलगड,बिरुटकोट

**श्रीरंगणपट्टण प्रांतातील किल्ले**

कोटधर्मपूरी ,हरिहरगड,कोटगरुड,प्रमोदगड,मनोहरगड,भवानी दुर्ग ,कोट अमरापूर, कोट कुसूर,कोट तळेगिरी ,सुंदरगड,कोट तळगोंडा,कोट आटनूर,कोट त्रिपादपुरे,कोट दुटानेटी,कोट लखनूर,कळपगड,महिनदीगड,रंजनगड,कोट आलूर,कोट शामल,कोट विराडे,कोट चंद्रमाल

**कर्नाटक प्रांतातील किल्ले**

जगदेव गड, सुदर्शनगड,रमणगड,नंदीगड,प्रबळगड,बहिरवगड,वारुणगड,महाराजगड, सिध्दगड,जवादीगड,मार्तडगड,मंगळगड,गगनगड,कृष्णगिरी,मल्लिकार्जुनगड,कस्तूरीगड, दीर्घपलीगड,रामगड

**वेल्लुर प्रांतातील किल्ले**

कोट आरकट,कोट लखनूर,कोट पळणापट्टण,कोट त्रिमल,कोट त्रिवादी,पाळेकोट, कोटत्रिकोनदुर्ग,कैलासगड,चंजिवराकोट,कोटवृंदावन,चेतपान्हली,कोलबाळगड,रसाळगड, कर्मटगड,यशवंतगड,मुख्यगड,गर्जनगड,मंडविडगड,महिमंडगड,प्राणगड,सामरगड, साजरागड, गोजरागड,दुभेगड,अनुरगड

**चंदी प्रांतातील किल्ले**

राजगड,चेनगड,कृष्णागिरी ,मदोन्मत्तगड,आखलूगड,काळा कोट [१२]

**छत्रपती शिवाजी महाराजांनी किल्ले बांधकामात वापरलेला वैज्ञानिक दृष्टीकोन**

छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वराज्याची निर्मिती केली. त्यांच्या या स्वराज्याचं वैभव म्हणजे गड-किल्ले होते. शिवाजी महाराजांनी स्वराज्याची मुहुर्तमेढ गडापासूनच केली. त्यांनी अनेक गड जिंकूनच स्वराज्य मिळविले आणि ते वाढविले तर अनेक गड स्वतः बांधून घेतले. आजही महाराष्ट्रातल्या कोणत्याही भागातला लहानमोठा कोणताही गड दृष्टीस पडला तर छत्रपती शिवाजी महाराजांचे स्वराज्य त्यांची ती घोडदौड लढाया असे स्फूर्तिदायक प्रसंग आपल्यासमोर उभे रहातात.

छत्रपती शिवाजी महाराजांनी त्यांच्या आयुष्यात अनेक किल्ले बांधून त्यांचे दुर्गप्रेम सिध्द केले आहे. जगाच्या पाठीवर इतर कोणत्याही राजाने एवढी दुर्गबांधणी केली नसेल, तेवढी अवघ्या ३५ वर्षाच्या कारकीर्दीत महाराजांनी स्वतः बांधलेल्या किल्यांची संख्या जवळपास १११ तर दुरुस्त केलेल्या किल्यांची संख्या ४९ आहे. एकूण त्यांच्या ताब्यातील किल्यांची संख्या ३६० एवढी होती.

छत्रपती शिवाजी महाराजांनी नवीन दुर्ग बांधताना जी दूरदर्शता दाखवली ती अजोड आणि जे तंत्रज्ञान वापरले तेही अभिनव असे होते. प्रत्येक किल्ला बांधताना महराजांनी नवनवीन प्रयोग केले होते. विशेष म्हणजे महाराजांचे सर्व प्रयोग वैज्ञानिक कसोटीवर खरे ठरणारे असेच होते. यातही महत्वाचे म्हणजे महाराजांचा एकही प्रयोग असफल झाला नाही. प्रत्येक प्रयोग एकापेक्षा एक

असे सरस आणि अप्रतिम असेच होते. आज आपण २१ व्या शतकात वावरत आहोत. परंतु छत्रपती शिवाजी महाराजांनी १७ व्या शतकात जी वैज्ञानिक दृष्टी वापरली. ती विशेष बाब होती. आपल्या शत्रूशी चार हात करताना महाराजांनी वैज्ञानिक दृष्टीकोनाचा अंगिकार केला. या वैज्ञानिक दृष्टीकोनाचा उपयोग किल्यांचे बांधकाम करतांना वापरलेले आहे. म्हणून तत्कालीन शत्रूंना महाराजांच्या यशस्वीतेचे गमक कळू शकले नाही. महाराजांनी प्रत्येक किल्ला बांधताना एक वेगळी पध्दत वापरलेली होती. त्यामुळे जेवढे किल्ले तेवढ्या पध्दती अशी व्यूहरचना तयार झाली होती. प्रत्येक किल्याच्या बांधकामात महाराजांनी जे तंत्रज्ञान वापरले होते. आज २१ व्या शतकातही विचार करत असतांना महाराजांनी किल्याच्या बांधकामात वापरलेला वैज्ञानिक दृष्टीकोन खूप महत्त्वाचा वाटतो.[१३]

**१) राजगड :**

छत्रपती शिवाजी महाराजांनी आपल्या आयुष्यात पहिल्यांदा बांधकामासाठी घेतलेला किल्ला म्हणजे राजगड होय. राजगड या किल्याचे बांधकाम करीत असतांना शिवरायांनी वैज्ञानिक दृष्टीकोनाचा उपयोग केलेला आहे. राजगड हा किल्ला छत्रपती शिवरायांना अर्ध भग्न अवस्थेत प्राप्त झाला होता. त्याची योग्य अशी डागडुजी करुन शिवरायांनी त्याला व्यवस्थित रुप दिले. मुरुंबदेव या पुर्व नावाचा हा गड इ.स. १४९० साली अहमदनगरच्या निजामशाहाने ताब्यात घेतला इ.स. १६४२ साली आदिलशाहाचे जहागिरदार श्री शहाजीराजांना जहागिरी म्हणून मिळाला होता. इ.स. १६४७ साली छत्रपती शिवाजी महाराजांनी तो किल्ला जिंकून स्वराज्यात घेतला व १६५४ मध्ये त्याचा विकास करुन शिवरायांनी त्याला राजधानीचे सौभाग्य बहाल केले. स्वराज्याच्या पहिल्या राजधानीचा सन्मान दिला. छत्रपती शिवरायांनी येथे २४ वर्ष राज्य कारभार केला. सह्याद्रीच्या उंच पर्वत रांगेवर गुंजन मावळात उंचकडे, कपारी व खोलदऱ्यांत वाघोली, वारंगी, बावले, सांदोशी, पाचाड, वाघेरी, छत्री निजामपूर, आमडोशी गावांचा परिसर असलेला भव्य गड बेलाच्या पानासारखा तीन दिशांना पदमावती, संजीवनी, सुवेळा असा तीन माचीसह भव्य आहे.

राजगड हा किल्ला समुद्रसपाटीपासून सुमारे १४०० मीटर उंच आहे. इ.स. ११ व्या शतकात महाराष्ट्रात यादवांच्या अधिपत्याखाली इ.स. १२ व्या शतकात मराठी पाळेगारांच्या ताब्यातून जावळीच्या मोऱ्यांकडून शिवरायांनी गड जिंकून घेणे, स्वराज्याचा कारभार पाहणे, सुरतेहून आणलेली लुट ठेवणे, रायगडाचे बांधकाम करणे, शिवराज्याभिषेकाचा सुमंगल कारभार, या गडाखालील पाचाड येथे जिजाऊंचे निधन, राजारामांचा विवाह आणि महाराजांची गरुड भरारी अशा महत्वाच्या घटना येथे घडल्या . खजिना, रातशाळा, धान्यकोश, जलस्थान, नगारखाना, व्यायामशाळा, वस्त्रागार, पाकशाळा, वैद्यशाळा, शिकारखाना, दारुखाना, हत्तीशाळा, आरोग्यगृह, उंटशाळा, डेऱ्यांची जागा, लेखशाला असे या गडावरील अठरा कारखाने प्रसिध्द आहेत. तसेच नाणी पाडण्याचा कारखाना, अश्वशाळा, गोशाळा हे देखील सर्व सोयींनी बनवलेली होती.असा वैभवशाली, भाग्यशाली गड शिवरायांच्या पवित्र सहवासाने पावन झाला आहे.

**किल्यांच्या बांधकामातील वैज्ञानिकता :**

छत्रपती शिवाजी महाराजांनी राजगड किल्यांचे बांधकाम करीत असतांना जे तंत्रज्ञान वापरले ते विशेष आणि उल्लेखनीय आहे. आज आपण २१ व्या शतकात विज्ञान आणि तंत्रज्ञानाचा उपयोग करतो. परंतु छत्रपती शिवरायांनी १७ व्या शतकात जो विज्ञान आणि तंत्रज्ञानाचा उपयोग केलेला आहे. तो वाखाणण्या जोगा आहे. राजगड किल्ला हा खरोखरच दुर्गराज राजगड शोभेल असाच अजिंक्य आणि बेलाग असा आहे. राजगड किल्याच्या संरक्षणासाठी तीन बाजूला तीन माच्या नावे सुवेळा, संजीवनी आणि पदमावती असून मध्यभागी बालेकिल्ला आहे. किल्याकडे येणाऱ्या वाटा अत्यंत दुर्गम आणि गडाची चढण अत्यंत अवघड आहे. शत्रूंनी कितीही प्रयत्न केला तरी तो गडावर चढू शकत नाही. शत्रुला घाम फुटेल पण तो गडावर चढू शकणार नाही. महाराजांनी १७ व्या शतकात अशा विज्ञान आणि तंत्रज्ञानाचा उपयोग केला ज्याद्वारे ते शत्रुला आपल्या विज्ञान आणि वैज्ञानिक दृष्टीकोनाच्या आधारे शत्रुला तोंड देऊन आपले स्वराज्य

अबाधित ठेवले. राजगडाला दुहेरी तटबंदी आहे. चिलखती बुरुजावर दुहेरी तटबंदी असणारा हा जगाच्या पाठीवरील एकमेव किल्ला आहे.

१९८० मध्ये पोर्तुगालच्या राजधानीत आंतरराष्ट्रीय दर्जाचे दुर्गप्रदर्शन भरले होते. जगातील सर्व वेगवेगळ्या श्रेणीतील किल्ले या प्रदर्शनात प्रतीकृती सह ठेवले होते. या सर्व किल्यांत प्रथम क्रमांकार ज्या किल्याचे नाव होते तो किल्ला होता दुर्गराज राजगड.

या वरुन असे लक्षात येते की, १७ व्या शतकात छत्रपती शिवाजी महाराजांनी बांधलेल्या किल्याचे कौतुक होते. महत्व लक्ष्यात येते. शिवरायांनी १७ व्या शतकात बांधलेल्या किल्याच्या बांधकामावरुन शिवाजी महाराजांची दूरदृष्टी आणि वैज्ञानिक दृष्टिकोन आपल्याला दिसून येतो.[१४]

**२. प्रतापगड**

प्रतापगड किल्ला समुद्रसपाटीपासून ३५५६ फुट इतका उंच आहे. गिरीदुर्ग प्रकारचा हा किल्ला असून प्रतापगडाच्या जवळ महाबळेश्वर आहे.

**किल्याचा इतिहास -**

छत्रपती शिवाजी महाराजांनी १६५६ मध्ये जावळीचे खोरे जिंकून भोरप्याच्या डोंगरावर हा गड बांधून घेतला. या भोवताली सह्याद्रीच्या रांगा, जावळीचे घनदाट अरण्यात हा गड आहे. याच्या पायथ्याशीच पारगावामध्ये श्रीप्रभूरामवरदायीनी देवीचे जागृत पुरातन देवस्थान आहे. खळखळ वाहत जाणारी कोयना नदीही त्याच्या सौदर्यांत वैभवात भर घालते. वाडा या गावातून या गडावर जाण्याचा मार्ग आहे. शिवाजी महाराजांनी या गडावर आई तुळजाभवानीची स्थापना केली होती. तसेच स्वराज्याभिषेक करायच्या आधी महाराजांनी याच देवीला सव्वा मण सोन्याचे छत्र चढवले होते.

छत्रपती शिवरायांच्या पराक्रमातील जगप्रसिध्द अफजलखाचा वध हा प्रसंग याच गडावर घडला व मूठभर मावळ्यांनी खानाच्या अफाट सैन्याची दाणादाण उडवली होती. असा हा निष्ठावंत धारकरी गड आहे. स्वराज्यद्रोही खंडोजी खोपडे याचे हातपाय कलम करण्याची जबर शिक्षाही

येथेच झाली. श्री भवानी मंदिर, श्री वेताळेश्वर मंदिर, श्री हनुमान मंदिर, नगारखाना, तलाव गडावरील निवासस्थाने, राजसदर, यशवंत बुरुज असे समृध्द भांडार या गडावर आहे. नंतरच्या काळात येथे अफजलखानाची कबर शिवरायांचा अश्वारुढ भव्य पुतळा येथे बसवण्यात आला आहे.

**किल्याच्या बांधकामातील वैज्ञानिकता -**

छत्रपती शिवाजी महाराजांनी प्रतापगड हा किल्ला बांधत असताना ज्या जागेची निवड केली. त्यातून महाराजांचा वैज्ञानिक दृष्टीकोन दिसून येतो विज्ञानाचा उपयोग करुन शत्रुला कसे नामोहरम करावे. ही कला महाराजांनी अवगत केली होती. त्यासाठी त्यांनी जी जागा निवडली ती डोंगर माथ्यावर होती. आणि ती वनदुर्गाच्या श्रेणीत येत होती. जावळीच्या बिकट जंगलात अगदी उंचावर हा किल्ला बांधला होता.

**तटबंदी बांधकामातील तंत्रज्ञान -**

छत्रपती शिवाजी महाराजांनी या किल्याचे बांधकाम करीत असतांना जे तंत्रज्ञान वापरले हे विशेष उल्लेखनीय असे होते. या किल्याचे वैशिष्ट्य म्हणजे या किल्यावर डोंगरमाथ्यापासून सुमारे २/३ भागावर चढण संपते आणि येथेच पहिली तटबंदी आहे. आणि त्यातच गडाचा दरवाजा सुध्दा आहे. परंतु शत्रुपक्षाला ते लक्ष्यात येणार नाही. असे हे तंत्रज्ञान या किल्लात विकसित केलेले आहे.

**शत्रु सैन्यांची मानसिकता खच्ची करणे**

छत्रपती शिवरायांनी विविध किल्यांचे जे बांधकाम केले त्यात अशी पध्दत वापरण्यात आली की, शत्रुने किल्यावर आक्रमण करीत असतांना कोणत्याही परिस्थितीत शत्रु पक्ष आपल्या किल्यावर आक्रमण करणार नाही याची काळजी घेतली. शत्रु सैन्याचे मानसिक धैर्य खच्ची व्हावे म्हणून गडपायथ्यापासून महादरवाजापर्यंत घेतलेल्या दक्षतापूर्वक योजनेमुळे धसका घेतलेल्या शत्रु सैन्याला महादरवाजापर्यंत आल्यानंतरही अजून गडमाथा खूप उंचावर आहे हे कळल्यानंतर

शत्रूपक्षाचे धैर्य खच्ची होणे स्वाभाविक असते आणि अशाच वेळी वरुन शस्त्र-अस्त्रांचा प्रचंड मारा करुन शत्रूला नामोहम करता येत होते.

अशा प्रकारे छत्रपती शिवरायांनी आपल्या प्रतापगड किल्याच्या बांधकामात अशा प्रकारे वैज्ञानिक दृष्टीकोनाचा वापर केलेला दिसून येतो.[१५]

**सिंधुदुर्ग किल्ला -**

सिंधुदुर्ग किल्ला हा जलदुर्ग असून हा महाराष्ट्राच्या सिंधुदुर्ग जिल्ह्यातील मालवण जवळ अरबी समुद्रात छत्रपती शिवाजी महाराजांनी बांधलेला जलदुर्ग आहे. २५ नोव्हेंबर १६६४ रोजी किल्याच्या बांधकामाला सुरुवात झाली. उभारणीसाठी तीन वर्षाचा कालावधी लागला भारत सरकारने या किल्याला २१ जून २०१० रोजी महाराष्ट्रातील राष्ट्रीय संरक्षित स्मारक म्हणून घोषित केले आहे.

छत्रपती शिवाजी महाराजांच्या आरमारी दलाचे आद्यस्थान मालवण येथील जंजिरा म्हणजे हा सिंधुदुर्ग किल्ला होय. महाराजांकडे ३६२ किल्ले होते. या सर्व किल्यांच्या पूर्वेस विजापूर, दक्षिणेस हुबळी, पश्चिमेस अरबी समुद्र आणि उत्तरेस खानदेश व वऱ्हाड या प्रदेशापर्यंतचा विस्तार होता. भूईकोट आणि डोंगरी किल्यांच्या बरोबरीने सागरी मार्गावरील शत्रूंची स्वारी परतून लावण्यासाठी जलदुर्गाची निर्मिती महत्वाची आहे. हे ओळखून शिवाजी महाराजांनी सागरी किल्ले निर्माण केले. चांगल्या भक्कम आणि सुरक्षित स्थळांचा शोध घेऊन समुद्र किनाऱ्याची पाहणी केली इ.स. १६६४ साली मालवण जवळील कुरटे नावाचे काळाकभिन्न खडक असलेले बेट किल्यासाठी निवडले. महाराजांच्या हस्ते किल्याच्या तटांची पायाभरणी झाली. आज मोरयाचा दगड या नावाने ही जागा प्रसिध्द आहे.

**१) किल्यासाठी जागेची निवडः**

छत्रपती शिवाजी महाराजांनी सिंधुदुर्ग किल्ला बांधण्यासाठी ज्या जागेची, स्थळाची निवड केली. त्यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो. अथांग अशा समुद्रात योग्य अशा जागेची निवड करणे अतिशय अवघड आणि कठिण काम होते. परंतु महाराजांकडे वैज्ञानिक

दृष्टिकोन असल्यामुळे हे कार्य सोपे झाले. ज्या चार कोळी लोकांनी किल्ला बांधण्यासाठी योग्य स्थळ शोधण्यास महाराजांना मदत केली त्यांना गावे इनाम देण्यात आली. यावरुन महाराजांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

**२) किल्ल्याचे बांधकाम**

योग्य अशी जागा निवडल्यानंतर महाराजांनी किल्याचे जे बांधकाम केले. त्यात सुध्दा त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो. किल्ल्यांचे बांधकाम बळकट व्हावे म्हणून त्याची पायाभरणी करतांना ५ खंडी शिसे ओतण्यात आले. बांधकामात वापरली गेलेली वाळू तीन-चार वेळा स्वच्छ धुवून क्षारमुक्त करुन पुन्हा गोड्या पाण्यात बुडविली गेली. त्यानंतर त्यात चूनखडी मिसळून बांधकाम केले गेले.

या खडकावर समुद्र मार्गानी व्यापलेले क्षेत्र सुमारे ४८ एकर आहे. त्यांचा तट २ मैल इतका आहे. तटांची उंची ३० फुट असून रुंदी १२ फुट आहे. तटास ठिकठिकाणी भक्कम असे एकंदर २२ बुरुज आहेत. बुरुजांभोवती धारदार खडक आहे. पश्चिमेस आणि दक्षिणेस अथांग सागर पसरलेला आहे.

**अ) किल्यात शौचालयाची व्यवस्था**

१७ व्या शतकात पर्यावरणाला पूरक सार्वजनिक स्वच्छतेची कल्पना सूचणे आणि ती प्रत्यक्षात अमलात आणणे ही विशेष बाब होती. आज आपण आधुनिक युगात, विज्ञान युगात याचा विचार करतो परंतु मध्ययुगात शिवाजी महाराजांनी विज्ञानाला साजेसा विचार करुन शौचालय निर्माण करणे यात छत्रपती शिवाजी महाराजांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.आज स्वच्छता मोहिम संपूर्ण भारतात चालू आहे.महाराष्ट्रात देखील घरोघरी शौचालय बांधकामाचे कार्य सुरु आहे. आज आपण २१ व्या शतकात स्वच्छतेच्या बाबतीत जागरुक आहोत.परंतु १७ व्या शतकात शिवाजी महाराज स्वच्छतेच्या बाबतीत किती जागरुक होते हे आपल्याला या ठिकाणी दिसून येते.

**ब) उंबराच्या लाकडाचा उपयोग -**

छत्रपती शिवाजी महाराज विविध किल्ल्यांचे बांधकाम करीत असतांना त्यात जे तंत्रज्ञान वापरले ते विज्ञानाच्या कसोटीवर खरे उतरणारे होते. सिंधुदुर्ग किल्याचे बांधकाम करीत असतांना वैज्ञानिक दृष्टिकोन वापरलेला दिसून येतो. किल्याच्या पायाभरणीपासून ते किल्याच्या पूर्ण बांधकामापर्यंत दिसून येतो.किल्याचे बांधकाम करीत असतांना ज्या प्रमाणे चुनखडक लागतो. त्याचप्रमाणे मोठ्या प्रमाणावर लाकडाची सुध्दा आवश्यकता असते. परंतु या ठिकाणी लाकू ड वापरत असतांना कोणता लाकूड टिकाऊ आहे आणि तो कसा दिर्घकाळापर्यंत टिकतो याचा महाराजांनी विचार केलेला होता. यावरुन महाराजांचा वैज्ञानिक दृष्टिकोन आपल्याला दिसून येतो. किल्याच्या बांधकामात उंबराच्या लाकडाचा उपयोग केलेला आहे. कारण उंबराचे लाकूड दीर्घकाळपर्यंत टिकून राहते. हे महाराजांनी जाणले होते.

**क) किल्यात गोड्या पाण्याची व्यवस्था**

छत्रपती शिवाजी महाराजांनी किल्याच्या बांधकामासाठी अशी जागा निवडली की, त्यामुळे किल्याचे बांधकाम सर्वोत्तम झाले. या किल्याच्या परीसरात गोड्या पाण्याच्या तीन विहिरी आहेत. या विहिरीचे पाणी चवीला अत्यंत गोड लागते. किल्याच्या बाहेर खारे पाणी आणि आत गोड पाणी हा निसर्गाचा चमत्कार मानला पाहिजे. त्यामुळे किल्ल्यावर राहणे सुलभ झाले आहे. पाण्याचा अतिरिक्त साठा करण्यासाठी एक कोरडा तलाव बांधण्यात आला होता. सध्या यातील वापर पावसाळ्यात पिकवला जाणारा भाजीपाला व कपडे धुण्यासाठी होतो.

निसर्गात अशी विविध संसाधने असतात. त्या संसाधनाचा शोध घेऊन उपयोग करण्याची दृष्टी मानवाला असणे आवश्यक असते. अशा संसाधनाचा उपयोग करतांना निसर्गाचा समतोल बिघडू न देता त्यापासून मानवाचा भौतिक विकास करुन त्यांचे कल्याण करणे म्हणजेच वैज्ञानिक दृष्टिकोन होय. हा वैज्ञानिक दृष्टिकोन मध्ययुगीन काळात छत्रपती शिवाजी महाराजांनी स्विकारला होता हे यावरुन दिसून येते.

**३. किल्याचे महत्व -**

छत्रपती शिवाजी महाराजांच्या आरमारात या किल्याला फार महत्व होते. किल्ल्याचे क्षेत्र कुरटे बेटावर ४८ एकरावर वसलेले आहे. तटबंदीची लांबी साधारण ३ किलोमीटर आहे. बुरुजांची संख्या ५२ असून ४५ दगडी जिने आहेत. किल्ल्यावर शिवाजी महाराजांच्या काळातील गोड्या पाण्याच्या दगड विहिरी आहेत. त्याची नावे दूध विहिर, साखर विहिर, दही विहीर अशी आहेत.

आरमारी शक्तीचा उपयोग करुन छत्रपती शिवाजी महाराजांनी परकीय शत्रू सिद्दी, पोर्तुगीज, इंग्रज यांना शह देऊन सागर किनाऱ्याचे संरक्षण केले म्हणून सिंधुदुर्ग हा किल्ला आरमारी राजधानी म्हणून प्रसिध्द आहे.

या किल्ल्याचे महत्व सांगतांना शिवकालीन चित्रगुप्त याने लिहिलेल्या बखरीत याबाबत पुढील मजकूर नमूद केलेला आहे.

चौऱ्याऐंशी बंदरात हा जंजिरा अठरा टोपीकरांचे उरावर शिवलंका, अजिंक्य जागा निर्माण केला.

*सिंधुदुर्ग जंजिरा, जगी अस्मान तारा*

*जैसे मंदिराचे मंडन, श्रीतुलसी, वृंदावन,*

*राज्याचा भूषण अलंकार !*

*चतुर्दशमहारत्नापैकीच पंधरावे रत्न*

*महाराजांस प्राप्त जाहले.*

परकीय शत्रूची आक्रमणाची भविष्यातली कल्पना जाणूनच शिवाजी महाराजांनी कुरटे बेटावर किल्ला बांधण्याचे ठरवून दि. २५ नोव्हेंबर १६६४ रोजी भूमिपूजन करुन कामाला प्रारंभ केला. स्वराज्याचे स्थापत्य तंत्रज्ञ श्री हिरोजी इंदुलकर यांनी सुमारे तीन हजार कुशल कारागिरांकडून व सुमारे एक कोटी रुपये खर्चून हा गड बांधून घेतला. दि. २९ मार्च १६६७ ला याचे निर्माण कार्य पूर्ण झाले. व शिवरायांनी त्याला स्वराज्यात समाविष्ट करुन भगवा झेंडा फडकवला व त्याला सिंधुदुर्ग हे नाव दिले. मालवण गावापासून या दुर्गावर जाता येते.

अंजिक्य धारणीचा, खळखळत्या सागरात असलेला, ५० एकर क्षेत्रफळाचा ३० फुट उंच व १० फुट जाड -रुंद अशी भव्य तटबंदी, भव्य ४२ बुरुज,शिसे ओतून पाया भरलेला आणि त्याच बरोबर राणीचा वेळा , साखरवाव, दहीबाव, दुधबाव, निषशाषा बुरुज, दारु कोठार, धान्य कोठार, राजवाडा, संरक्षक तटबंदी अशा वैभव संपनतेने सिंधुदुर्ग विराजलेला आहे.[१६]

**सुवर्ण दुर्ग : -**

**भौगोलिक स्थान -** हर्णे बंदर प्राचीन काळापासून प्रसिध्द आहे. सुवर्णदुर्ग या जलदुर्गामुळे हर्णे बंदराला ऐतिहासिक महत्वही प्राप्त झालेले आहे. सुवर्ण दुर्ग किल्ल्याच्या रक्षणासाठी हर्णेच्या सागरी किनाऱ्यावर तीन किनारी किल्ल्यांची उभारणी करण्यात आलेली आहे. ते तीन दुर्ग म्हणजे कनकदुर्ग, पत्तेदुर्ग आणि गोवागड.

**राष्ट्रीय संरक्षित स्मारक -**

भारत सरकारने या किल्ल्याला दिनांक २१ जून १९१० रोजी महाराष्ट्रातील राष्ट्रीय संरक्षित स्मारक म्हणून घोषित केलेले आहे.

**किल्ल्याचा इतिहास -**

रत्नागिरी जिल्ह्यातल्या हरणाई बंदराजवळ खळखळणाऱ्या समुद्रात सुवर्ण दुर्ग आहे. इतिहासात मराठ्यांचे आरमारी केंद्र अशी याची ख्याती आहे. डिसेंबर १६६४ मध्ये शिवाजी महाराजांनी विजापूरच्या आदिलशाहीच्या राजवटीतून हा दुर्ग जिंकून घेतला आणि त्याचे पुनर्निर्माण करुन नवे स्वरुप प्रदान केले.

**छत्रपती शिवरायांनी किल्ल्याच्या पुनर्बांधणीत वापरलेला वैज्ञानिक दृष्टिकोन : -**

छत्रपती शिवाजी महाराजांनी सुवर्णदुर्ग या किल्ल्याची पुनर्बांधणी करतांना जो वैज्ञानिक दृष्टिकोन वापरला तो वाखाणण्याजोगा आहे. शत्रूशी चार हात करीत असतांना आपल्या किल्ल्याला भक्कमपणा देत असतांना वैज्ञानिक दृष्टिकोनाचा वापर केल्यास ते अधिक सुरक्षित आणि भक्कम होतील. याकडे शिवरायांनी विशेष लक्ष दिले.

**१) भव्य बुरुजांची निर्मिती**

छत्रपती शिवाजी महाराजांनी सुवर्णदुर्ग किल्ल्यांची पुनर्बांधणी करीत असतांना जो वैज्ञानिक दृष्टिकोन वापरला ते आपल्याला ठळकपणे दिसून येते. त्यासाठी महाराजांनी भव्य बुरुजांची निर्मिती केली. त्यामुळे शत्रूला सुवर्णदुर्ग किल्ल्यावर आक्रमण करणे शक्य झाले नाही. त्यामुळे आपल्या स्वराज्याचे रक्षण करणे सोपे गेले.

**२) तळघरांची निर्मिती :-**

छत्रपती शिवरायांनी सुवर्णदुर्गाची उभारणी करीत असतांना जे तंत्रज्ञान वापरले त्यातून त्यांचे विज्ञान आणि तंत्रज्ञानाचे ज्ञान आपल्याला दिसून येते. या ठिकाणी शिवरायांनी तळघरांची निर्मिती करित असतांना हे विज्ञान आणि तंत्रज्ञान वापरले. सुवर्णदुर्गावर शत्रूचे आक्रमण होणार नाही. याची पुरेपूर काळजी घेण्यात आली होती. पण एखादेवेळेस आक्रमण झाल्यास सुरक्षित ठिकाणी राण्यासाठी तळघरांची निर्मिती करण्यात आली.यातून शिवरायांची दूरदृष्टी आणि व्यापक दृष्टिकोन दिसून येतो.

**३) तटबंदीची निर्मिती**

नुसता किल्ला बांधून उपयोगाचे नाही तर त्या किल्ल्याला संरक्षण देणारे तटबंदी सुध्दा अतिशय महत्वाचे आहे हे शिवरायांनी ओळखले होते. म्हणून तशा पध्दतीची तटबंदी निर्माण करण्यात आली यातून महाराजांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

**४) पाण्याची तळे निर्माण करणे : -**

किल्यांच्या अवती भोवती खारे पाणी आहे. अशा खाऱ्यापाण्यात गोड्या पाण्याचा शोध घेणे शक्य नव्हते.परंतु महाराजांना भूगोलाचा आणि विज्ञानाचा अभ्यास असल्यामुळे ते शक्य झाले होते. यातून शिवरायांचा वैज्ञानिकता दिसून येते.[१७]

## विजयदुर्ग

छत्रपती शिवाजी महाराजांनी आपल्या स्वराज्याचे सरंक्षण करण्यासाठी महाराष्ट्राला लाभलेल्या ७२० किलोमीटर सागरी किनाऱ्यावर जलदुर्ग उभारले. सिंधुदुर्ग, सुवर्णदुर्गा नंतर विजयदुर्गाचा निर्मिती केली. जो पर्यंत सागरी किनारा सुरक्षित रहात नाही तो पर्यंत आले स्वराज्य सुरक्षित रहात नाही. म्हणून महाराजांनी सिंधुदुर्ग, सुवर्णदुर्ग पाठोपाठ विजयदुर्गाची निर्मिती केली.

## किल्ल्याचा इतिहास :

मुंबई - गोवा महामार्गावरील तरेळे गावाजवळ इ.स. १२ व्या शतकात राजा शिलाहार भोजने घेरिया या नावाने हा दुर्ग निर्माण केला. इ.स. १२१८ देवगिरीच्या यादवांच्या राजवटीत इ.स. १५२६ विजापूर अदिलशहाच्या ताब्यात असलेला हा किल्ला इ.स. १६५३ मध्ये शिवाजी महाराजांनी जिंकून स्वराज्यात मिळवला . अफाट समुद्रांच्या लाटात इतिहासाने रोमरोम नटलेला हा महान किल्ला शिवरायांनी विजयदुर्ग असे नाव दिले. तिहेरी स्वरुपाची अजस्त्र तटबंदी , रक्षणकर्ते २७ भव्य बळकट बुरुज तीन भव्य प्रवेशद्वारे,दुर्गापासून १५० मीटर अंतरावर शत्रूची जहाजे, नावा वेगाने येतानाच फुटून जाव्यात म्हणून पाण्याखाली अजस्त्र गुप्त तटबंदी, नागमोडी प्रवेशमार्ग, भोजराज महाल, पाण्याच्या टाक्या, विश्रामगृह निर्माण करण्यात आले होते.

## विजयदुर्ग भौगोलिक स्थान :

विजयदुर्ग हा सिंधुदुर्ग जिल्ह्यात असलेला एक जलदुर्ग आहे. हा किल्ला मुंबईच्या दक्षिणेस सुमारे २२५ किलोमीटरवर व गोव्याच्या उत्तरेस १५० किलोमीटरवर आहे. सुमारे १७ एकर जागेत हा किल्ला पसरला आहे. या किल्ल्यास तीन तटबंदी आहेत. त्यास चिलखती तटबंदी असे म्हणतात. याच्या तीन बाजू पाण्याने घेरलेल्या आहेत. या किल्ल्यात दोन भुयारी मार्ग आहेत. एक किल्ल्याच्या पूर्वकडे तर दुसरा पश्चिमेकडे कान्होजी आंग्रे व तुळोजी आंग्रे हे किल्ल्याचे किल्लेदार होते.

**किल्ल्याच्या बांधकामातील वैज्ञानिक दृष्टिकोन :**

छत्रपती शिवाजी महाराजांनी विजयदुर्ग किल्ल्यांची पुनर्बांधणी करीत असतांना जो वैज्ञानिक दृष्टिकोन वापरला तो पुढील प्रमाणे आपल्याला दिसून येतो.

१) छत्रपती शिवाजी महाराजांनी विजयदुर्ग या किल्ल्यांची पुनर्बांधणी करीत असतांना त्यात काही नवे वैज्ञानिक प्रयोग करुन पाहिलेले दिसतात.वाघोला खाडीच्या तोंडावर पूर्वी घेरिया नावाचा किल्ला होता. १६६४ मध्ये महाराजांनी हा सागरी किल्ला जिंकला आणि त्याची जुनी तटबंदी वगैरे पाडून आपल्याला हवा तसा किल्ला बांधून नवा सागरी किल्ला तयार केला. महाराजांचा एक सागरी दुर्गबांधणी क्षेत्रातील विजय असावा म्हणून महाराजांनी त्याचे सार्थक असे नाव विजयदुर्ग ठेवले असावे.

२) विजयदुर्गाच्या तिहेरी तटबंदीने विजयदुर्गाला दुर्गम करतांना महाराजांनी तेथे आणखी एक प्रयोग केला आणि तो म्हणजे पाण्याखाली एक तटबंदी बांधलेली आहे. आपण असा विचार कराल की, ही पाण्याखालील तटबंदी म्हणजे काय आणि ती किल्ल्यांला सरंक्षण कसे देत असे बरे ! पाण्याखालील तटबंदी म्हणजे किल्ल्याकडे येणाऱ्या मार्गावर महाराजांनी अभ्यासपूर्वक मोजमाप घेऊन बांधलेली आडवी सरंक्षण भिंत होय.

३) विजयदुर्ग किल्ल्यापासून दोनशे मीटर अंतरावर समुद्रात सुमारे पाऊन किलोमीटर लांबीची आणि तीन मीटर रुंदीची (९ फुट) भिंत समुद्राच्या उंच सखलतेचा अभ्यास करुन अशा प्रकारे बांधलेली आहे की, ओहोटीच्या वेळेस ही भिंत पाण्याच्या वर डोकावत नाही.

४) या भिंतीला आदळून अनेक गनिम येथे बुडालेले आहेत. इंग्रजांनी याचा चांगलाच अनुभव घेतला होता. याची नोंद त्यांनी करुन ठेवली आहे. विजयदुर्गावर चालत जाणाऱ्या तीन पैकी दोन जहाजांना झटका बसल्यावर तिसरे जहाज आपोआपच मागे घेऊन इंग्रजांना पळ काढावा लागला. या भिंतीवर आदळून त्या इंग्रज जहाजांना जलसमाधी मिळाली. तोफा डागायचे स्वप्न हवेतच विरले ही भिंत म्हणजे विजयदुर्गाची लक्ष्मण रेखाच जो पार करण्याचा प्रयत्न करे तो सागराचा पाहुणा होई.

५) भर समुद्रात तीनशे वर्षापूर्वी असे बांधकामाचे विविध प्रयोग करणाऱ्या शिवाजी महाराजांना फक्त लढाया करयाचेच ज्ञान होते. असे नव्हे तर महाराजांचे विज्ञान आणि तंत्रज्ञान क्षेत्रातील ज्ञान सुध्दा खूप होते. म्हणूनच त्यांनी एवढे प्रयोग करु शकले आणि त्या प्रयोगात यशस्वी झाले.[१८]

**जिंजीचा किल्ला :**

हा किल्ला मद्रास इलाख्यात मद्रासच्या नैऋत्येस ४० कोसांवर दक्षिण अर्काट प्रांतात आहे. हल्लीचे जिंजी खेडे ५०० वस्तींचे आहे. किल्ला राजागिरी, कृष्णगिरी व चंदरायदुर्ग अशा तीन टेकड्या मिळून बनवला आहे. त्यात राजगिरी टेकडी मुख्य व उंच आहे. तिन्ही बाजूनी सरळ उंचकडे आहेत व उत्तरेकडून एक लहानशी वाट आहे. किल्ल्याभोवती तिहेरी मजबूत तट असून वर जाण्याची वाट मजबूत व अरुंद केली आहे. सतराव्या शतकातील लढाईच्या पध्दतीने व सामुग्रीने दहा माणसे दहा हजार जणांना रोखून धरतील अशी भक्कम व्यवस्था येथे दिसून येते. हा किल्ला विजयनगरच्या राजांच्या हाती होता यात संशय नाही. या तीन टेकड्याभोवती त्यांना एकमेकांना जोडून तटबंदी केलेली आहे.

**किल्ल्यांच्या पुनर्बांधणीत वैज्ञानिक दृष्टीकोन :**

छत्रपती शिवाजी महाराजांनी जिंजीचा किल्ला जिंकल्यानंतर आपल्या विज्ञान आणि तंत्रज्ञान कौशल्याच्या आधारे त्या किल्यात जे बदल केले. त्यामुळे पुढे शत्रुंना हा किल्ला जिंकणे शक्य झाले नाही.

- ❖ स्वराज्याच्या अत्यंत प्रतिकूल अशा काळात ज्या किल्ल्याने मराठे शाहीला जीवदान दिले आणि ज्या किल्यांने मराठेशाहीच्या राजधानीची कारभार ८ वर्ष पाहिले. असा आणखी एक अजोड, अजिंक्य किल्ला महाराजांनी कर्नाटक प्रांतात बांधला त्याचे नाव जिंजी होय.

❖ राजगड किल्ल्याला जशा तीन माच्या आहेत. तसाच प्रकार या ठिकाणी तीन किल्ल्याच्या एकत्रितपणे होऊन किल्ला अजिंक्य बनतो. तो आणखी बेलाम व्हावा आणि गनिमाला दुर्गम बनावा म्हणून महाराजांनी किल्ल्यामध्ये दुरुस्त्या केल्या या दुरुस्त्या म्हणजे उत्कृष्ट अभियांत्रिकी नमुना म्हणावा अशा ठरल्या.

❖ राजगिरी व चंद्रयानदुर्ग यांना जोडणाऱ्या तटबंदीत शेतानदारी नावाचा एक बुलंद दरवाजा होता. तो महाराजांनी बळकट केला. जिंजीच्या किल्ल्याचे बांधकाम व दुरुस्ती अगदी अद्यावत पध्दतीने व्हावी ही महाराजांची इच्छा किती प्रबळ होती ते दिसून येते. महाराजांनी मद्रासच्या इंग्रजी गव्हर्नरला खास पत्र पाठवून सुरुंग उडविणाऱ्या निष्णांत कारागिरांची मागणी केली.

❖ महाराजांनी कमजोर असणारी ठिकठिकाणची तटबंदी पाडून त्या ठिकाणी नवीन तटबंदी करुन सभोवताली मोठा खंदक खणला किल्ल्यावर मोठ मोठे बुरुज रचून माच्याची नवीन जागा केली किल्ल्याचे हे सगळे बांधकाम इतके उत्तम करविले की, युरोपातील मोठमोठ्या कुशल कारागिरांना ते पाहून खाली मान घालावी लागली. इ.स.१६७८ मध्ये एका जेसूईट धर्मोपदेशकाने महाराजाबाबत ही प्रतिक्रिया नोंदविली आहे. He Shivaji Pulled down great parts of its (Jinji fort) Walls and built them again with new bustions so technically constructed that it look like a fortfess built rather by europeans than by inidan.

उपरोक्त धर्मोपदेशकाने छत्रपती शिवाजी महाराजांबाबत व्यक्त केलेले मत शिवरायांच्या दुर्गबांधणी क्षेत्रातील वैज्ञानिक आणि तंत्रज्ञान पध्दतीवर बराच प्रकाश टाकते. ज्यावेळचे जगातील सर्वोत्कृष्ट दुर्गबांधणी व्यवस्थापन आणि तंत्रज्ञान शिवाजी महाराजांकडे होते.[१९]

**रायगड किल्ला**

किल्ले रायगड हा रायगड जिल्ह्यातील सह्याद्रिच्या पर्वतरांगात असून समुद्रसपाटीपासून सुमारे ८२० मीटर (२७०० फुट) उंचीवर आहे. मराठा साम्राज्याच्या इतिहासामध्ये त्याची एक खास

ओळख आहे. छत्रपती शिवाजीराजांनी रायगडचे स्थान आणि महत्व पाहून १७ व्या शतकात याला आपल्या राज्याची राजधानी बनविली शिवराज्याभिषेक याच ठिकाणी झाला. गडावर पोहोचायला जवळ जवळ १४००-१४५० पायऱ्या आहेत. इंग्रजांनी गड घेतल्यानंतर लुटून त्याची नासधूस केली.

**इतिहास : -**

रायगडचे प्राचीन नाव ' रायरी ' हे होते. युरोपचे लोक त्यास पूर्वेकडील जिब्राल्टर ' असे म्हणत असत. जिब्राल्टरचे ठाणे जितके अजिंक्य व दुर्गम होते तसेच रायगडाचे होते पाचशे वर्षापूर्वी त्यास गडाचे स्वरुप नव्हते व तो नुसता एक डोंगर होता, तेंव्हा त्यास ' दासविटा ' व 'तणस' अशी दोन नावे होती. त्याचा आकार उंची व सभोवतालच्या दऱ्या यावरुन त्यास 'नंदादीप' असे नाव पडले. निजामशाहीत रायगडाचा उपयोग कैदी ठेवण्यापुरता होई. मोऱ्यांच्या प्रमुख यशवंतराव मोरे जावळीहून पळून रायगडावर जाऊन राहिला तर प्रतापराव मोरे विजापूरास पळाला. महाराजांनी ६ एप्रिल १६५६ रोजी रायरीस म्हणजेस रायगडास वेढा घातला व मे महिण्यात रायरी महाराजांच्या ताब्यात आली. तेथे असतांना कल्याणाचा सुभेदार मुल्ला अहमद खजिना घेऊन विजापूरकडे निघाण्याची बातमी महाराजांना समजली. त्यांनी तो खजिना लुटून रायगडावर आणला व त्या खजिण्याचा उपयोग गडाच्या बांधकामासाठी केला. रायगडाचा माथा राजधानी बनवण्यास सोयीचा व पुरेसा आहे. शत्रूला अवघड वाटणाऱ्या प्रदेशातले ते अधिक अवघड ठिकाण आहे. सागरी दळणवळणासाठी हे ठिकाण जवळ आहे. म्हणून महाराजांनी राजधानीसाठी या गडाची निवड केली.

**सभासद बखर म्हणते -**

" राजा खासा जाऊन पाहता गड बहूत चखोटा चौतर्फा गडाचे कडे तासिल्याप्रमाणे दिड गांव उंच पर्जन्यकाळी कडियावर गवत उगवत नाही आणि धोंडा तासीव एकच आहे. दौलताबाद पृथ्वीवर चखोट गड खरा, परंतु तो उंचीने थोडका दौलताबादचे दशगुणी गड उंच असे देखोन बहुत संतुष्ट झाले आणि बोलिले तक्त्यास जागा हाच गड करावा "

देवगिरीच्याहून दशगुणी, दीडगाव उंच, प्रशस्त जागा पर्जन्यकाळी कड्यावर गवत उगवत नाही उभ्या कड्यावर पाखरु उतरावयास जागा नाही. हे बघून महाराज खुशीने म्हणाले ...तख्तास जागा हाच गड करावा. छत्रपती शिवाजी महाराजांच्या या शब्दांचा उल्लेख बखरीत आहे. रायगडाचे स्थान घेऊन या किल्ल्यावरच राजधानी वसवण्याचं महाराजांनी निश्चित केल. रायगडाच जुनं नाव रायरी, गडाचा विस्तार प्रचंड असून समुद्रसपाटीपासून किल्ल्याची उंची २९०० फूट आहे. गडाला सुमारे १४५० पायऱ्या आहेत. गडाच्या पश्चिमेकडे हिरकणीचा बुरुज, उत्तरेकडे टकमक टोक श्री शिरकाई मंदिर आणि मध्यभागी असलेला महाराजांचा पुतळा हे प्रमुख आकर्षण आहे.

**रायगडाची विविध नांवे**

रायगड,रायरी, इस्लामगड, नंदादीप ,जंबूदवीप,तणस,राशिवटा,बदेनूर,रायगिरी,राजगिरी, भिवगड,रेड्डी, शिवलंका, राहीर, पुर्वेकडील जिब्राल्टर.

**रायगड किल्ल्याच्या पुनर्बांधणीत वापरलेला वैज्ञानिक दृष्टिकोन**

छत्रपती शिवाजी महाराजांनी ६ एप्रिल १६५६ रोजी जावळीच्या मोऱ्यांकडून रायरी किल्ला जिंकला हा रायरी किल्ला म्हणजेच रायगड होय. छत्रपती शिवरायांनी या रायगड किल्ल्याच्या पुनर्बांधणीत वैज्ञानिक दृष्टिकोनाचा वापर केला. आज २१ व्या शतकात वैज्ञानिक दृष्टीकोन जोपासने काळाला अनुसरुन आहे परंतु १७ व्या शतकात छत्रपती शिवरायांनी जो वैज्ञानिक दृष्टिकोनाचा अंगिकार केला. त्यातून महाराजांचा अभ्यास आपल्या लक्ष्यात येतो.

- ❖ छत्रपती शिवाजी महाराजांनी निवडलेले राजधानीचे ठिकाण रायगड हे निवडले यामागील मुख्य हेतू लष्करी दृष्ट्या रायगड अजिंक्य, बेलाम आणि शत्रूला पायथ्यापर्यंत पोहोचण्यास दुरापास्त होता. असे असले तरी रायगडाला जवळपास ६५ किल्ल्यांचे संरक्षण आहे व ६५ किल्ल्यांच्या मध्यभागी रायगड वसलेला आहे हे दुसरे कारण काही किल्ले तर रायगडापासून हाकेच्या अंतरावर तर काही किल्ले उघड्या डोळ्यांनी स्वच्छ दिसतील एवढ्या अंतरावर आहेत.

❖ रायगडाची उंची हा भाग महाराजांनी अगदी आवर्जून लक्षात घेतलेला, आजूबाजूच्या इतर कोणत्याही किल्ल्यापेक्षा रायगडाचा बालेकिल्ला जवळपास ४०० फुटांनी उंची आहे. म्हणजे आजूबाजूचा एखादा किल्ला शत्रूने ताब्यात घेतला. आणि तेथून तोफा चालविल्या तरी किल्याच्या तटबंदीपर्यंत येऊ शकत नव्हत्या ही एक महत्वाची गोष्ट होती.

❖ रायगडाची सुरक्षितता अभेद्य रहावी म्हणून महाराजांनी रायगडाला चिलखती कवच बांधले. रायगडाच्या इशान्येला लिंगणा किल्ला, पूर्वेला तोरणा, दक्षिणेला कांगोरा, चांभारगड, सोनगड तर वायव्येला तळेगड आणि उत्तरेला घोसालगड अशा सात किल्ल्यांच्या तटबंदीत स्वराज्याची राजधानी रायगड महाराजांनी जाणीवपूर्वक निवडली आणि बांधली.

❖ रायगडावर नगारखानाच्या खाली कितीही हळू आवाजात बोललो तरी सिंहासनाजवळ आजही स्पष्ट ऐकू येते. ध्वनिक्षेपकाचा शोध लागण्यापूर्वी ध्वनी क्षेपकाशिवाय ऐकू येण्याची ही तंत्रप्रणाली छत्रपती शिवाजी महाराजांनी रायगडावर निर्माण केली.

❖ साडेतीनशे वर्षापूर्वी बांधलेला अँन्टीचेंबर्स राजमाचीच्या खाली सापडला ही संकल्पना आत्ताची, पण छत्रपती शिवाजी महाराजांनी त्यावेळी ही गोष्ट अस्तित्वात आणली.

❖ रायगडावर गंगासागर नावाचा तलाव निर्माण केला. १९७२ च्या दुष्काळात महाराष्ट्रातील सगळ्या विहिरी कोरड्या पडल्या पण रायगडावरच्या गंगासागर तलावात मात्र तुडुंब पाणी होतं. यातून महाराजांचा वैज्ञानिक दृष्टीकोन दिसून येतो.आज आपण पाणी आडवा पाणी जिरवा ही जी संकल्पना राबवितो याची सुरुवात साडेतीनशे वर्षापूर्वी छत्रपती शिवाजी महाराजांनी राबवली होती. यातून त्यांची दूरदृष्टी आणि वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.[२०]

**आरमार निर्मितीतील छत्रपती शिवाजी महाराजांचा वैज्ञानिक दृष्टिकोन : -**

१७ व्या शतकात आपल्या हिंदूधर्मातील पंरपरेनुसार समुद्रावर प्रवास करणे, समुद्र ओलांडणे निषिध्द समजले जात होते. परंतु छत्रपती शिवरायांनी अशा खुळचट परंपरेचा विचार न

करता आपल्या बुध्दिप्रामाण्यानुसार वैज्ञानिक दृष्टिकोनाचा अंगीकार करुन समुद्रावर आरमाराची निर्मिती करण्याचे ठरविले.

इ.स. १६५५-५६ मध्ये छत्रपती शिवरायांनी जावळीच्या मोऱ्यांचे पारिपत्य केल्यानंतर रायगड सर झाला, तेंव्हा शिवाजीच्या स्वराज्याची सरहद समुद्राला जाऊन भिडली.सिद्दी, इंग्रज पोर्तुगीज ,डच, फ्रेंच या सागरी सत्तांशी सबंध आला. यातील सिद्दी उर्फ हबशी याचे प्रमुख आरमारी ठाणे जंजिरा बेटावर असून किनाऱ्यावरील दंडा-राजपूरीचा प्रदेश त्याच्या ताब्यात होता. हा त्याच्या ताब्यातील देश म्हणजे भारतातील हबसाण शिवकाळात सिद्दी प्रथम विजापूरकरांच्या नोकरीत होता. पुढे मोगली अमलात त्यांच्या नोकरीत रुजू झाला. त्याच्या जवळ चांगले आरमार असून त्याच्या संगोपनाकरिता हबसाण म्हणजे किनाऱ्यावरील प्रदेश त्याच्या अमलाखाली असणे आवश्यक होते. सिद्दी समुद्रात चाचेगिरी करी आणि कोकण किनाऱ्यावर धाडी घालून जाळपोळ, लुटालुट व बाटवाबाटवी करणे हा त्याचा नित्याचा उद्योग होता. बायका पळविणे हा या उद्योगातील एक भाग होता. छत्रपती शिवाजीने इ.स.१६५७ च्या सुमारास कल्याण भिवंडी काबीज करुन राजापूर पर्यंत देश काबीज केला तेंव्हा सिद्दिशी संपर्क येणे, संघर्ष होणे अपरिहार्य होते. सिद्याचे पारिपत्य करण्याकरिता शिवरायांना आरमार उभारण्याची गरज होती. आरमार निर्मितीमुळे इंग्रज, पोर्तुगीज, डच, फ्रेंच या सत्तांना शह बसून समुद्रात त्यांच्या बरोबरीने सार्वभौमत्व सिध्द होणार होते. अगदी याच राजकीय कारणाकरिता समुद्रावर श्रेष्ठ दर्जाचे आरमार उभारले.

**आरमारचा विकास -**

इ.स. १६५७ मध्ये छत्रपती शिवाजी महाराजाने कल्याण-भिवंडी घेतल्यावर आरमार बांधणीस सुरुवात झाली. पोर्तुगीज दप्तरातील आधाराप्रमाणे छत्रपती शिवाजी महाराजांने १६५९ मध्ये मराठ्यांच्या आरमाराची मुहुर्तमेढ रोवली. "आदिलशाहाचा बंडखोर सरदार शहाजी याच्या एका मुलाने वसई व चौलकडील प्रदेश काबीज केला असून तो बलिष्ठ झाला आहे. त्याने काही लढाऊ गलबते भिवंडी, कल्याण व पनवेल या वसई तालुक्याचे बंदरामध्ये बांधलीआहेत. त्यामुळे

आम्हास सावध राहणे भाग झाले आहे. ही गलबते समुद्रात फिरकू न द्यावी म्हणून (पोर्तुगीज) कॅप्टनला आम्ही आज्ञा केली आहे की, त्याने सदर गलबते बंदरातून बाहेर येऊच देऊ नयेत." वसईस जहाजे बांधणारे कुशल पोर्तुगीज कारागिर होते. रुय लैतांव व्हियेगस व त्याचा मुलगा फेर्नाव व्हियेगस लैतांव या नौशिल्प्यांच्या नेतृत्वाखाली छत्रपती शिवाजी महाराजांने आपली पहिली वीस लढाऊ गलबते (Sahguiceis) बांधण्यात सुरुवात केली. ही जहाजे आपण सिद्दीविरुध्द वापरण्याकरिता बांधीत आहोत असे छत्रपती शिवाजी महाराजांने जाहीर केले होते. कारण असे जाहीर केल्याशिवाय पोर्तुगीज त्याच्या जहाजांना कल्याण-भिवंडीच्या खाडीतून बाहेर समुद्रात पडू देणे शक्य नव्हते. उपरोक्त पोर्तुगीज नौशिल्पाच्या हाताखाली सुमारे तीनशे चाळीस पोर्तुगीज कारागीर व इतर लोक काम करीत होते. बायकामुलासकट त्यांची संख्या बाराशेच्यावर होती.अर्किव्ह इस्तोरिकु उल्यामारीनुमध्ये छत्रपती शिवाजी महाराजांच्या नोकरीत तीनशे पोर्तुगीज शिपाई होते, असा उल्लेख आहे. इ.स.१६६८ मध्ये विजरईने एक जाहिरनामा काढून मोगल, आदिलशाही व छत्रपती शिवाजी महाराज यांच्या सैन्यामध्ये नोकरीस असलेल्या पोर्तुगीज लोकांनी स्वदेशी परत जावे अशा आज्ञा केली. छत्रपती शिवाजी महाराजांचे आरमार एकदा तयार झाले म्हणजे सिद्दीबरोबर आपल्यालाही त्याचा त्रास होणार या भितीने शिवाजी महाराजांच्या नोकरीत असलेल्या पोर्तुगीजांनी त्याचे आरमार तयार होण्यापूर्वी नोकरी सोडून द्यावी, म्हणून वसईच्या कॅप्टन आंतोनियुद मेलू कास्त्रु याने प्रयत्न केले. परिणामी ही सर्व मंडळी एके दिवशी शिवाजी महाराजांची नोकरी सोडून गुप्तपणे मुंबई व वसई येथे पळून गेली. इ.स. १६५७ ते १६५९ च्या दरम्यान छत्रपती शिवाजी महाराजांची वीस जहाजे तयार झाली.

आरमाराची नितांत गरज ओळखणारे छत्रपती शिवाजी महाराज दूरदर्शी होते. आरमार उभारणीसाठी निधीची आवश्यकता होती आणि त्यासाठी छत्रपती शिवाजी महाराजाने सुरतेवर स्वारी केली. मिळालेली सर्व संपत्ती सागरी दुर्ग बांधण्यासाठी व आरमार उभारणीसाठी वापरली. संगमीरी (डिस्ट्रॉयर) नावाच्या नवीन प्रकारच्या युध्द नौका महाराजांनी बांधून घेतल्या.हिंदुस्थानच्या सागरी गरजा लक्षात घेऊन किल्ले व जहाजे बांधून सुजज्ज आरमार उभे केले.

आरमाराची जबाबदारी स्थानिक भूमीपुत्र परंतु पाण्यावरील लढाईत तरबेज असणाऱ्या धाडसी कोकण किनारपट्टीतील लोकांनाच दिली. त्यांच्या आरमारात आगरी, कोळी, भंडारी, परब, गावित, कुणबी अशा साहसी लोकांना समाविष्ट केले. धर्मगुरुंचा, पंडीतांचा सल्ला घेत बसले असता छत्रपती शिवाजी महाराजांचे आरमार बांधणीचे स्वप्न केंव्हाच साकार झाले नसते. त्यामुळे काळाची गरज ओळखून पापपुण्य या संकल्पनेच्या पलिकडे जाऊन शिवाजी महाराजांनी दरारा राहील असे आरमार उभे केले.म्हणूनच शिवरायांचे कार्य क्रांतीकारक कार्य समजल्या जाते.

**आरमार :**

छत्रपती शिवाजी महाराजांच्या आरमारात गुराबा, तरांडी, तारवे, गलबते, शिबाड, पगार या प्रकारची जहाजे असल्याचे कृष्णाजी अनंत सभासद सांगतो मल्हार रामराव चिटणीत त्यात मचवे, बाभोर, तिरकती व पाल यांची भर घालतो. लढाऊ जहाजांत गलबत, गुराबा व पाल ही प्रमुख होती. गलबतांपेक्षा गुराबा मोठ्या प्रमाणावर असत आणि पाल सर्वात भारी असे. ही सर्व जहाजे उथळ बांधणीची म्हणजे लांबीच्या प्रमाणात अधिक रुंदीची असत. नाळीकडील भाग खूपच निमुळता व उघडा असे, त्यामुळे त्यांना समुद्राचे पाणी कमी घर्षणाने कापता येई. नाळीवर आलेले पाणी उघडेपणामुळे दोन्ही बाजूंनी वाहून जाई.

तीन डोलकाठ्यांचे गुराब सामान्यपणे ३०० टनांचे असे व छोटे १५० टनांचे जहाजांवर तोफा असत. या जहाजांचे वैशिष्ट्ये म्हणजे त्यांच्या पठाणाची लांबी आणि नाळीच्या तुळईची लांबी सारखी असे. पठाणाच्या नाळीकडील भाग टोकदार असे.

तिरकती म्हणजे तीन डोलकाठयांचे जहाज. तरांडे, तारु, शिबाडे व मचवा ही जहाजे लहान असत अगदी छोटे होडी म्हणजे पगार होय.

कल्याण - भिवंडीची खाडी, पनवेल, कुलाबा, विजयदुर्ग, मालवण येथे जहाजे बांधली जात होती. आरमारी व्यवस्थेत २०० जहाजांचा एक सूभा केला जात असे. मायनाक भंडारी व दौलतखान हे शिवरायांचे प्रमुख आरमारी अधिकारी होते.

व्यापाराचे महत्व ओळखून मिठाच्या व्यापाराकरिता शिवरायांने वासंतिक नौदल तयार ठेविले होते. मस्कत व मोचा या अरबांच्या बंदराशी व्यापार करण्यासाठी तीन डोलकाठ्यांची जहाजे त्यांनी बांधली होती.

आरमाराचे संरक्षण किनाऱ्यावरील किल्ले व खाड्या याच्या आश्रयाने होत असते. शांततेच्या काळात तुफानापासून बचावाकरिता खाड्या उपयोगी असतात. युध्दकाळात किल्ले व खाड्या यांना मोक्यांची ठिकाणे म्हणून महत्व असते. हे ओळखून कोकण किनाऱ्यावर शिवरायांने जुने किल्ले दुरुस्त केले व नवे बांधले. सिंधुदुर्ग हा शिवरायांने बांधलेल्या जलदुर्गाचा उत्तम नमुना आहे. शिवरायांच्या आरमारात कोळी, भंडारी, गावित, भोई, खारवी, पालदी मुसलमान व इतर यांचा भरणा असे.

शिवरायांच्या आरमाराचे वाटत असलेले महत्व आज्ञापत्रात स्पष्टपणे दिसून येते. "आरमार म्हणजे एक स्वतंत्र राज्यांगच आहे. ज्यास अश्वबळ त्याची पृथ्वी प्रजा आहे. तदवतच ज्याजवळ आरमार त्याचा समुद्र या करिता आरमार अवस्यमेव करावे." पुढे आज्ञापत्राप्रमाणे " गुराबा थोर ना बहुत लाहान यैशा मध्यम रीतीने सजाव्या तैतीच गलबत करावी. थोर ...... फरगात जे वारियावीण प्रयोजनाचेच नव्हेत ऐसे करावयाचे प्रयोजन नाही."असे म्हटले आहे. कोकण किनाऱ्यावर वापरण्याकरिता छोटी जहाजे बांधणे योग्य असले, तरी मोठ्या इंग्रजी किंवा पोर्तुगीज जहाजांशी लढाईत टिकणारी नव्हती. यामुळे आज्ञापत्राचे हे विधान मर्यादित दृष्टिकोनाचे होते असे म्हणावे लागते. आज्ञापत्रातील काही गोष्टी शिवरायांनी आरमारी धोरणाचा भाग म्हणून नोंद घेण्यायोग्य आहे.

- ❖ आरमारावर मर्द माणसे, भांडी (तोफा) , जंबुरे, बंदुखा, दारुगोळा ठेवावा. होके (होकायंत्रे) असावेत.
- ❖ प्रत्येक सुभ्यात ५ गुराब व १५ गलबते असावीत.

❖ आरमारास तनखा मुलखातून नेमून द्यावा. पैदास्तीवरी नेमणूक सहसा न करावी. पैदास्तीचे नेमणुकीमुळे सावकारास उपद्रव होऊन सावकारी बुडते. बंदरे राहिलो पाहिजेत ... सावकारी वाढवावी.

❖ आरमार सजीत सजीत सजावे. आरमारकरी यांनी हमेशा दर्यात फिरुन गनीम राखावा.

❖ जंजिरे याचे सामान व दारु वरचेवरी पाववीत जीवी ... सर्वकाळ दर्यावर्दी गनिमाचे खबरीत राहून गनिमाचे मुलुक मारावा.

❖ दर्यात कौली सावकारी तरांडी याची आमदार फत्ती करावी. कौली सावकाराचे वाटी जाऊ नये.

❖ विदेशीची गैर कौली सावकारी तरांडी येता जाता आली तर त्यास सर्व साहित्य धरावे अल्पस्वल्प जकात घेऊन त्यास जाऊ द्यावे.

अशाप्रकारे छत्रपती शिवाजी महाराजांनी आरमाराची निर्मिती करीत असतांना विशेष काळजी घेतली.[२१]

**आधुनिक आरमाराचे जनक - छत्रपती शिवाजी महाराज**

आज आपण २१ व्या शतकात वावरत आहोत. परंतु १७ व्या शतकात छत्रपती शिवरायांनी समुद्रावर प्रवास करणे, समुद्रात किल्ल्याची निर्मिती करणे आणि तत्कालीन शत्रूंना शह देण्यासाठी आरमाराच्या माध्यमातून लढाऊ जहाजांची निर्मिती केली.

इ.स. १६६० च्या नंतर छत्रपती शिवरायांने आरमार समुद्रकिनाऱ्यावरुन आपली गस्त घालीत असतांना दिसले. हिंदुस्थानसारखा देश हा हजारो मैलांची समुद्रपट्टी असणारा देश आहे. इतिहासात आपल्या दर्यावर्दीपणाबद्दल प्रसिध्द होता, पण इ.स. १००० नंतर भारतीयांचे समुद्राकडचे लक्ष संपूनच गेलेले होते. सर्व जगभर नौकानयन करणारे भारतीय नाविक आपली ही विद्या विसरले होते. सर्व जगभर आपला दर्यावर्दीपण गाजवणारे मुसलमान भारतात राज्यकर्ते झाले, तेही समुद्राचे महत्व विसरुन गेले होते. समुद्राचे महत्व आधुनिक भारताशी अनुबंध असणारा, समुद्राचा

गंभीरपणे विचार करणारा पहिले भारतीय राजा शिवराय होते. त्याने उभारलेल्या आरमाराला नव्या खलाशांच्या इतिहासात केवळ भारताच्या दृष्टीने नव्हे, तर सर्व दक्षिण आशियाच्या दृष्टीने एका नव्या जागृतीचे चिन्ह म्हणून विचारात घ्यावे लागेल.

समुद्रमार्गाने येणाऱ्या शत्रूच्या धोक्याकडे आदिलशाहीने अगर मोगलांनी फारसे लक्ष कधीच दिले नाही. भारतातून हजारो यात्रेकरु त्याही काळात हजला जात असत. त्यांच्या संरक्षणाची जबाबदारी पोर्तुगीजांच्यावर टाकून भारतीय राजसत्ता निश्चिंत झालेल्या होत्या. अशा या काळात आरमार हे राज्याचे एक स्वतंत्र अंग आहे. या जाणिवेने स्वतःचे नाविकदल महाराजांनी उभारले. हे नाविकदल उभारतांना सिंधुदुर्गासारखा जलदुर्ग उभारावा लागला. खांदेरीच्या तटबंदीसारखी एक तटबंदी बांधून काढावी लागली. स्वतःच्या लढाऊ आणि व्यापारी नावा तयार कराव्या लागल्या इ.स. १६६० पासून हा आरमार उभारण्याचा उद्योग चालू आहे. युरोपमध्ये नौकानयन विद्या सर्व जगाचा समुद्र ताब्यात घेण्याइतकी साहसी बनली होती. या खलाशांनी युरोपला नवी भूमी, नवे साम्राज्य मिळवून दिले. युरोपमध्ये तोफा आणि दारुगोळा हे युध्द साहित्याचे उत्पादनही विकसित झाले होते. युरोपच्या सागरी युध्दक्षमतेच्या मानाने मराठ्यांनी २५-३० वर्षात उभारलेले आरमार हे निश्चितच किरकोळ आरमाराने गाजवलेला पराक्रम मात्र डोळ्यांत भरण्याजोगा होता. सिद्दी, पोर्तुगीज आणि इंग्रज यांचा संपूर्ण पाडाव करणे मराठ्यांच्या आरमाराला कधी जमले नाही, पण त्यांनी यशस्वीरीत्या तिघांचीही नाकेबंदी केली. भारतीय समुद्रात पाश्चिमात्यांची चालू असणारी अनिर्बंध सत्ता मराठ्याच्या आरमाराने निकालीत काढली. नानासाहेब पेशव्यांच्या काळात हे मराठ्यांचे आरमार नष्ट करण्यात आले. हे मराठी आरमार नष्ट होऊन समुद्रावर बिनधोक व एकमुखी प्रभुत्व स्थापन केल्याशिवाय युरोपीय सत्तांना भारतीय राजकारणावर ताबा मिळवता आला नसता. खूप कष्टाने शिवरायांनी स्वतःचे आरमार उभारले होते. मराठ्यांनी जर या आरमाराचा काळजीपूर्वक वापर केला असता, तर भारतावर ताबा मिळवणे इंग्रजाना शक्य झाले नसते.

**आरमारातील जहाजांची संख्या**

**छत्रपती शिवाजी महाराजांच्या आरमारात असलेली जहाजे**

मोठ्या गुराब - ३०, गलबते - १०० , जहागिऱ्या -१५०, लहान गुराब - ५०, तारवे -६०, पाल - २५, मचवे - ५०, जूग - १५, होड्या - १०, लहान होड्या - १५० अशी एकंदर ६४० जहाजांची संख्या होती परंतु लहान मोठी हजारांवर तारवे शिवरायांच्या आरमारात होती असा उल्लेख आहे.

**पाण्यातील किंवा पाण्यालगतच्या जंजिऱ्याची नांवे**

कुलाबा, खांदेरी,उंदेरी,अंजनवेली,रत्नागिरी,पदमदुर्ग, सरजाकोट, विजयदुर्ग , गहनदुर्ग, खाकेरी, सुवर्णदुर्ग, राजकोट ,सिंधुदुर्ग ह्या जंजिऱ्याच्या आसपास आरमार नेहमी तयार असे. दर्यासागर मायनाक भंडारी, इब्राहिमखान व दौलतखान हे प्रमुख आरमार प्रमुख होते.[२२]

**छत्रपती शिवाजी महाराज उत्कृष्ट दर्जाचे अभियंते**

महाराष्ट्र शासनाच्या माहिती विभागाने शिवरायांची स्थापत्य ज्ञानाविषयांची इत्थंभूत माहिती देणारे एक सचित्र पुस्तक १९८७ मध्ये प्रकाशित केलेले आहे. रमेश देसाई यांनी अतिशय मेहनत घेऊन तयार केलेल्या या ग्रंथाचे शीर्षक आहे. "

**'Shivaji the last greatest fort architect'**

या ग्रंथात ते म्हणतात," Witin a short span of less than three decodes, Shivaji had treed the bulk of Maharashtra, certainly a great achievement to world the ultimate aim of other forts were almost newly born and were living as s symbol of liberty. Amidst the black and green mountain ranges of sahyadri and the coastal islands and creeks in the blue waters of the arabian Sea. The chonicles may differ in their accounts but according to general estimate at the time of his death, shivaji was

reputed to have built about 180 new forts including 3 Sea forts repaired renovated and rehabilitated 49 forts and passessed not less than 280 forts. Including 79 Sea forts (79) situated in the South Indian Territory under his jurisdiction. Shivaji's period, is certainly the last most notable land mark in the military architectural history of the world. This apart shivaji occupies the position of unique honour of being the last great individual fort builder in the world history of the military architecture. That is if ancient and medieval fortification, the greatest fort architect, the world has ever produced." राजगड,रायगड किंवा प्रतापगड वा सिंधुदुर्ग या किल्ल्यांच्या संकल्पनाची प्रेरणा छत्रपती शिवरायांची होती. त्याचप्रमाणे या किल्ल्यांचे मुख्य स्थापत्यविशारद म्हणून त्यांनी त्याची रचना केली. डोंगरी किल्ल्यांच्या संकल्पनात त्यांनी कल्पकता व योजकता वापरुन ते केवळ देखावे न ठरता मजबूत व्हावेत याचीही दक्षता त्यांनी घेतली. या त्यांच्या कौशल्या विषयी जेसूइट लोकांनी प्रसंगोद्‌गार काढले आहेत. Wonderful construction.... could be compared with the best by any Europian standard, Andre Fraier S.J. लिहितो की, "With this provision, he (Shivaji) applied the energy of his mind and all principle towns".

किल्ल्यांविषयी शिवरायांची अधिक आस्था होती. त्यांचा जन्मच मुळी एका किल्ल्यावर शिवनेरीवर व शेवटही किल्ल्यावरच रायगडावर झाला. त्यांची संभाजी व राजाराम ही दोन मुले अनुक्रमे पुरंदर व राजगड या किल्ल्यांवर जन्मली. आपल्या पन्नास वर्षाच्या आयुष्यातील बहुतांश वेळ शिवरायांनी किल्ल्यावर घालविला होता. जन्मापासून ते संस्कारक्षम वयाचा हा काळ होता. अत्यंत आवडीने त्यांनी रायगडाची निर्मिती केली. हिरोजी इंदुलकर हा त्यांचा विश्वासू अभियंता होता. महाराजांच्या स्वप्नातील स्वराज्याची राजधानी त्याने इथे बसविली रायगडावरील

वास्तुशिल्पात हिंदू-इस्लामी शैलीतील आहेत. राजवाड्यासमोर शिवरायांनी आपल्या मुस्लिम सैनिक व सरदारांकरिता मशीद आवर्जून बांधून घेतली. जगदीश्वराचा प्रासाद नावाचे शिवमंदिरही बांधले. या मंदिराच्या पूर्वद्वाराच्या पायरीवर 'हिरोजी इंदुलकर, स्वामी चरणी तत्पर" असा लेख आहे. येथील बाजारपेठ, राणीवसा, नगारखाना, अष्टप्रधानांच्या निवासाच्या वास्तु या सर्व गोष्टी पाहिल्या की शिवरायांच्या वास्तुशास्त्र विद्येच्या ज्ञानाची खात्री पटते. सिंधुदुर्ग त्यांनी गोविंद विश्वनाथ प्रभु यांच्या देखरेखीखाली उभारला. या किल्ल्याच्या वास्तूची प्रशंसा करीत त्यांनी कारागिरावर खूश होऊन जे मागाल ते मिळेल असे म्हटले. त्यावर कारागिरांनी शिसे, गूळ व चुन्याची लादी तयार केली व त्यावर शिवरायांनी आपले पाऊल ठेवले. सिंधुदुर्गाच्या प्रवेशद्वारा समोर आजही शिवरायांच्या पावलाचा ठसा आहे. कारागिरांना शिवरायांनी दिलेली ही देणगी त्यांच्या दिलदार मनाची साक्ष देत आजही कायम आहे.छत्रपती शिवरायांनी किल्ले व आरमार निर्मितीमध्ये आजच्या विज्ञान आणि तंत्रज्ञानाच्या काळाला शोभेल असा वैज्ञानिक दृष्टिकोन वापरुन विविध किल्ल्यांची आणि आरमारांची निर्मिती केली ही विशेष बाब आहे.[२३]

# संदर्भ सूची


| | | |
|---|---|---|
| १. डॉ. प्रभाकर देव | - | इतिहासशास्त्र, संशोधन, अध्यापन आणि लेखन परंपरा ब्रेन टॉनिक प्रकाशन गृह नाशिक पहिली आवृत्ती ऑगस्ट २००७, पृष्ठ - ३५ |
| २. डॉ. प्रभाकर देव | - | पूर्वोक्त पृष्ठ - ३६ |
| ३. अ.रा. कुलकर्णी ग.ह.खरे (संपादक) | - | मराठ्यांचा इतिहास खंड पहिला कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे प्रथमावृत्ती १९८४, पृष्ठ-३१६ |
| ४. अ.रा.कुलकर्णी | - | अशी होती शिवशाही राजहंस प्रकाशन पुणे, आवृत्ती पाचवी,सप्टेंबर २०१२, पृष्ठ क्र. - ९५ |
| ५. वा.सि.बेंद्रे | - | गड-कोट-दुर्ग आणि त्यांची वास्तु मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या इतिहास संशोधन मंडळाची ग्रंथमाला क्र.०५ , २५ जानेवारी १९६५ पृष्ठ क्रं.-३७ |
| ६. गो.नी.दांडेकर | - | दुर्गदर्शन, मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई, प्रथमावृत्ती, १९ मार्च १९६९, पृष्ठ क्र.-८७ |
| ७. निनाद बेडेकर | - | दुर्गकथा, पद्मगंधा प्रकाशन पुणे, प्रथमावृत्ती,२७ फेब्रुवारी १९९५,पृष्ठ क्र. ९२ |
| ८. घाणेकर प्र.के. | - | साद सह्याद्रीची /भटकंती किल्ल्यांची, स्नेहल प्रकाशन पुणे, द्वितीय आवृत्ती, मे.१९८८, पृष्ठ.क्र.१९८ |

९. गोविंद सखाराम सरदेसाई - मराठी रियासत खंड-१, शहाजीराजे भोसले,
स.मा.गर्गे (संपादक) शककर्ता शिवाजी, पॉप्युलर प्रकाशन मुंबई, दुसरे पुनर्मुद्रण, जानेवारी २०११/१९३२ पृष्ठ -१७६

१०. स.आ. जोगळेकर - सह्याद्री, शुभदा-सारस्वत प्रकाशन पुणे ५ ,दुसरी आवृत्ती १९९३ ,पृष्ठ क्र. २०५

११. डॉ.द.ग. देशपांडे - महाराष्ट्रातील किल्ले, डायमंड पब्लिकेशन्स पुणे, प्रथम आवृत्ती, २९ ऑक्टोबर २००९, पृष्ठ क्र.-१२६

१२. संपादक अ.रा.कुलकर्णी - मराठ्यांचा इतिहास खंड-१, प्रथम आवृत्ती-
ग.ह.खरे १९८४, कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे,पृष्ठ क्रं.-२९८

१३. नरहर कुरुंदकर - छत्रपती शिवाजी महाराज जीवन रहस्य, इंद्रायणी साहित्य प्रकाशन पुणे-३०, प्रथामावृत्ती १५ ऑगस्ट २००३, पृष्ठ-५३

१४. भोसले प्रविण - पुरंदर-वज्रगड सुकृत प्रकाशन सांगली, प्रथमावृत्ती ७ सप्टेबंर २००५, पृष्ठ.६

१५.देवळे रा.रा. - महाराष्ट्रातील किल्ले, श्री लेखन प्रकाशन पुणे, पहिली आवृत्ती १९८१, पृष्ठ क्रमांक.५९

१६. भोसले प्रविण - विजयदुर्ग, कुलाबा व जंजिरा, सुकृत प्रकाशन सांगली, प्रथमावृत्ती ७ सप्टेंबर २००५, पृष्ठ क्र.०९

१७. निनाद बेडेकर - दुर्गकथा, पद्मगंधा प्रकाशन पुणे, प्रथमावृत्ती २७ फेब्रुवारी १९९५, पृष्ठ - १०६

१८. डॉ.ज्ञानेश्वर जाधव - छत्रपती शिवाजी महाराज, अक्षर पब्लिकेशन, औरंगाबाद, प्रथमावृत्ती,ऑक्टोबर,२०११, पृष्ठ क्र. १२७

१९. डॉ.श्रीधर व्यंकटेश केतकर(संपा)- यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान मुंबई प्रस्तुत, महाराष्ट्रीय ज्ञानकोश 'जिंजीचा किल्ला' विभाग चौदावा पृष्ठ क्र. २४

२०. निनाद बेडेकर - दुर्गकथा पद्यगंधा प्रकाशन पुणे, प्रथामावृत्ती,२७ फेब्रुवारी १९९५, पृष्ठ क्र.७५

२१. संपादक,अ.रा.कुलकर्णी ग.ह.खरे (संपा) - मराठ्यांचा इतिहास खंड-१, कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे, प्रथामावृत्ती १९८४, पृष्ठ क्र.३०५

२२.श्रीमंत शिवाजी कोकाटे - विश्ववंद्य छत्रपती शिवाजी महाराज (शिवचरित्र), जिजाई प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती, १९ फेब्रुवारी २००१, पृष्ठ क्र.४४

२३.प्रा.अशोक राणा - छत्रपती शिवराय पंचफुला प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती १९ फेब्रुवारी २०१३, पृष्ठ क्र. १४५

## प्रकरण - ४ थे

# युध्दशास्त्र आणि संदेशवहनातील वैज्ञानिक दृष्टिकोन

### युध्दशास्त्रातील वैज्ञानिक दृष्टीकोन

छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वराज्याची निर्मिती करीत असतांना शत्रूसैन्यासोबत लढा देत असतांना ज्या विविध तंत्राचा उपयोग केला त्यात त्यांचे युध्दकौशल्य आपल्याला दिसून येतो. यातून छत्रपती शिवरांयाचा युध्दशास्त्रात असलेला अभ्यास आपल्याला दिसून येतो शिवरायांनी शत्रूंशी युध्द करीत असतांना परंपरागत युध्दनीतीचा वापर न करता वैज्ञानिक दृष्टीकोनाचा वापर केलेला आहे. आपल्या पराभवाचे कारण आपल्याकडे असलेल्या परंपरागत युध्द पध्दतीत आहे. म्हणून त्या पध्दती आणि युध्द साहित्यामध्ये संशोधन केले पाहिजे असे शिवरायांना वाटत होते. म्हणून त्यांनी युध्दशास्त्रात जे संशोधन केले. त्यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टीकोन दिसून येतो.[१]

### युध्दशास्त्र म्हणजे काय ?

युध्दशास्त्राचा पश्चिमात्य अभ्यासक जवळ जवळ दोनशे वर्षापूर्वी क्लोजविटझ याने युध्दशास्त्राची व्याख्या करुन युध्दशास्त्राबद्दल बरेच लिहून ठेवले होते. दुर्दैवाने क्लोजविटझ च्या नंतर त्यांच्या अभ्यासकांनी त्याच्या तत्वाचा खोलवर विचार न करताच त्यावर भाष्य केल्याने जगाला विशेषतः पाश्चिमात्ये देशांना भयंकर संकटांना तोंड द्यावे लागले असे बऱ्याच लष्करी तज्ञांचे मत आहे. काही असले तरी क्लोजविटझ्ने स्वतःही युध्द म्हणजे संपूर्ण युध्द (Total War)असे सांगून त्यात सौम्यपणा आणण्याचा प्रयत्न करणे म्हणजे मुर्खपणा होय असेच सांगितले आहे. अर्थात त्याआधी त्याचे म्हणणे 'युध्द म्हणजे राजकीय संवादातील अखेरचा मुद्दा आहे'.

क्लोजविटझ्च्या तत्वज्ञानाने जगाचे नुकसान होत असतांनाच 'युध्दाची कला ' म्हणून युध्द ही एक कलाच आहे अशा अर्थाचे वर्णन करुन त्यावर अडीच हजार वर्षापूर्वीच अनेक निबंध लिहून युध्दशास्त्राचे सांगोपांग विश्लेषण करणाऱ्या चीनच्या 'सन झू ' च्या तत्वज्ञानाला पश्चिमात्य जगात प्रसिध्दी मिळत गेली  आणि लिडल हार्ट सारख्या गाजलेल्या सेनानीला असे म्हणण्याची

पाळी आली की युध्दाबद्दलच्या सन झू च्या तत्वज्ञानाचा जर लष्करी अधिकाऱ्यांनी आणि अभ्यासकांनी अभ्यास केला असता तर वर्षानुवर्षे चाललेल्या अनेक युध्दांमुळे जगातील अनेक देशांत जे विध्वंस झाले जो विनाश झाला जी जीवितहानी झाली ती झाली नसती.

अडीच हजार वर्षापूर्वी म्हणजे इसवीसनापूर्वी ५०० व्या वर्षी युध्दाला कला म्हणून संबोधून त्याविषयी प्रभावी भाष्य करणाऱ्या त्या सन झुने असे काय सांगितले आहे, हे पाहणेही आवश्यकच आहे.

सन झू च्या म्हणण्याप्रमाणे या राष्ट्राला विजय मिळवायचा असेल त्याला आपल्या जनतेच्या कल्याणाकडे अधिक लक्ष देणे आवश्यक आहे. हे केले तरच जनता राष्ट्रभिमानाने प्रेरित होऊन राष्ट्रासाठी अंतिम त्यागास तयार होते आणि राष्ट्राला विजय मिळवून देते.

प्रत्यक्ष युध्द न करता किंवा लहानसा आघात करुनही विजय मिळवता येतो. थोडक्यात तो म्हणतो की, "शत्रूंच्या शरीरावर वार करण्याआधी त्याच्या मनावर वार करा म्हणजे युध्द सहज जिंकता येते." यालाच आपण ' सायकॉलॉजिकल वॉरफेअर' म्हणजे मानसशास्त्रीय युध्द पध्दती असे म्हणतो. छत्रपती शिवरायांनी या पध्दतीचा युध्दनितीत उपयोग केलेला आहे.अफझलखान प्रकरण असो कि शाहिस्तेखान प्रकरण असो या प्रकरणात शिवरायांनी या युध्द पध्दतीचा उपयोग केला.

सन झू ने आणखी एक महत्त्वाची गोष्ट सांगितली आहे. तो म्हणतो, "पुराचे पाणी ज्याप्रमाणे आधी खोलगट, सखल भाग व्यापीत पुढे धावत असते, उंचवट्याचा भाग समोर आला तर त्याला वळसा घालून समोर घुसते त्याप्रमाणे शक्तिवान लष्कर हे शत्रूचा कमजोर भाग शोधून त्यावर तुटून पडते आणि मग सावकाश सगळ्या शत्रूचा धुव्वा उडवते. पाणी ज्या प्रमाणे जमिनीच्या आकाराप्रमाणे पुढे जात असते तसेच आपणही शत्रूच्या बलाचा अंदाज घेऊन आक्रमण केले पाहिजे. गनिमी काव्याचे तंत्रही अशा प्रकारचे आहे व ज्याचा वापर आपल्या रणनीतीत शिवरायांने वारंवार केलेला आहे.

अर्थात सर्वोच्च युध्दाची कला तीच ठरते जिच्यात युध्दही न करता अथवा थोड्याशा चकमकी नंतर शत्रूला पराजित करता येते. म्हणजेच युध्दापूर्वी गुप्तहेरांनी केलेल्या घातपाताच्या, शत्रूंचे मनोबल आणि जिद्द मोडून काढण्याच्या कारवाया ज्यात प्रभावी ठरतात."

कौटिल्यीय शास्त्राप्रमाणे आपल्याला सोयीच्या पण शत्रूला अत्यंत अडचणीच्या अशा रणक्षेत्रात त्याला खेचून आणणे हे खऱ्या सेनानीचे कर्तव्य असते. यातच त्याचे कुशल नेतृत्व दिसून येते आणि या बाबतीत तर, नाट्यपूर्ण रितीने शिवरायाने बहुतेक युध्द मोहीमेत विजय मिळवले.यातील एक विजय म्हणजे अफझलखानाला जावळीच्या रणक्षेत्रात आणून त्याचा पराभव केला.

सन झू यांच्या मते शत्रूची फसवणूक करणे हा युध्दनीतीचा गाभा आहे. जो सेनानी शत्रूची फसगत करण्यात यशस्वी होतो. तोच आपले कमीत कमी सैनिक गमावून शत्रूवर मात करु शकतो.

शत्रूची फसवणूक करण्यासाठी नात्याचा आश्रय घ्यावाच लागतो. शिवरायांनीही तुकोबारायांच्या किर्तनाच्या वेळी पडलेल्या शत्रूच्या वेढ्यातून सुखरुप बाहेर पडण्यासाठी आपल्यासारखे अनेक शिवाजी उभे केले ते त्यांचे निवडक साथीदार होते पण त्यांना कला अवगत होती पन्हाळयाहून सुटका तसेच आग्र्याहून बलाढ्य मोगलाच्या तावडीतून सुटका करुन घेतानाही त्यांनी युध्दकलेचा अवलंब केला. या कलेद्वारे त्यांनी शत्रूची फसवणूक केली नसती तर तो महान सेनानी केव्हाच संपला असता आणि स्वराज्य-स्थापनेत शिवरायांनी युध्द नितीतील रणक्षेत्र गनिमी कावाचा वापर करुन स्वराज्य निर्मितीचे कार्य यशस्वी करुन दाखविले.

अडीच हजार वर्षापूर्वी चीनच्या सन झू ने युध्दनीतीची जी महान तत्वे मांडली ती शिवरायांनी वाचली असण्याची किंवा त्यांना ती माहित असल्याचीही मुळीच शक्यता नव्हती पण केवळ घडलेल्या इतिहासाचे धडे गिरवून नवा इतिहास निर्माण करणाऱ्या शिवरायाने त्या घडून गेलेल्या इतिहासावरुनच योग्य तो बोध घेऊन आपली स्वत:ची अशी अष्टपैलू युध्दनीती ठरवून बऱ्याच संकटावर मात करुन अखेर विजय मिळवला. शिवरायांसारख्या स्वयंभू सेनानीची युध्दनीती, सन झू च्या युध्दशास्त्राशी बरीच मिळती-जुळती आहे हा योगायोग आहे. शिवरायांच्या

युध्दनेतृत्वाच्या महानतेची साक्ष पटवून देणारा आहे. शिवरायांचे युध्दशास्त्र आजही जगातल्या अनेक राष्ट्रामध्ये अभ्यासले जाते.[२]

**भारतातील प्राचीन युध्दपध्दती :**

भारतात प्राचीन काळी नेहमीच धर्मयुध्द खेळले गेले. युध्द करण्यासाठी दोन पक्ष आधी रणांगणाची जागा ठरवीत. त्याच्या मध्यभागी रणखांब रोवला जाई आणि मग एकमेकांना उघड आव्हान देऊन युध्द खेळले जात असे. शंख भेरी वाजवून इशारा दिल्याखेरीज बेसावधपणे शस्त्र उभारणे निंद्य समजले जात असे.

केरळच्या किनाऱ्यावर पोर्तुगिजांना प्रतिस्पर्धी म्हणून असलेले नायर लोक कधीही रात्रीची युध्दे करीत नसत. रात्रीच्या वेळी एकमेकांचे प्रतिनिधी, एकमेकांशेजारी निर्भयपणे झोपलेले असत.सकाळी उठल्यावर एकाच तलावावर स्नान करुन, चिलखते चढवून,जेवन करत असत. मग पानसुपारी खाणे, एकमेकांशी गप्पा मारत असत.

रणवाद्ये वाजू लागल्यानंतर दोन्ही बाजूंचे लढवय्ये रणखांबाच्या परस्परांच्या विरुध्द बाजूस होत आणि शिस्तीने रांगेत उभे रहात. पहिल्याने कोणीही रणशिंग फुंकले तरी, त्याला विरुध्द बाजूचा प्रतिसाद मिळेपर्यंत युध्द सुरु होत नसे. दोन्ही बाजूंची रणशिंगे फुंकली गेल्यानंतर शिपाई गटागटांनी पुढे येत एकत्र उभे रहात. त्यानंतर समोरचे ढाली-तलवारी घेतलेले शिपाई वाकून जमिनी बरोबर सावकाश पुढे सरकत त्यांच्या मागे असलेले धनुष्यबाण घेतलेले शिपाई, समोरच्या शत्रूच्या पायालाच जखम होईल अशा बेताने, जमिनीसरशी बाण सोडत पुढे सरकत असत. त्यांच्यामागे लाकडी सोटे फेकणारे व तीक्ष्ण दाते असलेली लोखंडी चक्रे फेकणारे लोक असत. या फेकण्यात खूपच शक्ती असे. ज्याला ही अस्त्रे लागत त्याचे हाडच या धक्याने मोडत असे. सर्वांच्या मागे भालाईत भाले आणि जांबिये घेऊन असत.

युध्द उघड्या मैदानात चाले. सायंकाळी पुन्हा दोन्ही बाजू रणशिंग फुंकीत मग शिपाई ताठ उभे रहात आणि त्या दिवसाच्या युध्दाची समाप्ती होत असे. त्याआधी दोन्ही बाजूंकडून वाद्याचा गजर होत असे. या युध्दात आपल्या शिबिराचे रक्षण करणे आणि शत्रूचे शिबीर जिंकणे या दिशेनेच

प्रयत्न होत असे.दोन्ही सैन्यांबरोबर दिवसातील हालचाली कशा घडल्या, युध्दाला कोणते वळण केंव्हा कसे मिळाले हे टिपून ठेवणारे लेखकही असत.

भारतात दहा वर्षे राहून स्वतःपाहिलेल्या वरील भारतीय धर्मयुध्द-पध्दतीचे वर्णन काश्तान्येद या पोर्तुगीज इतिहासकाराने लिहून ठेवले आहे. त्याने या धर्मयुध्द-पध्दतीचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेला होता. मूठभर पोर्तुगिजांनी आपल्या नवनव्या शस्त्रांनी, चिलखतांनी व वेगळ्या युध्दपध्दतीचा अवलंब करुन मलबारच्या किनाऱ्यावर पाय रोवला होता तो यामुळेच. अशी युध्दपध्दती इ.स.१५३५ पर्यंत चालू होती.

याच्या उलट मुसलमानी पध्दतीचा अमल सुरु होऊन तीनशे वर्षे लोटली असल्याने जुनी भारतीय युध्दपध्दती कोणत्याच बाबतीत राहिलेली नव्हती. राज्य कारभार आणि युध्दपध्दती यात आमूलाग्र बदल झाला. घातपात, लुबाडी, छापे घालणे, स्त्रियांवर अत्याचार, बलात्कार करणे, शेती उद्ध्वस्त करणे,हि युध्द निती रुढ झाली होती.[३]

**गनिमी कावा :**

छत्रपती शिवाजी महाराजांच्या युध्दनितीचा विचार करीत असतांना ज्या पध्दतीचा सातत्याने उल्लेख झाला. ती पध्दत होती. गनिमी कावा. गनिमी कावा ही पध्दत अहमदनगरच्या आदिलशाहीतील मलिक अंबरने जरी सुरुवात केली असली तरी छत्रपती शिवाजी महाराजांनी त्यात विशिष्ट प्रकारचा बदल करुन त्यात वैज्ञानिक दृष्टीकोन निर्माण केलेला आपल्याला दिसून येतो.

पुण्यात राहून मोगलांशी, सुलतानांशी, सिद्यांशी इंग्रजांशी, पोर्तुगीजांशी दोन हात करणे शक्य नाही. याची जाणीव शिवरायांना होती. या विचाराने शिवरायांच्या मनात घर केले नसते तरच नवल होते. दहा हजाराच्यावर सैनिक घेऊन कोकणातील किल्ले घेण्याकरीता सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यात घुसलेल्या सुलतानाच्या घमेंडी सरदाराला प्रसंगावधान अप्रतिम युक्तीचा प्रयोग आणि सह्याद्रीची साथ यांच्या भरवशावर दोन बहादूर किल्लेदारांनी दणदणीत मार दिला होता. त्या

घटनेचा इतिहास शिवरायांनी ऐकलेला होता, कुतुहलाने त्याचा अभ्यास केला होता. म्हणजे हे सहज शक्य होते तर हा विचार त्या प्रचंड आत्मविश्वास असलेल्या व्यक्तीच्या अंगी होता. ती घटना देखील शिवाजीसारख्या युध्दनीतीच्या अभ्यासकाला विचार करायला लावणारीच होती. कारण त्या प्रसंगी प्राचीन गडाचा किल्लेदार शिर्के याने केवळ युक्तीने आपली कमीत कमी शक्ती पणाला लावून प्रचंड सैन्य घेऊन आलेल्या बहामनी सुलतानाच्या मलिक उत्तुजार या सरदाराला पाणी पाजले होते. १४५३ साली मलिक उत्तुजार कोकणातील किल्ले घेण्यासाठी सह्याद्रीच्या कुशीत घुसला त्याची नजर प्राचीन गडावर तशीच विशाल गडावर होती. कारण तेथील किल्लेदार शिर्के आणि मोरे कुणाला जुमानत नव्हते. त्यादोघांना सरळ करण्याचा त्याचा हेतू होता. तो सफल झाला असता तर त्याला कोकणचा मार्ग मोकळा होता. त्यांने आधी धाव घेतली ती प्राचीन गडाच्या शिर्क्यावर शिर्केला परिस्थितीची जाण चांगलीच होती. आता शक्तीवर भर देण्यात अर्थच नव्हता फुकट माणसे मरायची आणि स्वातंत्र्य ही जायचे हि गोष्ट योग्य नव्हती त्या शूर हुशार आणि प्रसंगावधानी किल्लेदारांने आपली खास निती पणाला लावली. तो किल्ल्या सकट मलिकला शरण आला.

मलिक उत्तुजारही कमी नव्हता त्याला हे अर्धवट डावपेच मान्य नव्हते. त्या त्या वेळची सुलतानशाहीची खास पध्दत अमलात आणण्याचे ठरविले नसते तरच नवल होते. शरण आलास ना मग चल मुसलमान हो शिर्केलाच मुसलमान केले की, सह्याद्रीच्या या दुर्गम भागात आपला दुसरा माणूस गुंतवायला नको हा नवा जातभाईच सुलतानाच्या वतीने किल्ला सांभाळायला लायक होता. म्हणूनच मलिकने शिर्क्याला सुनावले,"आधी मुसलमान हो" होतो की त्यात काय आहे. मी शरण आलोच आहे.किल्लाही तुमच्या ताब्यात दिला आहे. आताही मुसलमान झालो काय अन न झालो काय चला मी मुसलमान व्हायला तयार आहे. मुत्सद्दी शिर्केने लगेच कबुली दिली.

मलिक उत्तुजार खुश झाला.शिर्के त्याच्या आणखी जवळ आला. शिर्केने मलिकला विश्वासात घेवून आपल्या मित्राचा आपणच विश्वासघात करतो आहोत. असा अभास निर्माण

केला. तो म्हणाला, "खान साहेब, मी तर मुसलमान होतोच आहे. पण मी तुम्हाला यशाचा आणखी एक मार्ग दाखवितो." "बोलो शिर्के बोलो " खानाचा शिर्केवर विश्वास बसायला लागला होता.

"खान साहेब शेजारच्या विशाल गडाचा किल्लेदार शंकरराव मोरे तो माझा दोस्त आहे.आपण त्याला तसेच सोडता कामा नये.त्याला तसेच सोडले तर तो मला सुखात जगू देणार नाही. म्हणून म्हणतो एक तर त्याला उखडून टाकू किंवा त्यालाही पकडून मुसलमान करु म्हणजे सगळाच मार्ग मोकळा होईल.काय? शिर्के असे मलिक उत्तुजार म्हणाला.

मलिक उत्तुजार शिर्केच्या या सुचनेवर बेहद खुश झाला मोऱ्यांची किमंत तो जाणून होता.शिर्क्यांच्या मदतीने त्याचाही आपोआप काटा निघत असेल तर त्याला हवाच होता. या भागातील घरभेद्या मराठा सरदारांचा अनुभव त्याला नविन नव्हता. तो लगेच म्हणाला ..... "ठिक है - शिर्के चलो विशालगड"

शिर्क्यांच्या दोस्तीच्या मदतीने हाकेने गाफील झालेला मलिक उत्तुजार शिर्केच्या पाठोपाठ निघाला शिर्क्यांनी बरोबर आपले चिवट लढाऊ मावळे मलिकच्या मदतीला म्हणून घेतले होते. तो सह्याद्रीच्या घनदाट जंगलानी वेढलेल्या दऱ्याखोऱ्यातून विशालगडाकडे गेलेली जवळची वाट मलिक उत्तुजरला दाखवित होतो.

मलिक उत्तुजार आपल्या दहा हजार सैन्यांना घेवून त्या घनदाट अरण्यात शिर्क्यांच्या पाठोपाठ चालला होता. घाटाच्या भयंकर वेड्यावाकड्या वळणाच्या वाटेने तो विशाल गडाची स्वप्ने पाहत आत आत चालला होता. शिर्के त्या फौजेला घेवून वाढलेल्या गवतांनी झाकलेल्या वाटामधून खोल खोल दरित घुसला इतकी वाट तुडवल्यावर उशीर होणारच होता. आता मुक्काम करायला हवा होता. तंबु ठोकायला जागा नाही मग मुक्कम उघड्यावरच तो भयानक परिसर पाहून भेदरलेले मलिक उत्तुजारचे सैन्य थकून भागून उघड्यावरच विसावले.

लांब उंचावरुन शंकरराव मोरे वाटच पहात होता. त्याला गुपचूप निरोप गेला. तुझे सावज तुझ्या तावडीत आले आहे. मग काय रात्रीच्या कोळखाचे पांघरुन घेवून मोऱ्यांचे मराठे वीर मलिक उत्तुजारच्या फौजेवर येवून कोसळले मलिक उत्तुजारचे बेसावध थकले भागलेले सैन्य मेंढ्या

बकऱ्या सारखे कापले गेले. मोऱ्यांच्या सैन्याने मलिक उत्तुजार सकट सात हजाराच्या जवळपास सुलतानी सैन्य कापून काढले. हिची सह्याद्रीची युध्दनिती या मातीत जन्मलेल्या प्रत्येक मराठ्याच्या हाडीमासी खिळली असल्यास नवल नाही. म्हणूनच शिवरायांच्या पिताजींना शहाजी राजांना सह्याद्री पासून दुर ठेवा ही दिल्लीतील शाहाजहाँनची सुचना आदिलशाहीला पटली होती. आणि शहाजीराजे सह्याद्रीपासून दूर कर्नाटकात उघड्यावर धाडले गेले होते.

गनीमीकावा हा सह्याद्रीच्या मातीत कडे कपारीत आधीच भिनला होता. खरे म्हणजे मानसशास्त्रीय (सायकॉलॉजीकल) युध्द तंत्राचा तो तत्कालीन अप्रतिम नमुना होता.

जवळ-जवळ दोनशे वर्षापूर्वी शिर्के -मोरे यांनी वापरलेली युध्दनीती तरुण शिवरायांच्याही रक्तामांसात होतीच. ती सह्याद्रीचीच नीती होती. राजनीतीच्या दैदिप्यमान कोंदणात दडविलेली लखलखती युध्दनीती.

सह्याद्रीपासून बाजूला फेकले गेल्याने निष्प्रभ झालेले आपले पिताजी शहाजी राजे तरुण शिवरायांना दिसत होतेच म्हणूनच त्याने सह्याद्रीच्या कुशीत शिरण्याचा निर्णय घेतला. प्रचंड शक्ती असलेल्या अनेकविध शत्रूंना तोंड देऊन आपले स्वराज्यनिर्मितीचे ध्येय गाठायचे असेल, तर लाडक्या सह्याद्रीच्या कुशीत जायचे. त्याच दिशेने पावले टाकतांना त्यांच्या नजरेत आधी भरला तो तोरणा पश्चिमेच्या कोकणपट्टीवर तसेच पूर्वेच्या घाटमाथ्यावर नजर ठेवून बसलेला प्रचंड पण अलिप्त किल्ला होता.

छत्रपती शिवाजी महाराजांच्या यशाचे रहस्य हे फक्त गनिमी कावा या लढाई प्रकारापुरते मर्यादित नव्हते. महाराजांची संशोधन वृत्ती हेच महाराजांच्या आणि एकंदरीत पुढील काळात मराठ्यांच्या यशाची गुरुकिल्ली ठरली. जगाच्या पाठीवर कोणालाही याचे आश्चर्य वाटले आणि आजही वाटते की एवढ्या पाच शाह्या आणि त्यातही मोगल औरंगजेब आणि इतरांना मुठभर मराठ्यांनी कसे पराभूत केले. असे मराठ्याकडे काय होते की ज्यामुळे लाखोंचा सेनासागर घेऊन आलेला शत्रू मराठ्याकडून एकतर मारला जाई किंवा त्याला शरण यावे लागे किंवा आपला जीव वाचविण्यासाठी असेल त्या कपड्यानिशी पळावे लागे.ते युध्दशास्त्र म्हणजे गनिमी कावा होय.[४]

## ➢ शस्त्रसंशोधन

छत्रपती शिवरायांची वृत्ती कायम नवीन गोष्टींचा शोध घेणारी होती. शत्रूवर मात करण्याच्या नवनवीन युक्त्या शोधण्यात महाराजांचा हात कोणाला धरता येत नव्हते. महाराजांचा कायम विचारमग्न मेंदू म्हणजे स्वराज्याचे संशोधन आणि विकासकेंद्र (Research & Development Center) दुर्ग बांधणी, नवीन तंत्रज्ञान, शस्त्रसंशोधन अशा अनेक अभिनव गोष्टींना महाराजांनी त्यांच्या जिज्ञासू आणि चिकित्सक कुशाग्र बुध्दीने जन्म दिला.

गनिमीकावा हे महाराजांनी त्या काळात राबविलेले हुकमी युध्द तंत्रज्ञान होय. ज्या वेगाने मराठे अनपेक्षितरित्या एखाद्या प्रदेशात आक्रमण करायचे आणि परत माघारी फिरायचे तो वेग पाहिला तर शत्रूला धसकाच बसायचा . गनिमी कावा या शब्दाचा अर्थच तसा आहे. वेगाने जाऊन पोहचणे आणि तेवढ्याच वेगाने घोड्याने फिरुन परत येणे.

## ➢ तलवारीच्या आकारात बदल -

मराठ्यांची शारीरिक ठेवण लहान बांध्याची होती आणि तलवारीची लांबी कमी यामुळे मराठ्यांची हार होत असे. म्हणून छत्रपती शिवरायांनी तलवारीचा आकार बदलून तलवारीची लांबी वाढविली. त्याचबरोबर तलवार हाताळ्याण्यास सोपे जावे म्हणून तलवारीच्या मुठीला आवरण बसविले.

## ➢ वैशिष्टपूर्ण तलवारींची निर्मिती -

मराठ्यांच्या या विकासित तलवारींना त्यातील वेगवेगळ्या वैशिष्ट्याप्रमाणे नावे पाडली गेली. जसे धोप खांडा, फिरंग, कार्ता, समशेर अगदी धोपाटण्यासारखी बदाबद मारुन शत्रूला धोपटायचे ती धोप विशेष करुन घोडदळाने वापरायची तलवार महाराजांकडे नेहमी असायची.

## ➢ नाविण्य तंत्रज्ञानाचा स्विकार -

जगाच्या पाठीवर जे जे उत्तम ते ते स्वराज्यासाठी असावे असा शिवाजी महाराजांचा अट्टहास होता. मग ते जगाच्या पाठीवर कोणत्याही देशातील तंत्रज्ञान असो वा वेगळेपणाने तयार

केली जाणारी एखादी गोष्ट असो. म्हणूनच महाराजांनी त्यांच्या स्वराज्यात नावा बांधण्यासाठी तोफा बनविण्यासाठी पोर्तुगीजांना तोफा चालविण्यासाठी फ्रेंचांना, तर दारुगोळा तयार करण्यासाठी डच लोकांना आपल्या पदरी ठेवले होते. यातून छत्रपती शिवरायांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो. ते परकीय आहेत. असा दुजाभाव निर्माण न होता. ते आपल्या स्वराज्यासाठी उपयोगाचे आहे. हे नविन तंत्रज्ञान स्विकारुन युध्द क्षेत्रात तरबेज होणे ही शिवरायांची दूरदृष्टी होती.[५]

## ➢ शिवरायांची तलवार विशिष्ट धातूची

छत्रपती शिवाजी महाराजांची तलवार ही खास अशा अरुणव्रत नावाच्या पोलादापासून बनविलेली होती. अरुणव्रत म्हणजे असा पोलादी धातू ज्यावर सूर्यकिरणांचा प्रकाश पडला की, ज्यातून आपोआप अग्नीच्या ज्वाला बाहेर पडत आणि त्याच अरुणव्रतावर चंद्रप्रकाश पडला तर त्याच्या स्पर्शाने रात्रीतही कमळ फुलते. महाराजांच्या तलवारीच्या अशा वैशिष्ट्याचा पुरावा आहे. जेधे शकावलीत " दुसरे दिवशी रायगडी तरवारातून ज्वाला निघाल्या" असे पान न १३७ वर शके १६०१ सिध्दामी नाम संवत्सरे रोजीच्या नोंदीत म्हटले आहे.

तत्कालीन समाजात चमत्काराचा पगडा होता. त्यामुळे समाजाला असे वाटत होते की, शिवरायांची तलवार ही चमत्कारी तलवार आहे पण असे नव्हते. तर ती तलवार म्हणजे विज्ञानाचा अविष्कार होता. १७ व्या शतकात छत्रपती शिवरायांनी विज्ञानाचा स्विकार करुन वैज्ञानिक दृष्टीकोनाची विज्ञानाची जोपासना केली होती.

## ➢ भवानी तलवार -.

छत्रपती शिवाजी महाराजांच्या हातात असणारी एक तलवार खूपच गाजली आणि या तलवारीचे मराठी माणसाला आजही आकर्षण आहे. त्या तलवारीला 'भवानी तलवार' असे म्हटले जाते. ही तलवार साक्षात तुळजाभवानीने महाराजांना दिलेली होती. असे लोककथा कथानकात सांगतात परंतू हे शक्य नाही. आजपर्यंत मानवाने लढलेल्या कोणत्याही युध्दात देवता आले नाहीत किंवा त्यांनी वीर पुरुषाला कोणतेही शस्त्र दिलेले नाही. स्वराज्याचा पराक्रम लोखंडाच्या तलवारीने

घडला नसून तलवार चालविणाऱ्या युगपुरुषामुळे घडलेला आहे. तलवार तर सगळेच चालवतात परंतु अन्याय, अत्याचार यांच्या विरोधात जी तलवार चालविली जाते तीच भवानी तलवार होय. ही तलवार भवानीने दिली नसून ती एक तत्कालीन समाजाची लोकभावना होती.

➢ **भवानी तलवारीची खरी घटना** :

छत्रपती शिवाजी महाराजांकडे जी तलवार होती. तिला भवानी तलवार असे म्हटल्या जात होते. म्हणजे ही तलवार तुळजाभवानीनी छत्रपती शिवरायांना ही तलवार दिली अशी समजूत होती. परंतु अलीकडे जे संशोधन झालेले आहे. त्यातून सिध्द होते की, ही तलवार तुळजाभवानीने शिवरायांना ही तलवार दिलेली नसून ती तलवार शिवरायांनी पोर्तुगीजाकडून विकत घेतलेली आहे.

छत्रपती शिवराय कोकणाच्या मोहिमवर असतांना दिनांक ५ मार्च १६५९ रोजी पोर्तुगालमध्ये तयार झालेली विशेष अशी तलवार एका व्यापाऱ्याकडून महाराजांनी विकत घेतली. वजनाने हलकी परंतु किंमतीने वजनदार अशी ही तलवार होती. ती तलवार गंज न लागणारी अशा विशेष धातूंनी बनविलेली होती. तिचे पाते पातळ असूनही न मोडणाऱ्या अशा विशिष्ट पोलादाने तयार केलेली होती. छत्रपती शिवरायांनी ती तलवार रोखीने तीनशे होनांनी (त्या वेळचे एक हजार पन्नास रुपये) देऊन विकत घेतली. [६]

**शिवराय युग निर्माता :-**

छत्रपती शिवरायांच्या उदात्त विचाराने जी तलवार अनमोल अजरामर बनलेली आहे, त्यावर हिरे, माणिक, मोती, सोन्याच्या मुठा या सर्व गोष्टी तेवढ्या महत्वाच्या नसून त्या तलवारीच्या धाकाने शिवरायांनी निर्माण केलेले स्वराज्य पराक्रम आणि सामाजिक परिवर्तन मोलाचे आहे. अशी ही महापराक्रमी तेजस्वी तलवार इंग्लंडच्या संग्रहालयात आहे. प्रत्येक मराठी माणसांच्या आणि प्रत्येक स्वाभिमानी, राष्ट्रप्रेमी माणसांच्या ऱ्हद्यात मानाचे स्थान निर्माण करुन शतकानुशतके राहिलेली आहे आणि युगानुयुगे राहणार आहे.यात तीळमात्र शंका नाही.

**युध्द पध्दत :**

छत्रपती शिवाजी महाराजांनी अंमलात आणलेली युध्दनिती पहाता महाराज जनतेच्या हितासाठी काम करीत असतांना किती दक्ष होते याची साक्ष देतात. महाराजांनी शक्यतो कोणतीही लढाई स्वराज्याच्या अंतर्गत भागात होणार नाही याची दक्षता घेतली होती. जेंव्हा लढाई सुरु होते तेंव्हा ज्या प्रदेशात लढाई केली जाते त्या ठिकाणच्या जनतेला त्याचा त्रास सहन करावा लागतो आणि परिणामही भोगावा लागतो ही वस्तुस्थिती होय. महाराजांच्या पूर्वीचा काळ तर फारच भयानक होता.

मोगलांची लढाई निजामशाही विरुध्द, निजामशाहीची लढाई आदिलशाही विरुध्द आणि आदिलशाहीची मोगलांविरुध्द आणि रणभूमीचे क्षेत्र मात्र महाराष्ट्र होते. या उपरोक्त शाह्यांच्या संघर्षात नुकसान मात्र महाराष्ट्रातील रयतेचे होत असे. कोणाचाही हल्ला कोणाच्याही विरुध्द असो भरडली जात होती ती सामान्य रयत परंतु शिवरायांनी मात्र यापैकी कोणीही लढाई जिंकली तरी रयतेचे नुकसान कधीच होऊ दिले नाही.

मोगल, आदिलशाही,निजामशाही अशा नेहमी त्रास देणाऱ्या राजसत्ता आपल्या दक्षिणेत होत्या त्यामुळे रयतेचे खूप हाल होत असत. इकडे आड आणि तिकडे विहीर अशी रयतेची ही ससेहोलपट लक्षात घेवून विचारपूर्वक शिवाजी महाराजांनी जी युध्दपध्दत अवलंबली होती. शत्रूशी युध्द शत्रूच्याच प्रदेशात आणि जर तो स्वराज्यात घुसत असेल तर त्याला सीमेवरच रोखून ती तेथेच अडकाविणे किंवा संपविणे आणि तो आत घुसलाच तर प्रतिकार न करता एखाद्या किल्ल्यावर जावून थांबणे रयतेला सुरक्षित ठिकाणी हलविणे आणि शत्रूला निर्जन दुर्गम अशा प्रतिकुल ठिकाणी आणि अवघड प्रदेशात खेचून तेथेच ठेचून मारणे. यामुळेच रयतेला त्रास होत नसे.

सिद्दी जोहरने स्वराज्यावर आक्रमण करण्यासाठी कुच केल्यावर त्याला थोपविण्यासाठी शिवाजी महाराज रायगडावरुन पन्हाळ्यापर्यंत गेले. आपण पन्हाळ्यावर आहोत हे सिद्दी जोहरला कळेल आणि लढाईचे युध्द क्षेत्र पन्हाळाच राहिल याची व्यवस्था महाराजांनी केली. छत्रपती शिवाजी महाराजांना कैद करण्याच्या इर्षेला पेटलेला सिद्दी जोहर पन्हाळ्याला वेढा घालून बसला

आणि स्वतः चार महिने पन्हाळयाच्या परिसरात अडकून पडला. महाराज पन्हाळा किल्ल्याच्या खाली उतरत नव्हते आणि सिद्दी जोहरला पन्हाळा किल्यावर आक्रमण करुन लढाई करणे शक्य नव्हते. त्यामुळे सिद्दी जोहरला पन्हाळयाच्या परिसरात स्वराज्याच्या सीमेवर थोपवून धरण्याची महाराजांची जी रणनिती होती. त्यानुसार महाराज युध्द क्षेत्रातील निती अवलंबविण्यात यशस्वी झाले. नकळत सिद्दी जोहरने चार महिने पन्हाळयाच्या पायथ्यालाच अडकून पडला. निसर्गाच्या हालचालीचा वापर युध्दनितीसाठी केला. छत्रपती शिवाजी महाराज पन्हाळयाच्या वेढ्यातून सिद्दीला गुंगारा देऊन विशाळ गड आणि तेथून कोकणात पांगले. त्यामुळे लढाई राहिली बाजूला आणि शिवाजी महाराज कोकणात नक्की आहेत कोठे याचा ठाव ठिकाणा शोधण्यातच सिद्दी जोहरची आणि त्याच्या फौजेची दमछाक झाली. कोकणचा भाग डोंगरी आणि दाट जंगलाचा होता. त्यात पावसाचा भरपूर जोर होता. सिद्दीला महाराजांप्रमाणे इकडून तिकडे पावसात पळापळ करणे शक्य नव्हते तर असंभव होते. आणि विजय मिळविण्यासाठी आलेल्या सिद्दीला महाराज फक्त पळवा-पळवीत अडकवून ठेवत होते. शेवटी शिवाजी राजे हाताला लागत नाहीत. तुम्ही आमची दिशाभूल करीत आहात असे सांगत आदिलशहाने सिद्दीला मोहिमेवरुन परत माघारी बोलविले आणि शिवरायांना सामील असल्याचा ठपका ठेवून विष घालून मारुन टाकले. महाराजांनी स्वराज्या वरिल संकट पराक्रमी शत्रू सिद्दी जोहरशी लढाई न करता ज्याने लढाईला पाठविले होते. त्याच्याच हातून संपवून एक वेगळयाच रणकौशल्याची चमक दाखविली. युध्द क्षेत्रातील रणनितीचा हा विजय आहे.

शत्रू स्वराज्याच्या सीमेवर रोखता आलाच नाही तर तो ज्या ठिकाणी आत घुसला आहे तेथेच त्याची वाट अरुंद करणे आणि त्याला छुपे हल्ले करत दहशत बसविणे, जेरिस आणणे ही दुसरी पध्दत किंवा बरेच दिवस शांतता ठेवून अचानक हल्ला करुन शत्रू पक्षाची दहशत माजविली ही एक रणनिती होती. अफजलखानाच्या भेटीसाठी शिवाजी महाराजांनी जर पुरंदर, राजगड, सिंहगड निवडला असता तर एवढ्या आतपर्यंत घुसतांना अफजलखानाने कितीतरी नुकसान केले असते. आणि म्हणूनच त्याला थोपविण्यासाठी महाराज प्रतापगडावर आले आणि अफजलखानाला स्वराज्यात पुढे येवू नये म्हणून तहाची बोलणी करत त्याला रेंगाळत ठेवले. आणि शेवटी

जावळीच्या दुर्गम प्रदेशात त्याला प्रतिकूल असलेल्या प्रदेशात खेचून आणून अफझलखानाचा वध केला. युध्दामुळे रयतेला त्रास होवू नये म्हणून महाराजांनी जंगलव्याप्त भाग निवडला आणि अर्थात गनिमी काव्याची लढाई केली. आणि सुपिक प्रदेश उध्वस्त होऊ नये याची काळजी घेतली.

शाहिस्तेखान स्वराज्यावर ७७ हजार घोडदळ आणि ३० हजार पायदळ घेऊन चालून आला आणि प्रचंड धुमाकूळ माजविण्यासाठी जो प्रदेश निवडला तो स्वराज्याचा सधन प्रांत होता. पुणे, सुपे, सासवड आणि इतर भाग महाराजांनी छापे टाकून त्याला हैराण करीत त्या प्रांतातून पुणे परिसरात येण्यास भाग पाडले. तेथे शाहिस्तेखान जवळपास तीन वर्षे मुक्कमी राहिला. शाहिस्तेखानाची फौज महाराष्ट्रात तर महाराजांची फौज आदिलशाही आणि मोगली परिसरात धुमाकूळ घालून त्यांचे लक्ष विचलित केल्या जात असत.

स्वराज्यातील जनतेचे पीक पाण्याचे नुकसान होऊ नये म्हणून दक्षता घेतली जात होती. युध्दाचे ढग जमा झाल्याबरोबर महाराज मैदानी प्रदेशातील जनतेला डोंगराळ दुर्गम परिसराचा आश्रय घेण्यास सांगत असत आणि त्या परिसरातील किल्लेदार, सुभेदार, हवालदार आणि इतर सर्व अधिकाऱ्यांना या संदर्भात आदेश दिले जात असत. या आदेशाची काटेकोरपणे अमलबजावणी व्हावी यासाठी शिवाजी महाराज अत्यंत दक्ष असत. या संदर्भातील अनेक पत्रे इतिहासाकडे उपलब्ध आहेत.त्यामुळे गनिम चालून आला तरी त्याच्या हाताला विशेष असे काही लागत नसे.आणि जर तो खूपच आत घुसून धुमाकूल माजू लागला तर त्याच्यावरच छापा टाकून त्यांना पळता भूई करण्याची तयारी जनता आणि सैनिक ठेवत असत.

स्वराज्यातील शेतकरी आणि अठरापगड जातीतील लोकांना सैनिकी शिक्षण देऊन शिवाजी महाराजांनी सरंक्षणासाठी सिध्द केले. त्यामुळे वेळ प्रसंगी रयत युध्दात उतरत होते.

मिर्झाराजे जयसिंगानी  महाराजांच्या किल्ल्यावर हल्ले करण्याऐवजी रयतेला त्रास देण्याची भूमिका घेतली.त्यामुळे रयतेला त्रास नको म्हणून तहास तयार झाले कारण रयत ही महाराजांसाठी सर्वस्वी होती. रयतेला त्रास म्हणजे राजाला त्रास ही भूमिका घेवून शिवाजी महाराजांनी पुरंदरचा तह केला.

छत्रपती शिवाजी महाराजांच्या आयुष्यातील हा एकमेव तह होता आणि तोही रयतेचे नुकसान होऊ नये म्हणून रयतेच्या रक्षणासाठी महाराजांनी घेतलेली ही तात्पुरती माघार होती. मुत्सद्देगिरीची चाल होती. शत्रूला थोपविण्याची युक्ती होती योग्य वेळ आली कि लगेच महाराज तहाचे कलमे मोडले.[७]

**छत्रपती शिवरायांच्या युध्दशास्त्रातील वैज्ञानिक दृष्टीकोनाचा जगाने घेतलेली दखल** :

छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वराज्याची स्थापना करतांना आपल्या आजूबाजूला असलेल्या शत्रूंशी सामना करतांना ज्या युध्द पध्दतीचा वापर केला. त्या युध्द पध्दतीत शक्तीपेक्षा युक्ती होती. एवढेच नाही तर यात १७ व्या शतकात वैज्ञानिक दृष्टीकोनाचा वापर केलेला दिसून येतो म्हणून त्यांच्या या वैज्ञानिक युध्द पध्दतीचा जगाने दखल घेतली होती. त्याचा आढावा पूढील प्रमाणे आहे.

छत्रपती शिवाजी महाराजांच्या आयुष्यातील ३५ वर्षे लढाया करण्यातच खर्ची पडली. रात्रदिवस धामधुम आणि पळापळ होती. शिवरायांनी त्यांच्या जीवनात ज्या अनेक लढाया केल्या त्यात परदेशी सेनापती बरोबर दोन हात करण्याची संधीही त्यांना मिळाली हे महाराजांचे भाग्य तर अनेक ठिकाणी आपल्याच लोकांनी महाराजांना आपल्याच लोकांशी लढण्याशिवाय पर्याय नव्हता हे आपले दुर्भाग्य होते. शिवरायांच्या बऱ्याचशा लढाया स्वकीय शत्रूंचा बंदोबस्त करण्यासाठी झाल्या. त्यापैकी मुधोळचे बाजी घोरपडे, जावळीचे मोरे हे उदाहरणे आहेत.

छत्रपती शिवराय हे एक आदर्श राजा म्हणून सर्वांना माहित आहेत तसेच एक यशस्वी सेनापती म्हणून खूपच कमी लोकांना महाराजांचे महत्व कळलेले आहे. इतर सेनापतीकडे ज्यावेळी भरपूर सैन्य तोफखाना दारुगोळा, शस्त्रात्रे,पैसा होता. त्यावेळी शिवरायांकडे फक्त होती युक्ती. युक्ती म्हणजेच महाराजांचे अफलातून असणारे रणकौशक्य आणि युध्दनिती त्याबळावरच त्यांनी शक्तीपेक्षा युक्ती श्रेष्ठ ठरवत गनिमी कावा नावाची गोरील्ला वारफेअरची नवीन संकल्पना अंमलात आनून मोठमोठ्या सेनापतीना आणि त्यांच्या बलाढ्या सैन्याना पराभूत केले.

शिवाजी महाराजांच्या समोरील शत्रूपक्षांचे सैन्य नेहमी दुप्पट, तिप्पट, चौपट काही प्रसंगी तर अगदी आठपट सुध्दा होते. तरीही बहुतेक ठिकाणी शिवरायांना यश मिळतच होते. नव्या युध्द नितीचा तो उगम होता आणि शत्रूपक्षाला याची जाण नसायची आणि बिचारे सपाटून मार खायचे. गनिमी कावाच्या या नवीन युध्द तंत्रामुळेच महाराज मोगल,आदिलशाही, शाहिस्तेखान, बहादुरखान, कुतुबशाही, पोर्तुगीज, फ्रेंच, डच, हबशी, इंग्रजांना पुरुन उरत होते. महाराजांनी ज्या परदेशी सेनापतींना धूळ चारली त्यात इराणमधून आलेले मोगल, अफगाणिस्तानमधून आलेले पठाण दिलेरखान रशियातून आलेले उझबेकी कारतलबखान कझाकी अरबस्तानातून आलेले अरबी (दाऊदखान कुरेशी तुर्की , इराकी, अफ्रिकेतील हाबशी सिद्दी जोहर, सिद्दी मसूद, जंजिऱ्याचे सर्व सिद्दी ) इंग्रज, पोर्तुगीज, आयरिश अशा विविध देशातील योध्यांचा समावेश होता. एवढ्या वेगवेगळ्या देशातून लढाईसाठी आलेल्या अनुभवी, मुत्सद्दी अशा सर्व सेनापतींचा पराभव शिवाजी महाराजांनी केला.

छत्रपती शिवाजी महाराजांकडे अद्यावत तंत्रज्ञान सोबत असतांना देखील त्या प्रकारची दृष्टी जोपासून फक्त निष्ठा आणि युक्तीचा बळावर महाराजांनी हा थोर पराक्रम केला होता.

छत्रपती शिवरायांकडे फक्त पायदळ व घोडदळ होते. वेगवान हल्ला करण्यासाठी घोडदळ व घोडदळांच्या हालचालींना अनुकूल ठरणारे जंगल झाडी, डोंगर दरी, कडे कपारी आणि याला तेवढीच मोलाची साथ करण्यासाठी सोबत असलेले काटक आणि लढाऊ पायदळ होते. तोफखाना हा विभाग जाणीव पूर्वक महाराजांनी विकासित केला नाही. तो महाराष्ट्राची भौगोलिक परिस्थिती लक्षात घेऊन व सैन्याच्या हालचाली करण्यासाठी उपलब्ध असलेला वेळ लक्षात घेऊन शिवाजी महाराजांच्या बहुतेक लढाया या अनपेक्षित हल्ल्याने झालेल्या आहेत. शत्रू पक्षाला विश्वास बसणार नाही एवढ्या वेगाने अचानक व तडाखे बाज अशी लढाई राजे करीत असत. असे असतांना महाराज स्वतः कधीही बेधुंद (ओव्हर कॉन्फीडंट ) होत नसत. शिवाजी महाराजांच्या विल्डस क्रीग या युध्दनितीचा वापर करुन जर्मनीसारख्या छोट्या राष्ट्राचे नेतृत्व करीत हिटलरने अख्या युरोपला जेरीस आणले त्याचे सर्व श्रेय शिवाजी महाराजांच्या रणनीतीला मिळते.अर्थात शिवाजीमहाराजांच्या

लढाईचा हेतू आणि ध्येय, हिटलरचा हेतू आणि ध्येय यात फरक दिसून येतो. परंतु हिटलरच्या पराक्रमाचे प्रेरणास्थान हे छत्रपती शिवाजी महाराज असल्याशिवाय एवढी मोठी झेप घेण्याची क्षमता हिटलर मध्ये निर्माण होऊ शकली नसती. या वरुन छत्रपती शिवाजी महाराजांच्या युध्द पध्दतीचा जगातील पराक्रमी सेनापतीनी कसा अंगिकार केला हे आपल्याला दिसून येते.[८]

शिवरायांच्या बाबतीत एक आणखी एक विशेष म्हणजे महाराजांच्या सैन्यात केंव्हाही, कोठेही जातीपातीचे राजकारण होत नसल्याने कधीही बंडखोरी झाली नाही. आणि फंदफितूरी सुध्दा झाली नाही. सैन्य पैसा, शस्त्रास्त्रे याच्या बळावर चालत नसतात तर ती राजाच्या ध्येय धोरणावर असलेल्या निष्ठेच्या बळावर चालतात हे महाराजांनी दाखवून दिले होते. त्यावेळी धर्मपंडीतांनी शुद्र म्हणून अस्पृश्य ठरविलेल्या समाजाची निष्ठा व पराक्रम पाहून त्यांना किल्लेदार आणि शिलेदार बनविले. गुणवत्ता हा सैन्यातील तसेच प्रशासनात महत्वपूर्ण घटक होता.

छत्रपती शिवाजी महाराज आपल्या सैनिकांना एकीचा मंत्र देताना नेहमी म्हणायचे ' हे राज्य अवघ्याचे सर्व जाती पातींने हे रक्षावे' नौकरी करतांना किंवा लढाई करतांना कोणाचाही मुलाहिजा बाळगणार नाही असे फर्मान सोडले होते. स्वराज्यनिष्ठेपेक्षा कोणीही मोठा असू शकत नाही. स्वराज्य विचारापेक्षा मोठे आचारशास्त्र नाही असे ते मानत. म्हणूनच प्रतापगडाच्या लढाईत कृष्णाजी भास्कर पंत कुलकर्णी याने महाराजांवर पाठीमागून वार करताच महाराजांनी " ब्राम्हण म्हणून मुलाहिजा कोण बाळगतो? असे म्हणत लगेच त्याच्यावर शस्त्र चालवून त्याचे दोन तुकडे करत आपला विचार कृतीत आणून स्वराज्याच्या विचाराचे रक्षण केले. अनेक परदेशी सेनापतींना जिंकणाऱ्या या राजाच्या फौजेत मराठी, तेलगु, कानडी, गोंड, लमान, भिल्ल, पठाणअशा अनेक वेगवेगळ्या जातीचे आणि धर्माचे लोक काम करीत होते. शिवाय पर राज्यात तशा भाषा जाणणारे दोन गुजराती वकीलही महाराजांनी सेवेत ठेवले होते. कर्तबगारी हेच प्रमाण मानून सर्वाना आपलेसे केले. सैन्यावर आपल्या मुलाबाळा सारखे प्रेम केले.[९]

शिवरायांच्या गनिमीकावा या युध्दशास्त्राचा अभ्यास करुन व्हिएतनाम सारख्या छोटया राष्ट्राने बलाढ्य अमेरिका सारख्या देशाला पराभूत केले. हे ज्वलंत उदाहरण तर खरोखरच महाराज

आंतरराष्ट्रीय दर्जाचे सेनापती असल्याचा सांप्रतचा पुरावा उपलब्ध करुन देतात. जीवाची पर्वा न करता बेधडक शत्रूच्या गोटात मुसंडी मारणारा हा सेनापती शेवटपर्यंत अजिंक्य राहिला यात नवल ते काय ! जे मरणाला घाबरत नसतात.मरण त्यांनाच घाबरते. जीवाला जीव देणारे सैन्य बरोबर असते तेंव्हाच जीव धोक्यात घालणे योग्य असते. नाहीतर एकाच मोहिमेत सेनापतीचे बलिदान होत असते. आणि पुढचा इतिहास संपलेला असतो. "लाख मेले तरी चालतील परंतू लाखांचा पोशिंदा जिवंत राहिला पाहिजे." अशा विचारांचे जीवाला जीव देणारे सहकारी शिवाजी महाराजांना मिळाले आणि त्यामुळे स्वराज्याची निर्मिती होवून स्वराज्य हे सर्व शत्रू पासून अबाधित राहिले.

ॲबे कॅरे हा फ्रेंच इस्ट इंडिया कंपनीच्या कामानिमित्ताने शिवरायांच्या चौल येथील सरदाराला भेटला होता. त्यावेळचे वर्णन त्याने करुन ठेवले आहे, ते असे शिवाजीला चौल येथील हा अमलदार देखणा आणि सरासरी मानापेक्षा उंच होता. त्याला वाटत असलेल्या कुतुहलामुळे आमच्यात संभाषण सुरु झाले. प्रथम फ्रांसच्या राजाची थोरवी व त्याचे सैन्य यावर बोलणे झाले. मग कॅरेने त्याला शिवाजी विषयी माहीती विचारली. "त्यावर खबायतच्या राज्याची सीमा असलेल्या सिंधू नदीपासून बंगालच्या मुलूखाच्या खूप पलिकडे असलेल्या गंगा नदीपर्यंतचा मुलूख जिंकण्याचा शिवरायांचा बेत आहे त्यांची महत्वकांक्षा अमर्याद होती. आणि क्षमता त्याच्या महत्वकांक्षीपेक्षा मोठे आहे. तो थोर योध्दा व मुत्सद्दी आहे. त्याने सेनापतीच्या कर्तव्यांचा विशेषतः किल्ले बांधणीचा अतिशय काळजीपूर्वक अभ्यास केला आहे. अतिशय कुशल असा स्थापत्य विशारदापेक्षा त्याला किल्ले बांधणीचे अधिक ज्ञान आहे. भूगोलाचाही त्याने विशेष अभ्यास केला आहे."

देशातील बहुतेक सर्व शाह्यांची इतकेच नव्हे तर भूप्रदेशाची आणि वनस्पतींची त्याला माहिती आहे. त्याने त्यांचे अचूक नकाशे तयार केले आहे. अशा माहिती बरोबरच औरंगजेबाच्या एक मुलाशी गुप्त करार करण्याकरिता शिवाजीने आपल्या मुलाची मुद्दामच खंबायतच्या राज्यात नेमणूक केली आहे, असेही त्या अंमलदाराने कॅरेला सांगितले.

ॲबे कॅरेने पुढे आपल्या वृत्तांतात दि १ मार्च १६७३ रोजी लिहिले आहे. शिवाजीचे हेर भारतभर होते आणि त्यांच्याकडून त्याला माहितीची काही उणीव नव्हती. त्यांच्या विरुध्द

चाललेल्या तयारीला म्हणजे मोगल व विजापूरकरांच्या शिवरायांविरुध्द चाललेल्या आणि योजनांना त्याने काही महत्व दिले नाही आणि एखाद्या प्रती अलेक्झांडर प्रमाणे त्याने आपल्या सैनिकांना असे सांगितले की, त्यांच्या शत्रूकडे चैनीबाजी,मोठमोठी पदे आणि भपकेबाज पोशाख या गोष्टी जेवढ्या जास्त असतील तेवढ्या प्रमाणात त्यांच्याकडे पात्रता पराक्रम आणि धैर्य या गोष्टी कमी प्रमाणात असतील. लोखंड व पोलाद हेच प्रत्येक सैनिकाचे अलंकार असून त्याचे सैनिक त्यांनी आवृत्त असलेले पाहणेच त्याला पसंत आहे. शिवाय त्याच्याकडे इतक्या युक्त्या आणि क्लृपत्या होत्या की, त्यातून निसटणे त्याच्या शत्रूंना फार अवघड जात असे. त्याचे बेत कोणाला ठाऊक नसत आणि तो आपल्या सर्व सैनिकासह एखादे जागी आहे अशी समजूत असे तेंव्हा अपेक्षित योजनेच्या नेहमी विरुध्द योजना अमलात आणून तो सर्वांना आश्चर्यचकीत करीत असे.

ॲबे कॅरेने आपल्या ग्रंथात लिहिलेली शिवरायांबद्दलची काही माहीती पुढे दिली आहे. यामध्ये कॅरेने शिवरायांची तुलना स्वीडनचा राजा गुस्टाव्हस ॲडॉल्फस याच्याशी त्याची तुलना करणे गैर नाही.

कॅरेने एका विजापूरच्या अधिकाऱ्याचेही छत्रपती शिवरायांबद्दलचे मत आपल्या ग्रंथात दिले आहे. तो लिहितो, ज्याला मी पुष्कळ वर्षापूर्वी मलबार किनाऱ्यावरील मिरजन येथे भेटलो होतो, अशा एक अधिकाऱ्याला मी विजापूरला भेटलो आणि तो इराणी होता. एक दिवस त्याने मला सांगितले की, ज्यांनी शिवाजीचे हेर म्हणून काम केले त्यांना सढळपणे दिलेल्या मोठ्या रकमा आणि जो नेतृत्व करण्याकरताच जन्मला आहे असे दिसते. अशा पुरुषाची कामे करण्यात त्यांना मिळालेला आनंद,मिळतो मतीतार्थ असा की, विजापूरात शिवाजीची सत्ता तिथे जो बादशहा राज्य करतो त्यांच्या पेक्षाही अधिक चालवते. पराक्रमाला नेहमीच चांगले फळ आणि थोर पुरुषांचे शत्रू देखील शिवाजी महाराजांची स्तुती करतात.[१०]

जॉन फ्रायर नावाचा एक इंग्रज इस्ट इंडिया कंपनीमध्ये नोकरीला होता. त्याने आपल्या *A new account of East India & persia, in eight letters being nines years travels* हा ग्रंथ लंडनहून इ.स. १६९८ मध्ये प्रकाशित केला होता यामध्ये त्याने शिवरायांबद्दलची

माहिती दिली आहे. त्याने त्यावेळच्या मुंबईचे वर्णन केले असून त्यात मुघल आरमार, पावसाळ्यात छावणी करण्याकरिता किंवा खलाशांची भरती करण्याकरीता मुंबईला येते. त्यामुळे शिवरायांचा रोष होतो आणि ते आरमाराला मुंबईला येण्यास परवानगी दिली नाही तर मुगल बादशहा इंग्रजांचा सर्व धंदा बंद पाडील या भीतीने तसेही करता येत नाही अशा अडचणीत इंग्रज तेंव्हा सापडलेले होते. पुढे तो लिहितो, शिवाजींनी एखाद्या जोरदार पाणलोटाप्रमाणे समोर येईल ते काबीज केले असून त्यांच्या नावाची सर्वत्र दहशत आहे. आपल्या प्रवासात फ्रायर कल्याणला आला होता. तिथल्या जकात अधिकाऱ्याने ते आपल्याचे हवालदाराला कळविल्यावर त्यांच्या मुक्कामासाठी एक मोठी मशीद नेमून दिली होती. त्या रात्री फ्रायरने कल्याणमध्ये मुकाम केला होता. कल्याणमध्ये मशिदी आहेत. फ्रायरने शिवरायांच्या जन्मापासून राज्याभिषेकापर्यंतची माहिती दिली असून शिवरायांच्या सैन्याची माहीती देतांना तो म्हणतो, त्याचे (शिवरायांचे) सैनिक काटक व शूर आहेत. त्यांच्या सैन्यात जास्तीत जास्त तीन हजार घोडदळ आणि अगणित पायदळ आहेत. तो त्याच्या लष्करात वेश्यांना व नर्तिकांना येऊ देत नाही. एकदा पापियांचे सूर ऐकण्यापेक्षा मला घोड्याचे खिकाळणे आणि शिगांच्या अथवा तुताऱ्या ललकाऱ्या ऐकणे अधिक पसंत आहे असे म्हणणाऱ्या ॲटेलास या राक राजासारखा शिवराय सेनापती आहे.

पॉडेचरी येथील फ्रेंच वखारीचा मुख्य मर्टिन याने आपले रोजनिशी लिहिली आहे. शिवरायांच्या दक्षिण दिग्विजयाच्या वेळी तो तेथे हजर होता. शिवरायांच्या अत्यंत साधा शिपाईगिरीचा बाणा पाहून फ्रेंच लोकांना मोठे आश्चर्य वाटले. केव्हाही बायकामुले पेटी पेटारे वगैरे कोणत्याही प्रकारचा बडेजाव नसे. जाडेजुडे व साधे फक्त दोनच तंबू असत पैकी एक छोटा स्वतःकरिता असे तर दुसरा त्यांच्या इतर सरदारांकरिता असे. शिवरायांच्या शिलेदारांना महिन्यास दोन होन प्रमाणे मुशाहिरा (पगार) देत असे. सर्व घोडे शिवरायांच्याच मालकीचे होते व त्याच करिता त्याने काही मोनदारही ठेवले होते. जलद हालचाली करता यावे म्हणून प्रत्येक दोन इसमामागे तीन घोडी दिली जात. स्वारीवर खरी व उपयुक्त माहिती देणाऱ्या हेरांना तो सढळ हाताने

देणग्या देत असे. दि.१६ जाने १६७८ या दिवशी मुंबईहून इस्ट इंडिया कंपनीला पाठवलेल्या पत्रात पुढील उल्लेख झाला आहे.

शिवाजी राजे कोकणातील अत्यंत दुर्गम किल्ला जो रायरी येथून निघून गेल्या पावसाळ्यानंतर वीस हजार स्वार व चाळीस हजार पायदळ घेऊन कर्नाटकावर गेले. स्पेनमध्ये सिजर ज्या प्रमाणे आला. त्याने पाहिले आणि जिंकले तद्वत तेथे शिवाजी राजेचा पराक्रम होऊन तेथून अमर्याद संपत्ती मिळाली आणि पुढील युध्दाचा यशस्वी कार्यक्रम पुर्ण करण्यास त्यास साधन प्राप्त झाली. तो हल्ली बंकापूर या दोन दुर्गम किल्यावर हल्ले करीत आहे.

अलेक्झांडर दि. ग्रेट इतकाच त्याचा या बाबतीत हातखंडा आहे. कारण पूर्वी जयसिंगाला दिलेले २३ दुर्गम किल्ले त्याने (पक्ष्यांप्रमाणे चपळ स्वारांच्या साहाय्याने त्यांना तो आपले पक्षी पाखरे असेच म्हणतो) मुघलांपासून आठ महिण्याच्या आत परत घेतले. त्यानंतर याच पत्रात थेट दिल्लीवर चालकरुन जावून औरंगजेबाला तेथे कोंडून टाकेपर्यंत तलवार माण्यात न घालण्याची शिवरायांनी देवीजवळ प्रतिज्ञा केली आहे असे लिहले आहे.इ.स. १६७८ मधील १४ फेब्रुवारीला एका पत्रात इंग्रज लिहितात सिद्दी मसुद व सर्जेखान असे मोगल सेनापती दिलेरखान याला मिळून ऐंशी हजार घोडदळानिशी शिवाजी वर त्याचा नि पात करण्याच्या उद्देशाने चालून जाणारा आहे. परंतु दुसरा सेटोरियस किंवा युध्द कौशल्यामुळे प्रतिहानी बॉलच आहे हे प्रसिध्द आहे. या पाश्चात्य लोकांबरोबरच त्यावेळच्या इराणाच्या शहापर्यंतही शिवरायांची किर्ती पोहचली असून त्याने इ.स. १६६४ मध्ये औरंगजेबास लिहिलेले पत्र उपलब्ध असून त्यात पुढील मजकूर आला आहे. आम्ही असे ऐकले की बादशहा असमर्थ व असहाय्य आहे. असे समजून हिंदुस्थानात अनेक बरीच ठिकाणे ताब्यात घेतली आहेत. त्यापैकी मुख्य शिवा नावाचा काफर(छत्रपती शिवराय) असून तो आजपर्यंत कोणाला माहितही नव्हता बादशाहाच्या कमकुवतपणामुळे त्याला संधी मिळून त्याने पुष्कळ किल्ले ताब्यात घेतले. कित्येक शिपायांना मारले मुलुख उजाड केला व आता तो बादशाही बरोबरचे नाते सांगू लागला आहे.

मुंबईहून सुरतला १८ जून १६६० रोजी पाठवलेल्या पत्रात लिहिले आहे, शिवाजी मोगली फौजे प्रमाणे आळसी रहात नाही. कारण तो सूर्यप्रकाशात असतानाच गवत वाळवतो असे नसून जाड पावसाने सूर्य आच्छादून गेला असतानाही त्यांचे काम चालते. (पावसाळयात देखील त्यांचा उद्योग थांबत नाही) मोगली फौज पावसाळ्याकरिता टेकडीच्या आश्रयाला निघून गेल्यानंतर सुध्दा शिवाजीच्या हालचाली चालून आहेत गोऱ्याच्या व्हाईसरायने पोर्तुगालला आपल्या राजास पाठविलेल्या पत्रात शिवाजी महाराजांचा अदभूतरम्य पलायनाचा वृत्तांत आहे. गोवा, २७ जानेवारी १६६७ कॉट व्हि. रेई. तो (शिवाजी) आपल्या देशात आल्याचे कळताच आदिलशाहने त्याच्या विरुध्द हालचाली करण्यासाठी चाळीस हजार घोडेस्वार व मोठे पायदळ गोळा केले व तो घाटाखाली उतरला तो आमच्या हद्दीपासून अवघ्या सहा मैलाच्या अंतरावर होता त्याच्या सैन्याने सगळीकडे जाळपोळीचे आणि लुटमारीचे सत्र सुरु करताच शिवाजीने त्याच्या सेनापतीकडे एक मोठा नजराणा पाठविला. त्या नजराण्याने सेनापती खूष झाला व आपल्या सैन्यास त्याने आवरते घेतले. शिवराय त्याची वाट पाहत होते. तो विजेच्या वेगाने कोकणात शिरला व आदिलशाहाच्या सेनापतीला त्याने जे द्रव्य भेट म्हणून पाठविले होते. त्या द्रव्याचा तिप्पट द्रव्य त्याने त्याकडून वसूल केले. त्याने कोकणातील अनेक देसायांना आपल्या अंकित केले, आणि आता तो फोडा महालात आमच्या हद्दीपासून अगदी जवळ येऊन पोहचला आहे.

धुर्तपणा,चातुर्य, पराक्रम, चपळता आणि लष्करी बुध्दी ही ह्या बाबतीत शिवरायांची तुलना करायची झाल्यास ती सीझर आणि सिकंदर ह्याच्याशी करावी लागेल. तो नाही अशी एकही जागा नाही तो सबंध आशियाशी युध्द करीत आहे. मोगल बादशाहपाशी लक्षावधी सैन्य आहे.पण या सैन्याला न जुमनाता त्याने सूरत शहर लुटले मोगल सैन्याप्रमाणेच आदिलशहाचे सैन्य ही त्याच्या दुसऱ्या बाजूस होते. परंतू यादोन्ही बलाढ्य शत्रूमधून तो सुरतेहून सुरक्षीतपणे मागे परतला. जमिनी प्रमाणे समुद्रावरही त्याचा दरारा आहे. आम्हाला त्याच्या आरमाराची भिती वाटते.

आपल्या लेखणीने परकीय लोकांनी शिवरायांचे अनेक गुण आपल्यासमोर आणलेले आहेत. शिवरायांची तुलना जगातील सर्वोत्तम सेनापतीशी केलेली आहे. यामध्ये जगज्जेता

अलेक्झांडर दि ग्रेट, जुलिअस सिझर, हॉनीबॉल, गुस्टाव्हस ॲडाल्फ, अटेअस सेटोरीअस आदींचा समावेश होतो. शिवरायांचे महत्त्व समकालीन परकीय लोकांनी ओळखून त्यांच्या बद्दल चांगले लिहून ठेवले हे भारतीय इतिहासाच्या दृष्टीने फारच महत्वाचे आणि गौरवशाली आहे.यावरून छत्रपती शिवाजी महाराजांची युध्दनिती आणि युध्दशास्त्र किती विकसित झालेले होते हे आपल्या लक्षात येते.[११]

## ➢ संदेशवहनातील वैज्ञानिक दृष्टिकोन

आज आपण २१ व्या शतकात विज्ञान आणि तंत्रज्ञानाने आमूलाग्र क्रांती केली आहे. या क्रांतीने संदेशवहनाची अनेक साधने उपलब्ध केली आहेत. त्या साधनाद्वारे आपण आपले दैनंदिन जीवन सुखकर केले आहे. परंतु १७ व्या शतकात छत्रपती शिवरायांनी संदेशवहनासाठी ज्या वैज्ञानिक पध्दतीचा वापर केलेला आहे. यातून छत्रपती शिवरायांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळी दूरध्वनी, मोबाईल (भ्रमणध्वनी), फॅक्स किंवा सॅटेलाईटफोन अशा संदेशवहन करणाऱ्या आधुनिक यंत्रणा नव्हत्या तरीही या जाणात्या राजाने आपल्या बुध्दीमत्तेचा उपयोग करुन खूप चांगल्या प्रकारची संदेशवहन व संपर्क यंत्रणा निर्माण केली होती हे आधुनिक काळाला साजेसे असे त्यांचे तंत्रज्ञान होते.

जगातील सर्वात वेगवान अशा समजल्या जाणाऱ्या दोनच शक्ती शास्त्रज्ञाना अभिप्रेत आहेत. त्या म्हणजेच ध्वनी आणि प्रकाश होय. आज सर्वात वेगाने उड्डाण करणारे विमान ध्वनीच्या गतीवरुन मोजले जाते. विज्ञान आणि तंत्रज्ञानाच्या जन्मापूर्वी डोळसपणे याचा प्रयोग हिंदवी स्वराज्यातही करणारा राजा छत्रपती शिवाजी महाराज हे एक वैज्ञानिक दृष्टीकोन बाळगणारे राजे होते हे संपूर्ण जगाने मान्य केलेले आहे.[१२]

- **पन्हाळा किल्याला वेढा :**

**पन्हाळगड ते विशाळगड - ध्वनीचा उपयोग**

छत्रपती शिवाजी महाराजांनी विशाळगडावरुन डागलेल्या पाच तोफा हा सांकेतिक इशाराच होता. लढाई करीत असतांना माणूस डोळे आणि मन एकत्र करुन लढत असतो. अशा वेळी विचलित न होता इशारा देण्यासाठी त्या तोफाचा आवाज म्हणजे ध्वनीचा उपयोग महाराजांनी सिग्नल यंत्रणा म्हणून केला होता.

घोडखिंडीचा प्रदेश दाट जंगल झाडी, झुडपाचा आणि दुर्गम डोंगर दऱ्यांचा आणि विशाळगडाचे अंतर बारा कोसाचे आहे. घोडखिंडीतून विशाळगड किंवा विशाळगडावरुन घोडखिंड दृष्टीक्षेपात येणे अवघड होते. त्यामुळे त्या ठिकाणी प्रकाशाचा उपयोग करता येणार नाही. म्हणून या ठिकाणी महाराजांनी ध्वनीचा उपयोग संदेशवहनासाठी करुन समयसूचकता दाखविली होती.

- **शाहिस्तेखानावर हल्ला - ५ एप्रिल १६६३**

**ध्वनि आणि प्रकाशाचा उपयोग -**

  - ❖ शिवाजी महाराज आणि त्यांच्या मावळयाचा मोगल पाठलाग करणाच होते. महाराज, तानाजी मालूसरेसह हिंगण्यातील मोत्यांच्या बागेत पोहचले आणि इशारतीचा कर्णा वाजविला.
  - ❖ कात्रजच्या घाटात बैलांच्या शिंगाना आणि झाडांना बांधलेले टेंभे तेथील मावळयांनी पेटविले. या ठिकाणी प्रकाशाचा उपयोग केला गेला. शत्रूसैन्याचे लक्ष विचलित केले.

- **कोंढाणा किल्याची लढाई**

**प्रकाशाचा उपयोग -**

तानाजी मालूसरे पडल्यानंतर सूर्याजी मालूसरे, सूर्याजी जेधे आणि शेलार मामाने उदयभानच्या नरडीचा घोट घेत कोंढाणा जिंकला कोंढाणा जिंकला ती वेळ होती मध्यरात्रीची आणि अशा वेळी कोंढाणा किल्याची खबर देण्यासाठी इशारा करण्यासाठी जी खूण ठेवली होती ती

प्रकाशाची होती. कोंढाणा जिंकला की इशारा म्हणून गडावरील गवताच्या गंजी पेटवण्याचे ठरले होते. त्यानुसार मावळ्यानी कोंढाणा जिंकताच गडावरील गवताच्या गंजी पेटवून राजगडावर असणाऱ्या शिवाजी महाराजांना संदेश दिला.

➢ **आगऱ्यातून सुटका**

**प्रकाशाचा उपयोग**

अग्नीचा उपयोग शिवाजी महाराजांनी संदेश वहनासाठी आग्रा शहरातून बाहेर पडण्यासाठी अचूकपणे केला होता. शिवाजी महाराज कैदेतून निसटले की सर्वात पहिली मजल मारणार होते ते कुंभार वाड्यात आणि तेथून घोडे घेऊन पुढचा प्रवास करणार होते. शिवाजी महाराजांना बाहेर पडल्यावर दिशा दर्शन व्हावे म्हणून त्या कुंभाराला संभाजी राजांनी जवळच्याच विस्तीर्ण सपाट मैदानावर उंचवट्याच्या ठिकाणी नवीन भट्टी लावण्यास सांगितले. त्यासाठी लागणारी सर्व आर्थिक बाजू शंभू राजांनी सांभाळली. रात्रदिवस कुंभाराची भट्टी (आवा) कायम पेटती राहिल याची दक्षता घेण्याची सूचना दिली. शिवाजी महाराज दिवसा रात्री, अपरात्री केंव्हाही बाहेर पडले तरी योग्य दिशेनेच प्रवास व्हावा यासाठी ही सगळी धडपड चालू होती. शिवरायांच्या ठिकाणापासून जवळपास तीन कोसाच्या अंतरावर ही पेटती भट्टी तयार ठेवली गेली होती. सलग तीन महिने ही भट्टी चालूच होती.भट्टीच्या प्रकाशात शिवराजीराजेनी मार्गक्रमण केले.[१३]

➢ **धूराचा उपयोग संदेशवहनासाठी :-**

कोणत्या प्रकारची लाकडे जाळल्यावर पांढरा धूर निघतो आणि कोणत्या प्रकारची लाकडे जाळल्यावर काळा धूर निघतो याचा अभ्यास करुन महाराजांनी लाकडाचे वर्गीकरण करुन त्याचा साठा (स्टॉक) प्रत्येक किल्ल्यावर केलेला असे. सुरुवातीच्या काळात महाराजांकडे तोफाच नव्हत्या. पुढे हळूहळू जमावाजमव झाली आणि महाराजांनी किल्ल्या किल्यावर तोफा पेरल्या. फिरता तोफखाना महाराजांकडे नव्हताच आणि त्याचा महाराजांना उपयोग सुध्दा नव्हता. वेळ दिवसाची असेल आणि गडावर तोफा सुध्दा नसतील तर अशा वेळी एका किल्ल्यावरुन दुसऱ्या

किल्ल्यावर संदेश पोहोचविण्यासाठी छत्रपती शिवाजी महाराजांनी तयार केलेली आणि अंमलात आणलेली युक्ती अनमोल होती.

- **पांढरा धूर -**

बातमी चांगली असेल तर स्वराज्याच्या जमेची बाजू आहे. अशा वेळी गडावर पांढरा धूर सोडला जाई. मग तो धूर पाहून त्याच्या बाजूच्या किल्यावर इशारा मिळाला की त्या किल्ल्यावर पांढरा धूर करुन पुढच्या आणि आजूबाजूच्या किल्ल्यांना इशारा दिला जाई.पांढरा धूर म्हणजे चांगल्या बातमीचे संकेत होते.यावरुन शिवरायांचा अभ्यास आणि दूरदृष्टी दिसून येते.

- **काळा धूर -**

शेकडो मैलांचे असणारे अंतर महाराजांची संपर्क यंत्रणा काही मिनिटात पार करुन योग्य तो संदेश योग्य त्या ठिकाणापर्यंत पोहचवीत होती. जर इशारा धोक्याचा असेल, गनिमाचे भयंकर आक्रमण असेल, शत्रूच्या रोखाने येत असेल तसा इशारा देणारा काळा धूर केला जाई. त्याच प्रमाणे आजूबाजूचे किल्लेदार सावध होत असत व ते ही आपल्या किल्ल्यावर तसाच काळ्या धुराचा लोट तयार करुन आजूबाजूच्या किल्ल्यांना इशारा देत शत्रूच्या आक्रमणा बाबत बातमी देत असत.

महाराष्ट्रात असणाऱ्या ३६० किल्ल्यावर अवघ्या काही तासात अशा प्रकारे सूचना मिळत होत्या. पुढील कारवाई केली जात होती. याचाच परिणाम म्हणून की काय मोगलांना महाराजांचा कोणताही किल्ला गाफील ठेवून घेण्यात कधीच यश मिळाले नाही.काळा धूर म्हणजे संकटाची चाहूल होती.हे शिवरायांनी आपल्या संपर्क यंत्रणेला घालून दिलेला तो नियम होता.

आपल्या हालचालींची आपल्या लोकांना माहिती देता यावी यासाठी शिवाजी महाराजांनी या गडकोटांचाच उपयोग केला. कोणता लाकूड जाळल्यावर पांढरा धूर येतो यावर संकेत करायचे शिवाजी महाराजांचे ठरलेले होते. तानाजी कोंढाणा घ्यायला गेला. कोंढाणा जिंकला आणि कोंढाणा जिंकल्याची बातमी कळावी म्हणून मावळ्यांनी गवताच्या गंजी पेटवल्या पांढरा धूर आसमंतात भिडला आणि तो पांढरा धूर महाराजांनी राजगडावर बघताच महाराज कडाडले गड फते म्हणजे

पांढरा धूर हे विजयाच्या संकेताची खूण होती. एखादी अशुभ बातमी असेल तर काळा धूर केला जायचा तो रायगडावर केला जायचा, रायगडावरचा काळा धूर राजगडावर दिसायचा, राजगडावरचा काळा धूर प्रतापगडावर दिसायचा प्रतापगडावरचा काळा धूर पाटणच्या दाते गडावर दिसायचा, पाटणच्या दाते गडावरचा काळा धूर पन्हाळ्यावर दिसायचा, पन्हाळ्याच्या काळा धूर सामान गडावर दिसायचा, सामान गडावरचा काळा धूर रांगण्यावर दिसायचा. महाराष्ट्राला ३६० किल्ल्यावर एका तासाच्या आत संदेश पोहचण्याच काम व्हायचे.तो केवळ धूराचा केलेला अचूक उपयोग होय.[१४]

**छत्रपती शिवरायांच्या संदेशवहनातील वैज्ञानिकतेचा अप्रतिम नमुना - रायगडावरील ध्वनी**

आज २१ व्या शतकात विज्ञान आणि तंत्रज्ञानात प्रचंड प्रगती झाली पण ४०० वर्षापूर्वी छत्रपती शिवाजी महाराजांनी आपल्या वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग करुन माहिती आणि तंत्रज्ञानाच्या माध्यमातून संदेशवहनातील जे तंत्रज्ञान विकसित केले. त्याला विशेष महत्व आहे. शिवरायांनी स्वराज्याची स्थापना करुन त्याचे सुराज्यात रुपांतर केले. सुराज्यात रुपांतर करीत असतांना आपले राज्य सर्व गोष्टींनी परिपूर्ण असायला पाहिजे. यावर महाराजांचा कटाक्ष होता. म्हणून त्यांनी रायगडावरील ध्वनिचा जो प्रयोग महाराजांनी केला त्यातून त्यांच्या वैज्ञानिक दृष्टीकोनाची साक्ष दिसून येते. रायगडाच्या प्रवेशद्वारा पासून ते रायगडाच्या परिसरात कोणताही व्यक्ती कितीही हळू आवाजात बोलला तरी ते ध्वनी महाराजांच्या सिंहासनाजवळ स्पष्ट आवाजात ऐकू येत होते. यातून महाराजांची गुप्तचर यंत्रणा किती सक्षम होती हे आपल्याला दिसून येते. एवढेच नाही महाराजांची निरीक्षण क्षमता,अनुमानक्षमता किती परिपूर्ण होती हे दिसून येते. स्वराज्याच्या उभारणीत माहितीतंत्रज्ञान विज्ञानाचा वापर करणे ही गोष्टच शिवाजी महाराजांच्या वैज्ञानिक दृष्टिकोनाची साक्ष पटविते.[१५]

**शिवरायांची पर्यावरण निती -**

छत्रपती शिवरायांनी सह्याद्रीच्या डोंगररांगावर, तसेच कोकण किनारपट्टीवर अभेद्य असे दुर्ग निर्माण केले व जलदुर्ग बांधतांना पर्यावरणाचा सखोल अभ्यास केलेला दिसतो. सिंधूदुर्ग या जलदुर्गाचे बांधकाम पाहिल्यावर शिवराय हे श्रेष्ठ दर्जाचे पर्यावरण तज्ञ होते हे सिध्द होते. १६६४ मध्ये कुरटे बेटावर शिवरायांनी सिंधुदुर्ग बांधून घेतला. तेथील पाण्यात आडवे-तिडवे छुपे खडक असल्याने बेटाभोवती तीन कोसपर्यंत मोठ्या नौका येणे मुश्किल होते. पर्यावरणाच्या ज्ञानामुळे शिवरायांनी येथेच गड बांधला या गडावर चारबाजूंनी खारे पाणी असतांना तेथील दहीबाव, साखरबाव, व दूधबाव या तीन गोड्या पाण्याच्या विहिरी आहेत. पर्यावरणपूरक शौचालय बांधण्याचा आग्रह आज भारत सरकार करते आहे. तसे ४० शौचकुप या जलदुर्गावर बांधलेले आहेत.पर्यावरणाचे संतूलन राखण्यासाठी छत्रपती शिवरायांनी जे कार्य केले आहे त्याची दखल आज संपूर्ण जगाने घेतलेली आहे.

कोकणातील विजयदुर्ग जिंकून घेतल्यावर तेथेही शिवरायांनी दुर्ग विज्ञान वापरले. गडाच्या पश्चिमोत्तर लांबीच्या समुद्राच्या तळात अंदाजे ४०० मीटर लांबीची तटबंदी मरीन अर्किऑलॉजी क्लबने शोधून काढली आहे. या तटबंदीचा वापर गडाच्या सरंक्षणासाठी केला गेला. शिवकाळात अनेक जहाजे या बाजूने येतांना रसातळताला गेल्याची नोंद इतिहासात आहे. ही जहाजे कशास धडकून फुटतात याचे त्याकाळी पोर्तुगीज व इंग्रजाना कोडे पडत असे.

'ज्यांचे आरमार त्यांचा समुद्र' या तत्वाप्रमाणे शिवरायांनी सिंधुदुर्ग , विजयदुर्ग, रत्नागिरी येथील बंदरात जहाज बांधणीचे कारखाने व गोदामे उभारली. सागरी मार्गे शत्रूच्या घुसखोरीस प्रतिबंध करुन किनारपट्टी वरील जनतेला सुरक्षित ठेवण्याचा प्रयत्न केला. पर्यावरणाचे, भूगोलाचे परिपूर्ण ज्ञान असल्याशिवाय हे सर्व करणे शक्य नव्हते.

मराठेशाहीच्या विस्तारासाठी वापरलेले ' गनिमी कावा ' हे युध्दतंत्र शिवरायांनी उपलब्ध पर्यवरणाचा वापर करुनच विकसित केले होते. सह्याद्रीतील घाट मार्गाच्या परिस्थिती विषयी फेरीस्ता लिहितो की, ' या घाटातील वाटा इतक्या तोकड्या होत्या की, त्याची तुलना केसाच्या

कुरळेपणाशी केली तरी बरोबरी होणार नाही. या अरण्यात सूर्याचा कवडसाहि पडायचा नाही. या सर्व बाबी गनिमी काव्याला अनुकूल होत्या '. त्यांचा शिवरायांनी आपल्या पर्यावरण नितीत योग्य वापर करुन घेतला.

आदिलशाही सरदार अफजलखानाचा १० नोव्हेंबर १६५९ रोजी प्रतापगडाच्या पायथ्याशी असलेल्या घनदाट जंगलात केलेला पराभव तसेच २ फेब्रु. १६६१ रोजी मुघल अधिकारी कारतलबखान याच्या तीस हजार फौजेचा उंबरखिंड येथे केलेला पराभव ही गनिमी कावा युध्दतंत्राची उदाहरणे म्हणून सांगता  येतात. शिवकाळात दगड धोंड्याचा वापर करुनही शत्रूला नामोहरम करण्याचा प्रयत्न केला जात नसे.

आजच्या सारखीच दुष्काळी परिस्थिती शिवकाळतही होती. १६३० तसेच १६५० या वर्षी दुष्काळ पडल्याची नोंद आढळते. शिवरायांनी हवामानाचा लहरीपणा लक्षात घेऊन जलव्यवस्थापन करण्यावर भर दिला. रामचंद्रपतंअमात्य यांच्या मार्फत आज्ञापत्रात शिवराय आज्ञा करतात की, 'गडावर आधी उदक पाहून किल्ला बांधावा, पाणी नाही आणि ते स्थळ तो आवश्यक बांधणे प्राप्त झाले तरी आधी खडक फोडून तळी टाकी पर्जन्य काळापर्यंत संपूर्ण गडास पाणी पुरेल अशी मजबूत बांधावीत. गडाचे पाणी बहूत जतन राखावे ' पाणी बचतीचाही संदेश शिवराय देतात. पाणी आडवावे पाणी जिरवावे आणि पाणी बचत करावे हा संदेश आजही गडकिल्यावर उपलब्ध असलेल्या  पाण्यावरुन दिसून येते.

शिवरायांनी वनसंवर्धनालाही खूप महत्व दिले होते. गडावर आंबा, वड, नारळ, साग, शिसव, अशी झाडे लावली जात होती. रायगडाच्या पायथ्याला शिवरायांची मोठी आमराई असल्याचा उल्लेख मिळतो. त्यांनी आपल्या एका आज्ञापत्रात वृक्षतोड थांबविण्याचा संदेश देऊन संत तुकाराम महाराजांच्या 'वृक्षवल्ली आम्हा सोयरे वनचरे' या वचनाचा प्रत्यक्ष जीवनात अवलंब केल्याचे आढळून येते. वेळ प्रसंगी लाकूड परमुलखातून विकत घ्यावे व त्याच्या नौकी तयार करावेत.शिवरायांनी त्याकाळात वृक्षसंवर्धनाबाबत आणि जलसंधारणाबाबत घेतलेली दक्षता

आजच्या काळात किती उपयुक्त आहे हे दिसून येते.त्याचबरोबर शिवरायांनी पर्यावरण संतुलनाची घेतलेली काळजी आणि त्यासाठी केलेले प्रयत्न प्रेरणादायी आणि उपयुक्त आहेत.[१६]

**पर्यावरणाविषयी शिवरायांचे आज्ञापत्र**

रामचंद्रपंत अमात्यांनी 'आज्ञापत्र' लिहिले यात शिवाजी महाराजांच्या धोरणांचे प्रतिबिंब आढळते. खालील उताऱ्यातून महाराजांचा पर्यावरणा सबंधी दृष्टिकोन स्पष्ट होतो.

"आरमारास तख्ते, सोट, डोलाच्या काठ्या आदिकरुन थोर लाकडे असावे लागते आपले राज्यात अरण्यात सागवानादि वृक्ष आहेत, त्यांचे जे अनुकुल पडेल ते हुजूर लेहून हुजूरचे परवानगीने तोडून न्यावे. या विरहित जे लागेल ते परमुलकीहून खरेदी करुन आणवीत जावे. स्वराज्यातील आंबे, फणस आदिकरुन हेही लाकडे आरमाराचे प्रयोजनाची, परंतु त्यांस हात लाऊ न द्यावा. काये म्हणोन की, ही झाडे वर्षा दोन वर्षानी होतात यैसे नाही. रयतेने ही झाडे लाऊन लेकरासारखी बहुतकाल जतन करुन वाढविली. ती झाडे तोडिल्यावरी त्याचे दुःखास पारावार काये? एकास दुःख देऊन जे कार्य करीत म्हणेल ते कार्य करणारासहित स्वल्पकालेच बुडोन नाहीसेच होते; किंबहूना धन्याचेच पदरी प्रजापीडणाचा दोष पडतो. या वृक्षांच्या अभावे हानीही होते. या करिता हे गोष्टी सर्वथा होऊ न द्यावी."

यावरुन छत्रपती शिवाजी महाराज पर्यावरणाच्या रक्षणाबद्दल किती जागरुक होते. हे आपल्याला दिसून येते. आज आपण २१ व्या शतकात पर्यावरणाच्या रक्षणाबद्दल बोलतो,विचार करतो. परंतू हा विचार छत्रपती शिवरायांनी १७ व्या शतकात केलेला दिसून येतो. यातून असे लक्ष्यात येते की, शिवरायांच्या अंगी वैज्ञानिक दृष्टीकोन, पर्यावरणीय दृष्टीकोन, भौगलिक ज्ञान होते.हे शिवाजी महाराजांचे वैज्ञानिक विचार आजही २१ व्या शतकात आपल्याला उपयोगी पडणारे आहेत.[१७]

स्वराज्याच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने काही नव्या किल्ल्यांची उभारणी महाराजांनी केली. परंतू त्याचबरोबर जुने किल्ले ताब्यात घेऊन त्यांची डागडुजीही केली. किल्ल्यांच्या दुरुस्तीसाठी शिवाजी महाराज बरीच रक्कम राखून ठेवत याची कल्पना इ.स. १६७१-७२ च्या एका जाबत्यावरुन

येण्यासारखी आहे. या पत्रानुसार शिवाजी महाराजांनी किल्ल्यावर घरे बांधण्यासाठी १ लक्ष ७५ हजार होनांची तरतूद केली होती. आणि त्यापैकी एकट्या रायगडासाठी ५० हजार होन राखून ठेवले होते.

एका किल्ल्यावरुन दुसऱ्या किल्ल्यांशी संपर्क साधता यावा यासाठी शिवाजी महाराज नेहमीच दक्ष असत. रात्रीच्या वेळी विशिष्ट प्रकारे आगटी पेटवून किंवा जाळ करुन एका गडावरुन दुसऱ्या गडावर संदेश पाठविणे शक्य असे. गिरिदुर्ग हे उंच जागी असल्यामुळे पंधरावीस मैलांच्या परिसरातून विशिष्ट संकेतानुसार निरोपाची देवाणघेवाण करणे अवघड नसे. अशा प्रकारे संपर्क साधता येणाऱ्या किल्ल्यांच्या महाराजांनी साखळ्या तयार केल्या. मराठेशाहीचे यश कोणत्याही एका किल्ल्यात नसून या किल्ल्यांच्या साखळ्यात होते ही गोष्ट लक्षात येते.[१८]

**संदेशवहनाचा उत्कृष्ट नमुना - रायगड किल्ला.**

छत्रपती शिवाजी महाराजांनी निवडलेले राजधानीचे ठिकाण रायगड हे होते. लष्करी दृष्ट्या रायगड अजिंक्य,बेलाग आणि शत्रूला पायथ्यापर्यंत पोहचविणे दुरापस्त होते. असे असले तरी रायगडाला जवळपास ६५ किल्यांचे संरक्षण आहे. ६५ किल्ल्यांच्या मध्यभागी रायगड वसलेला आहे हे दुसरे कारण. काही किल्ले तर रायगडापासून हाकेच्या अंतरावर तर काही उघड्या डोळ्यांनी स्पष्ट दिसतील एवढ्या अंतरावर होती.

रायगडाची उंची हा एक भाग महाराजांनी अगदी आवर्जून लक्षात घेतलेला आहे. आजूबाजूच्या इतर कोणत्याही किल्ल्यापेक्षा रायगडाचा बालेकिल्ला जवळपास ४०० फुटांनी उंच आहे. म्हणजे आजूबाजूचा एखादा किल्ला शत्रूच्या ताब्यात जाऊन त्याने तेथून तोफा चालविल्या तरी किल्ल्याच्या तटबंदीपर्यंत येऊ शकत नव्हत्या. ही एक गोष्ट तर प्रचंड उंची असल्यामुळे संदेशवहन करण्यासाठी राजधानी म्हणून रायगडाचा चांगलाच उपयोग होत होता. मग ते संदेशवहन प्रकाशाच्या माध्यमातून असो किंवा ध्वनीच्या माध्यमातून असो. रायगडची सुरक्षितता अभेद्य रहावी म्हणून महाराजांनी रायगडाला सुध्दा चिलखती कवच घातले. रायगडाच्या ईशान्येला लिंगाणा किल्ला, पुर्वेला तोरणा, दक्षिणेला कांगोरा, चांभारगड, सोनगड तर वायव्येला तळेगड आणि

उत्तरेला घोसाळगड अशा सात किल्ल्यांच्या तटबंदीत स्वराज्याची राजधानी रायगड महाराजांनी जाणीवपूर्वक निवडली आणि बांधली. रायगड या किल्ल्यांची निवड या सर्व कारणामुळे राजधानीचा किल्ला म्हणून निवडला.[१९]

**छत्रपती शिवरायांचा सागरी युध्दशास्त्रातील वैज्ञानिक दृष्टीकोन :-**

छत्रपती शिवराय हे दूरदृष्टी असणारे राजे होते आपल्या महाराष्ट्राला ७२० किलोमीटरचा सागरी किनारा लाभलेला आहे.आपला महाराष्ट्र जर सुरक्षित रहावे असे वाटत असेल तर आपला सागरी किनारा सुरक्षित असला पाहिजे. हे शिवरायांनी ओळखले होते. म्हणून त्यांनी सागरी सुरक्षेकडे लक्ष दिले. एवढेच नाही तर त्यांनी त्यात नवनीवन गोष्टी निर्माण करण्यासाठी वैज्ञानिक दृष्टीकोनाचा उपयोग केलेला आहे. स्वराज्याला पश्चिमेकडून सुरक्षित करण्यासाठी राजांनी कोकण आपल्या ताब्यात आणले होते. पण कोकण हे तेंव्हाच सुरक्षित होणार होते. जेंव्हा स्वराज्याच्या लष्कराला सागरावर प्रभुत्व प्राप्त झाले असते आणि शिवरायांच्या स्वतःच्या म्हणण्याप्रमाणे ज्याच्या जवळ प्रभावी आरमार तोच सागराचा स्वामी होऊ शकतो. म्हणूनच राजांनी कोकणाच्या किनाऱ्यावर सुरक्षित सागरी किल्ल्यांची मालिका निर्माण करुन तेथील बंदरे सुरक्षित केली. प्रभावी आरमाराच्या निर्मितीस त्यांनी सुरुवात केली. खवासखानाचा दणदणीत पराभव करुन त्यांनी लगेच फोंड्याचा किल्लाही काबीज केला. यावेळी उत्तरेतून मिर्झाराजेजयसिंग प्रचंड फौज घेऊन शिवरायांच्या बंदोबस्तासाठी दक्षिणेत उतरला होता. त्याच्या हालचालींचा वेध घेतच ते कारवाया करीत होते.

फोंड्याच्या किल्ल्यानंतर त्यांनी लगेच मालवण गाठले. सतराव्या शतकात मालवण हे एक प्रसिध्द व्यापारी बंदर होते. शिवरायांनी तेथील भौगोलिक परिस्थितीचा अभ्यास केला. त्यांच्या लक्षात आले की, मालवण कितीही प्रसिध्द बंदरअसले तरी ते सुरक्षित मात्र नाही. त्यासाठी त्याच्या जवळपास एखादा जबरदस्त सागरी किल्ला बांधणे अत्यंत आवश्यक आहे. या विचारानेच मालवणच्या जवळपास असलेल्या तीन बेटापैकी एका योग्य अशा बेटाची निवड करुन त्यावर भक्कम किल्ला बांधण्याच्या कामाला सुरुवात केली. दोन मैलांचा घेर असणाऱ्या या किल्लाचे तट

तीस फुट उंच आणि बारा फुट रुंद असणार होते. या तटबंदीवर बत्तीस बुरुजांची योजनाही करण्यात आली होती. या किल्ल्याचे नाव त्यांनी सिंधुदुर्ग असे ठेवले. याच किल्ल्याजवळील बेटावर आणखी एक किल्ला बांधून त्याचे नाव पद्मगड असे ठेवले.या किल्यामुळे मालवण बंदराला चांगलीच सुरक्षितता आली. शिवरायांनी लगेच कल्याण-भिवंडीची हजार वर्षापूर्वीची जुनी बंदरे ताब्यात घेतली. त्यांना सुरक्षितता आणण्यासाठी स्वतःचे प्रभावी आरमार असणे आवश्यक आहे हे त्यांच्या लक्षात होतेच. राजांनी त्याच भागातील सागाच्या जंगलाचा उपयोग करुन सुरेख तारवे बांधून घेतले आणि त्यावर तोफा बसवल्या आणि त्यांना लढाऊ स्वरुप दिले. दोन वर्षाच्या तयारीनंतर त्यांची सागरी युध्दतंत्रात बरीच तयारी होऊन, दमणपासून चौलपर्यंतचा समुद्र किनारा ताब्यात असणाऱ्या पोर्तुगीजांनाही त्यांच्या बद्दल शंका येऊन भीती वाटू लागली.

सिंधुदुर्गाच्या बांधणीचे काम चालू असतानाच, राजापूर, विजयदुर्ग, देवगड आणि मालाडच्या खाड्यामध्ये त्यांनी नवीन पन्नास तारवे बांधून काढले आणि त्याच बरोबर मालवणच्या उतरेला दोन मैलावर असलेल्या नदीच्या मुखाचे रक्षण करणारा सर्जेकोटचा किल्लाही राजांनी बांधून काढला तसेच राजकोटचा किल्लाही दुरुस्त करुन घेतला. अर्थात या प्रचंड निर्मितीला पुन्हा पैसा हवा होताच आणि तो शिवरायांचा आक्रमकपणा आणि त्यांनी शत्रूच्या विरोधात वापरलेल्या युध्दनितीने पोर्तुगीज, डच, मोगल, हबशी, आदिलशहा आदी शत्रूंच्या मनात आपल्या भावी योजना विषयी शंका निर्माण करुन त्यांना संशयाच्या खाईत लोटून दिले. कोकणच्या सागरी सुरक्षिततेच्या कार्याची पहाणी करीतच ते राजगडावर परतले.

शिवरायासारख्या दूरदृष्टी असलेल्या सेनानीच्या मनात स्वराज्य निर्मिती बरोबरच स्वराज्य रक्षणाच्या योजनाही आखल्या जात होत्या आणि सह्याद्रीच्या परिसरातील स्वराज्याच्या रक्षणासाठी जसा सह्याद्रीच्या पूर्वेचा भाग ते सुरक्षित करण्याच्या प्रयत्नात होते तसेच सह्याद्रीच्या पश्चिमेची कोकणपट्टी आणि त्या लगतचा सागर यावरही आपले प्रभुत्व असणे आवश्यक आहे. हे त्यांनी ओळखले होते.पण आधी कोकणपट्टीच मुळी उत्तरेहून इंग्रज आणि दक्षिणेहून पोर्तूगीज अशा आधुनिक शस्त्रांनी सज्ज असलेल्या शत्रूच्या कैचीत सापडली होती आणि सागरातून आबोसिनीय

हबशी कोकणाच्या पोटात खुपसण्यासाठी सूरा उपसून तयार होताच पण शिवराय या परिस्थितीने डगमगून जाणारे नव्हते. १६५६ मधील आपल्या पहिल्या हल्ल्यातच त्यांनी दाभोळ ताब्यात घेऊन, हबशांच्या ताब्यातील जंजिरा किल्याच्या नजरेखाली असलेल्या दंडराज पुरीवर हल्ला करुन तेथील बराचसा भाग जिंकून घेतला. त्यांचे हे साहस भयंकर होते. हबशांच्या प्रदेशात गडबड करण्याचा प्रयत्न करणाऱ्यांचे ते हबशी लोक ज्या प्रकाराने भीषण हाल करीत असत ते पाहून भले भले धास्तावले होते. पण त्याची फिकीर न करता त्या महान सेनानीने आपल्या कुशल हालचालींनी सागराशी सह्याद्रीचे नाते जोडले आणि मग सावकाश पण खंबीरपणे सागरकिनारी अत्यंत योजनाबध्द पध्दतीने सरंक्षणासाठी सागरी किल्यांचे जाळे निर्माण केले. त्यांचे हे साहस पाहून इंग्रज आणि पोर्तुगीज देखील धास्तावून गेले.[२०]

सागरी किल्यांच्या साखळीला प्रभावी आरमाराची जोड दिली नाही तर इंग्रज , फ्रेंच, हबशी यांच्या सारख्या सागरावर सतत हक्काने वावरणाऱ्या घातकी शत्रूना नमविणे शक्य होणार नाही हे देखील ते जाणून होते आणि म्हणूनच त्यांनी मोठाल्या लढाऊ नौका, असंख्य गलबते तयार करवून घेतली होती आणि आता आपल्या सागरी सामर्थ्याच्या तयारीची चाचपणी त्यांनी प्रत्यक्ष स्वतःला करावयाची होती. तोरणा किल्यावर, किल्यावरील अचानक हल्याची जशी रंगीत तालीम त्यांनी सुरुवातीलाच यशस्वीपणे केली होती. त्याचप्रमाणे आपल्या सागरी सामर्थ्याचे अंदाज ते आता घेणार होते. आणि याच मोहिमेसाठी त्यांनी १६६४ च्या पावसाळ्यानंतर लगेच ४ नवीन गलबते भटकल बंदराकडे आपल्या आरमारी मोहिमेच्या पूर्वतयारीसाठी धाडली होती. याच भटकलच्या पूर्वेला पन्नाससाठ मैलांवर शिवाप्पा नाईकचे बेदनूरचे राज्य भरभराटीला आलेले होते. १६६० मध्ये या शिवाप्पा नाईकाचा मृत्यू होताच आदिलशाहाने बदनूरहून सतत खंडणी वसूल करण्याचे तंत्र आरंभीले होते. पण १६६५ च्या सुरुवातील सगळे बेदनुरचे राज्यच गिळंकृत करण्यासाठी आदिलशाहाने आपले दोन सरदार धाडण्याची बातमी शिवरायांना मिळाली होती. या शिवाय मंगळूरच्या दक्षिणेकडील नायरराजांनी उठाव करुन तो भाग जिंकण्याचा प्रयत्न सुरु केल्याची ही बातमी राजांना लागली होती. तर पोर्तुगीजांनी या संधीचा फायदा घेऊन आपले गेलेले किल्ले

बेदनूरकरांकडून परत मिळवण्याचा उद्योग केल्याची बातमी राजांच्या हेरांनी राजांना दिली होती. एकंदरीत बेदनूरचे राज्य अत्यंत गोंधळाच्या अवस्थेत होते. असल्या गोंधळाच्या अवस्थेचा फायदा घेऊन त्या बेदनूर राज्यातील सर्वात मोठे आणि सर्वात श्रीमंत अशा बसरुरसारख्या ठिकाणावर अचानक हल्ला करुन तेथील संपत्ती स्वराज्याच्या कार्यासाठी आणण्याची संधी शिवरायांसारख्या सेनापतीनी सोडणे शक्यच नव्हते. त्या भागात पसरलेले शिवरायांचे गुप्तहेर सक्रीय होतेच त्यांच्याकडून बातम्या येत होत्या. त्या बातम्यांचा आढावा घेतला जात होता. योजना आखली जात होती.

बसरुरच्या महालिंगेश्वराची शिवरात्रीची मोठी यात्रा ३ फेब्रुवारीला होती. आधीच मोठ्या असलेल्या बाजारपेठेत या यात्रेनिमित्ताने प्रचंड आर्थिक उलाढाल होणार होती. यात्रेकरुंना खुपसा माल विकून श्रीमंत व्यापारी आणखी श्रीमंत होणार होते.यात्रेनंतर आठवडाभर तरी व्यापारी मुक्काम हलवीत नाहीत ही पक्की बातमी राजांना मिळाली होती. म्हणजे ३ फेब्रुवारीनंतर आठवड्याच्या आत बसरुरवर हल्ला करण्याचे निश्चित झाले. आपल्या नवीन आरमाराच्या सामर्थ्याची परीक्षा घेतानाच आरमारी स्वारीचे तंत्र अभ्यासणे आणि त्यांचा प्रत्यक्ष अनुभव त्या सेनानायकाला घ्यावयाचा असल्याने बसरुरवरचा हल्ला हा सागरी मार्गानेच करण्याचे निश्चित झाले मग कोणत्या मार्गाने जावयाचे आहे त्यातील अडचणी शत्रूच्या मोक्याच्या जागा कोणत्या याच्या येत असलेल्या बातम्यांचा आढावा घेणे सुरु झाले. आपल्याला ज्या मार्गाने जावयाचे आहे त्या मार्गावरील पोर्तुगीजांचे प्रभावी स्थान गोवा हे ओलांडून जावे लागणार आहे. शिवाय आरमारी युध्दात प्रवीण असलेल्या इंग्रजांच्या युध्द नौकाही सागरात वावरत असण्याची शक्यता आहेच त्याबरोबरच भीती होती ती अचानकपणे पाठीत सुरा भोसकण्याच्या तयारीत असलेल्या हबशी सिद्दीची. या सर्व माहीतीबरोबरच एक महत्वाची बातमी हाती आली आणि शिवरायांचे डोळे चमकले. '८ फेब्रुवारी १६६५ ला गोवा परिसरात पोर्तुगीज आरमार असणार नाही. तसेच इंग्रजांच्या युध्द नौकाही त्या भागातील सागरात येणार नाहीत. कारण त्या सुमारास पोर्तुगीज हे इंग्रजांना मुंबई बेट अर्पण करण्यासाठी सर्व आरमारासह मुंबईला गेलेले असतील तर इंग्रज आरमार

मुंबई बंदराचाताबा घेण्यासाठी मुंबईभोवती जमलेले असेल'. ही ती बातमी होती. म्हणजे ८ फेब्रुवारी ही नियोजित सागरी मोहिमेला निघण्यासाठी अत्यंत उपयुक्त तारीख होती . तारीख निश्चित झाली आणि नुकतेच बालवयात पदार्पण केलेले शिवरायांचे मराठी आरमार शिवरायांसह ८ फेब्रुवारीला त्या अत्यंत धाडशी मोहिमेसाठी मालवण बंदरातून निघालेल्या आरमारात तीन मोठ्या लढाऊ नौका, ८५ गलबते तर सहा हजार निवडक लढाऊ सैनिक आणि अत्यंत शूर निधड्या छातीचे तरबेज असे सहकारी होते.[२१]

शिवरायांचे हे आरमार अपेक्षेप्रमाणे कोणताही अडथळा न येता गोवा कारवार होनावार वरुन १८० मैलांवरील गांगुळी बेटावर १३ फेब्रुवारी १६६५ ला पोहचले. ती फाल्गुन शुध्द अष्टमी होती. नवमीला पहाटे सकाळच्या वेळीच खाडीतून वर जाण्यासाठी भरतीचा फायदा होतो ही माहिती आधीच मिळविली असल्याने १४ फेब्रुवारीला पहाटे बसरुच्या धनाढ्या बंदरात शिवरायांचे निवडक आरमार घुसले. उरलेल्यांना खाडीच्या तोंडाशी टेहळणी आणि संरक्षणासाठी ठेवले बसरुर अजून जागे झाले नव्हते यात्रेनंतर श्रीमंत व्यापारी सुस्त आणि बेसावध होते. ते जागे होणाच्या आत शिवरायांच्या सैनिकांनी बंदराची नाकेबंदी केली आणि मग आपल्या नेहमीच्या वेगवान हालचालींनी शिस्त बध्द पध्दतीने बंदरातील व्यापाऱ्याकडील सारी संपत्ती स्वराज्यासाठी गोळा केली. सूर्य पश्चिमेच्या सागराकडे झुकत असतांनाच असंख्य लखलखती तेजस्वी रत्ने, सोने, नाणे अशी अपार धनदौलत गोळाकरुन शिवरायांचे आरमार खाडीच्या तोंडाशी आले. तिन्ही शत्रूंपैकी कोणालाही बातमी मिळून त्यांनी हालचाल करण्याच्या आत शिवरायांसारख्या अत्यंत मोलाच्या सेनानायकाला घेऊन ते आरमार परतीच्या मार्गाला लागले. याच वेळी शिवरायांना गुप्तहेरांनी बातमी दिली की बहलोलखान आपल्या आईला मक्केला धाडण्यासाठी कारवारला आलेला आहे त्याला आणि तेथील इंग्रज व्यापाऱ्यांना अचानक एक धक्का द्यावा म्हणून आपल्या आरमारातील बारा गलबते आणि चार हजार वीर घेऊन ते गोकर्णाला आले आणि बसरुरच्या धनसंपतीसह बाकी आरमार उत्तरेकडे धाडून दिले. गोकर्णहून ते सागरी मार्गानेच कारवारजवळच्या अंकोल्याला आले. अंकोल्याला येताच त्यांनी जमिनीमार्गाने कारवार गाठले. हा बहलोलखानाला आणि इंग्रजांना

अगदीच अनपेक्षित धक्का होता. ते पूर्णपणे हादरुन गेले. यावेळी बहलोलखानाचा नायब सरदार शेरखान याने प्रसंगाचे गांभीर्य ओळखून गावातील व्यापारी आणि इंग्रजांकडून पुरेशी खंडणी वसूल करुन ती शिवरायांना नजराणा म्हणून भेट केली. राजांनीही प्रचंड फौजेसह पुण्याकडे सरकत असलेल्या मोगल सेनेचा सेनापती मिर्झाराजे जयसिंग याची पावले ओळखून हाती मिळालेली संपत्ती घेऊन राजगडाकडे झेप घेतली . सागराचे आणि सागरातील प्रभुत्वासाठी सागरी किल्ले आणि प्रबळ आरमाराचे महत्व ओळखून ते निर्माण करुन यशस्वी सागरी मोहीम काढणारा आणि आपल्या नौसेनेचे मनोबल वाढविणारा शिवराय हा भारतीय इतिहासातील पहिला आणि अखेरचाच सेनापती होता. सागर आणि सह्याद्रीमधील दुवा आता पक्केपणाने साधला गेला होता. याचवेळी मिर्झाराजे जयसिंगाच्या रुपाने उत्तरेतून घोंगावत आलेले एक भयंकर वादळ पुण्यापर्यंत येऊन पोहचले होते.[२२]

**छत्रपती शिवरायांचा गनिमी कावातील वैज्ञानिक दृष्टिकोन :**

छत्रपती शिवराय हे उत्तम योध्दे होते. युध्द करीत असतांना शिवराय वेगवेगळ्या तंत्राचा उपयोग करीत असत. शक्तीपेक्षा युक्ती श्रेष्ठ या म्हणीप्रमाणे शिवरायांनी अनेक ठिकाणी युक्तीचा उपयोग केलेला आहे. दक्षिण भारतात गनिमी कावा या युध्द पध्दतीचा मोठ्या प्रमाणात उपयोग झाला. परंतू शिवरायांनी या परंपरागत युध्दपध्दतीचा उपयोग न करता त्यात बदल घडवून आणले. त्यात वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग केलेला आहे. असे अनेक उदाहरण आहेत. जिथे शिवरायांनी गनिमी कावाचा उपयोग केला.

पन्हाळ्याच्या वेढ्यातून शत्रूला गुंगारा देऊन शिवराय राजगडावर आले ते स्वराज्यात घुसून, स्वराज्य उदध्वस्त करण्याच्या प्रयत्नात असलेल्या शाहिस्तेखानाचा समाचार घेण्याच्या विचारानेच ते आले होते. त्यांच्या नेहमीच्या पध्दतीप्रमाणे त्यांनी समोर उभ्या ठाकलेल्या संकटाच्या शिडातील हवा कमी करण्याच्या आपल्या नेहमीच्या पध्दतीचा अवलंब करुन पाहिला शाहिस्तेखानाशी बोलणी करण्याचा प्रयत्न करुन पाहिला बिकानेरचा राजा राव विरेंद्रसिंग यांच्या

मार्फत त्यांनी संधान बांधले. या प्रयत्नात शाहिस्तेखाच्या बाबतीत पाऊल फारसे पुढे पडले नाही, तरी शिवरायांना राव बिरेंन्द्रसिंगासारख्या एक रजपूत मित्र मात्र मिळाला. शाहिस्तेखानावर शहेनशहा औरंगजेब खूश होता. चाकण परिंडासारखे किल्ले घेऊन खान पुण्यात मुक्काम ठोकून होता हे काय कमी झाले? १६६० चा पावसाळा संपून डिसेंबरही संपला. १६६१ साल उजाडले शाहिस्तेखानाने राजगडावर आलेल्या राजांना कोकणातून घेरण्याचा डाव टाकला. या कारवाईसाठी त्याने निवड केली तो गाजलेल्या कारतलबखानाची त्याला जवळ जवळ तीस हजारांची फौज-हत्ती - तोफा - दारुगोळा दिला. खानाच्या सोबतीला अमरसिंह चौहान घेऊन पुण्याहून चिंचवड, तळेगाव मार्गाने लोणावळ्याकडून कोकणात उतरावयाचे होते. विदर्भातील रायबागन ही माहूरच्या राजा उदाराम याची शूर विधवाही त्यावेळी कारतबखानाबरोबर होती. बरीच चांगली शिपाईगिरी केलेल्या उझबेगी वंशाच्या या कारतलबखानाने नुकताच परिंडाचा किल्ला घेऊन आपले कसब दाखवून दिले होते. तो मजल दरमजल करीत कोकणात उतरुन आपण शिवाजीला मागच्या बाजूने घेराव घालू आणि पकडीत घेऊन येऊ या विचाराने सह्याद्रीच्या रोखाने निघाला होता. आपल्यावर कोणाची नजर आहे याचा त्याला गंधही नव्हता.[२३]

शिवरायांची गुप्तचर यंत्रणा अतंत्य सक्षम होती. शंभर कोसावर काय घडते आहे याची खडानखडा माहिती आपल्याला लगेच मिळायला हवी अशी कार्यतत्पर गुप्तहेर यंत्रणा सदैव डोळ्यात तेल घालून जागृत ठेवणाऱ्या शिवरायांच्या नजरेतून मोगल सैन्याची इतकी मोठी हालचाल करणे शक्यच नव्हती. कारतलबखान इंद्रायणीच्या काठाकाठाने पुढे घुसत असतांना लोहगड, विसापूरच्या किल्ल्यांवरुन अनेक डोळे त्याची हालचाल टिपीत होते. जानेवारी १६६१ ला पुण्याहून निघालेल्या खान १६६१ च्या फेब्रुवारीच्या पहिल्या तारखेला कुरवंड्याच्या पठारावर पोहोचला. त्या रात्रीचा मुक्काम पठारावर करुन दोन फेब्रुवारीला कुरवंडा खिंड ओलांडून अंबा नदीच्या काठाकाठाने त्याने खाली घाटात उतरण्यास सुरवात केली. कुरवंडा खिंडीची उंची समुद्र सपाटीपासून दोन हजार फुट आहे. या खिंडीपलीकडे म्हणजे कोकणच्या बाजूला खिंडीपासूनच एक अरुंद अडचणीची आणि दोन्ही बाजूने दाट जंगलांनी आणि डोंगरांनी घेरलेली अशी वाट आहे.

याच निमुळत्या वाटेने उतरण सुरु होऊन दिड-दोन मैलांवरील चावणी गावाजवळ येते. तेथून थोडा ईशान्येकडे वळून हा मार्ग ठाकूर वाडीजवळ येतो. येथून मग पुन्हा अत्यंत निमुळत्या आणि अडचणीच्या चढणीला सुरवात होते. छावणीपासून ठाकूरवाडीपर्यंतची वाट इतकी निमुळती आहे की, एखाद्या तोफेच्या नळीतून जात असल्याचा भास व्हावा ही घळही दोन्ही बाजूने घनदाट जंगल आणि डोंगरांनी वेढलेली अशी आहे. उंबऱ्याजवळ या घळीचे कोकणच्या बाजूचे तोंड आहे. त्या तोंडावर उभी संख्येच्या सैन्यानेही कोकणाचा मार्ग रोखता येतो. अशी या उंबरखिंडीची भौगोलिक परिस्थिती शिवरायांनी आधीच अभ्यासून ठेवली होती. शिवरायांच्या युध्द नीतिला भौगोलिक परिस्थिती आणि निसर्गाची साथ लाभली होती. यामुळेच कमीत कमी सैन्यबळाने शत्रूच्या मोठ्यात मोठ्या सैन्याचा ते सहज पराभव करु शकत होते. म्हणूनच सह्याद्रीची साथ त्यांनी सोडली नव्हती. कोकणातून अचानक पणे येऊन लष्करी दबावाने आपणास खुल्या मैदानात ढकलण्याची मोगली सरदारांची योजना सह्याद्रीच्या एका घळीतच नामशेष करण्यासाठी त्यांनी पावले उचलली.

दोन फेब्रुवारी १६६१ च्या पहाटेपासूनच खानाच्या सैन्याने कुरवंडा खिंड उतरण्यास सुरवात केली. शिवरायांच्या सैन्याच्या तुकड्या आदल्या रात्रीच घळीच्या कोकणाच्या तोंडाजवळ तर घळीच्या दोन्ही बाजूला असलेल्या आणि घनदाट जंगलांनी वेढलेल्या डोंगरामध्ये गुप्तपणे लपून बसल्या होत्या कोकणात उतरण्याची वाटही त्यांनी हेरुन ठेवली होती. अत्यंत सावकाशपणे अवजड तोफा, हत्ती आणि दारुगोळा आदी घेऊन कुरवंडा खिंडीच्या निमुळत्या आणि अवघड वाटेने उतरणाऱ्या खानाच्या सैन्याकडे असंख्य मावळ मराठ्यांच्या नजरा लागलेल्या होत्या. अर्थात गुप्तता आणि संयम हे शिवरायांच्या युध्द तंत्राचे आणखी एक महत्वाचे कार्य होते. म्हणून त्यांचे सैनिक शांतपणे आपआपल्या जागांवर इशाऱ्याची वाट पहात दबून बसले होते. खानाचे पूर्ण सैन्य खालच्या अरुंद आणि अडचणीच्या घळीत विस्तृत पसरल्यावर ते स्थिरावत असतांनाच इशाऱ्याच्या कर्ण्यातून धारदार सुरावट बाहेर पडली आणि सारी दरी त्या निनादाने भारून गेली. क्षणार्धात कारतलबखानाच्या सैन्यावर समोरुन आणि डाव्या उजव्या बाजूंनी मावळ्यांचा मारा झाला. आधीच त्या डोंगरदरीतील प्रवासाने घाईला आलेले, त्यातून तेथील भौगोलिक परिस्थितीमुळे हालचालीवर

बंधन पडलेले ते थकलेले, तहानलेले आणि आता तरी आराम करता येईल म्हणून वाट पाहणारे कारतलबखानाचे बरेचसे सैन्य कापले गेले. काही पळून जाण्याचा प्रयत्नात पकडले गेले कारण आतापर्यंत मावळ्यांनी परतीचा मार्गही रोखला होता. रायबागनला परिस्थितीचा अंदाज येताच तिने कारतलबखानाला शरणागती पत्करण्याची सूचना केली.आणि त्यानेही ती लगेच अमलात आणली. कारतलबखान हा शहाजी राजांचा मित्र होता हे ध्यानात घेऊनच शिवरायांनी त्याला जीवदान दिले पण त्याच्या जवळील सर्व हत्यारे, दारुगोळा तोफा आणि खजिना मात्र आपल्या ताब्यात घेतला. या प्रचंड विजयाने साऱ्या आसमंतात शिवरायांचा दबदबा पसरला आणि पाश्चात्यांचे धाबे दणाणले.[२४]

**शिवरायांच्या युध्दतंत्राचा प्रयोग व्हिएतनाममध्ये**

शिवरायांच्या युध्दतंत्राचीच एक प्रतिमा १९५४ साली व्हिएतनाममध्ये दिएन बिएन फ्यूच्या दरीत व्हिएतनामच्या मुक्ती सैनिकांनी जनरल व्हो निऑन गिऑप याच्या नेतृत्वाखाली अत्याधुनिक हत्यारांनी सज्ज अशा प्रचंड फ्रेंच सैन्याच्या केलेल्या पराभवाच्या वेळी दिसून आली. राज्यकर्त्या फ्रेंचाचे जोखड आपल्या मानेवरुन झुगारुन देण्यासाठी व्हिएतनामी जनता त्यावेळी जनरल व्ही निऑन गिऑप या धाडसी सेनापतीच्या नेतृत्वाखाली फ्रेंचांच्या प्रचंड सेनेशी मुकाबला करीत होती. त्यांची दमछाक करीत होती. फ्रेंच सैन्य जनरल गिऑपला कोंडीत पकडण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होते पण गोरीला युध्दतंत्रानुसार लढणारा हा सेनापती फ्रेंचानाच सतत छळत होता. अखेर १९५४ साली जनरल गिऑप आणि त्याचे मुक्ती सैनिक दिएन बिएन फ्यूच्या डोंगरदरीत एकत्र होणार असल्याची खोटीच बातमी फ्रेंच सेनानींना मिळेल अशी त्यानेच व्यवस्था केली. जनरल गिऑपला आता चांगलेच कोंडीत पकडता येईल या इराद्याने फ्रेंच सेनानींनी आपले सुसज्ज असे प्रचंड सैन्य या दिएन बिएन फ्यूच्या दरीत उतरविले. फ्रेंचांच्या या कारवाईच्या आधीच गिऑपने चीनकडून मिळविलेल्या अनेक तोफा रात्रीच्या अंधारात आणि घनदाट जंगलाच्या पांघरुणाखाली ओढीत आणून फ्युच्या दरीच्या परिसरात डोंगरमाथ्यावर पेरुन ठेवल्या होत्या फ्रेंच सैनिक दरीत

उतरत असतांना या तोफा आणि मुक्त सैनिक सावकाश त्यांचा वेध घेत होते. तोफांची तोंडे खाली वळत होती. कारतलबखानाच्या सैन्याप्रमाणेच फ्रेंच सैन्य दरित पसरुन स्थिरावत असतानांच, दरीच्या चारही बाजूला गुप्ततेने आणि संयमाने लपून बसलेल्या जनरल गेऑपच्या मुक्ती सैनिकांच्या बंदुकी आणि तोफा एका इशाऱ्याबरोबर फ्रेंच सैन्यावर आग ओकू लागल्या . फ्रेंचांची भयंकर प्राणहानी होऊन दणदणीत पराभव झाला. या लढाईत फ्रेंचाचे एकूण बारा हजाराच्या वर सैनिक आणि अधिकारी मारले गेले. दिएन बिएऩ फ्यूच्या या पराभवाने फ्रेंचांच्या व्हिएतनाममधील राजवटीच्या अखेरीची सुरुवात केली होती. उंबरखिंडीखालील घळीत शिवरायांनी कारतलबखानाच्या प्रचंड सैन्याचा असाच धुव्वा उडवला आणि पुण्यात शांतपणे बसलेल्या शाहिस्तेखानाचे धाबे दणाणले. त्याचप्रमाणे कारतलबखानाने कोकणात शिवाजीचा निकाल लावला की कोकणात आपल्याला पुन्हा स्वतंत्रपणे व्यापार करायला मोकळीक मिळेल या आशेने शिवारायांच्या शेवटाची वाट पाहणाऱ्या इंग्रजांनीही धास्ती घेतली होती.शिवराय जर अजून काही वर्ष जीवंत राहीले असते तर इंग्रजांना भारतात पाय रोवणे शक्य झाले नसते.[२५]

**कोकणातील लष्करी कारवाईत शिवरायांचा वैज्ञानिक दृष्टिकोन :-**

छत्रपती शिवरायांनी कोकणात जे स्वराज्याचे शत्रू होते. त्यांचा निकाल लावायचे ठरविले. त्यासाठी त्यांनी नवनविन युध्दतंत्राचा उपयोग केलेला आहे. हे युध्दतंत्र वापरीत असतांना त्यांनी जो वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग केला तो अतिशय वाखण्याजोगा आहे. शिवरायांनी या प्रसंगीही मिळविलेल्या विजयामुळे निर्माण झालेल्या वातावरणाचा पूर्ण फायदा उठविला. कारतलबखानावरील विजयानंतर त्यांनी परिस्थितीचा आढावा घेऊन हादरलेल्या आदिलशाहाला आणि धास्तावलेल्या शाहिस्तेखानाला सावरण्यासाठी लागणाऱ्या वेळेचा फायदा घेऊन सरळ कोकणात धडक मारली. सह्याद्री-पूर्वेकडून त्यांनी मुक्त केला होता आता पश्चिमेकडून म्हणजेच कोकणच्या बाजूनेही तो त्यांना मुक्त करायचा होता. अर्थात कोकणात मुसंडी मारतांना आपली पिछाडी आणि दळणवळणाची रेषा सुरक्षित रहावी म्हणून नेताजी पालकराला त्याच्या पूर्ण

घोडदळासह त्यांनी उंबरखिंडीच्या तोंडाजवळच पहाऱ्याला ठेवले आणि मगच ते खाली कोकणात उतरले. ही त्यांच्या सदैव सावध अशा युध्दतंत्राला धरुन टाकलेलीच पावले होती. शिवरायांच्या युध्दतंत्रातील हे बारकावे अभ्यास करण्यासारखे आहेत. त्यांनी आपली राजगडावरील राजधानी, आपल्या हालचालींचा प्रदेश, आपल्या दळवळणाची साखळी, ही शत्रूच्या केंव्हाही होऊ शकणाऱ्या अकस्मात हल्यांपासून नेहमी सुरक्षित ठेवण्याची दक्षता घेतली होती. जशी उंबरखिंडीत नेताजीला पहाऱ्यावर ठेवण्याची दक्षता घेतली होती तशीच कोकणात दाभोळहून खाली दक्षिणेत जातानाही त्यांनी घेतली. दाभोळलाही दोन हजारांची फौज एका शूर आणि जागृत सरदाराच्या नेतृत्वाखाली ठेवूनच ते संगमेश्वराला आले. त्यांनी संगमेश्वरावर देखरेखीसाठी तानाजी मालुसरे यांना ठेवले.

संगमेश्वरावरुन पुढे खाली राजापूरला जाण्याच्या आधी संगमेश्वराजवळ सह्याद्रीच्या कुशीत दडून बसलेला स्वराज्याचा एक शत्रू त्यांना संपवायचा होता, पण या घोडदौडीत त्याच्यासाठी वेळ वाया घालवणे शिवरायांना परवडणारे नव्हते. श्रृंगारपूरचा सूर्यराव सुर्वे. राजे पन्हाळगडावर अडकले असतांना सिद्दीजोहरच्या सांगण्यावरुन यानेच विशालगडाला वेढा दिला होता. आदिलशहाचे फर्मान येताच राजांच्या विरुध्द सिद्दीजोहराच्या मदतीला गेला.त्याचबरोबर त्याने आदिलशाहीला नेहमी प्रमाणे मदत केली होती. आपले स्थान टिकवण्याचा प्रयत्न त्याने नेहमीप्रमाणे केला होता. खरे म्हणजे संगमेश्वराहून निघून संपवता आले असते. पण आपल्या माणसांना संधी देऊन स्वराज्यात सामील करुन घेण्याचा प्रयत्न त्यांनी नेहमीच केला होता. जावळीच्या मोऱ्यांनाही त्यांनी अशीच संधी दिली होती. त्याच पध्दतीप्रमाणे त्यांनी अशीच संधी दिली होती त्याच पध्दतीप्रमाणे त्यांनी सुर्यराव सुर्वेलाही निरोप पाठविला. आम्ही स्वराज्य निर्मितीच्या अंगिकारलेल्या प्रयत्नांचा एक भाग म्हणून दक्षिण कोकणात जात आहोत. आमच्या गैरहजेरीत तुम्ही या भागात आमच्या वतीने चांगली देखरेख ठेवावी ही सुर्यराव सुर्वेला दिलेली जशी एक संधी होती तशीच मुत्सद्देगिरीची झलकही दिसून येते. आपण दक्षिणेत जाऊन आपली मोहिम पूर्ण करुन येईपर्यंत सुर्व्याने शांत रहावे हा देखील त्या मागाचा एक उद्देश होता. राजापूर - राजापूरच्या इंग्रज अधिकारी रेव्हिंगटनने, शिवराय पन्हाळयाच्या वेढ्यात अडकले असतांना सिद्दी

जोहरला मदत केली होती. लांब पल्ल्याची इंग्रज तोफ सिद्दी जोहरकडे पन्हाळ्याचे बुरुज उडविण्यासाठी धाडली होती. तोफेने ज्यावेळी पन्हाळाच्या बुरुजावर गोळे फेकण्यात आले होते. या तोफेवर इंग्रजांचाच युनियन जॅक फडकत असलेला राजांच्या हेरांनी हेरला होता. राजे त्यानंतर पन्हाळ्याहून सुखरुप राजगडावर आले तेंव्हा त्यानंतर उंबरखिंडी जवळच्या घळीत शाहिस्तेखानाने पाठविलेल्या मोगली सरदारांचा त्यांनी धुव्वा उडवला तेंव्हा आणि आता ते दाभोळ घेऊन संगमेश्वराला पोहचल्याच्या बातम्या त्याच्या कानी पडल्या. रेव्हिंगटनच्या छातीची धडधड वाढून त्यांच्या मस्तकात शाहारे आली होती.तो भयग्रस्त झाला होता.[२६]

शिवरायांनी एका झेपेतच राजापूर गाठले. तेथील इंग्रजांनी वखार आणि गरीब कोकणवासियांना वर्षानुवर्ष लुटून मस्तवाल झालेल्या व्यापाऱ्याची स्वराज्याच्या कार्यासाठी आवश्यक असलेली संपत्ती लुटून आणली आणि त्याबरोबरच पकडून आणले ते राजापूरचे इंग्रज अधिकारी ज्यांच्यात रेव्हिंगटन होताच. शिवरायांची ही धडाकेबाज मोहिम पाहून इतके दिवस शांत असलेला आदिलशहा पुन्हा खडबडून उठला, पण इतक्या लांब सह्याद्रीच्या पलीकडे कोकणात शिवाजीचा बंदोबस्त करायला आता तरी कोणी मातबर सरदार याला नजरेसमोर दिसत नव्हात. शेवटी त्याला आठवला तो श्रृंगारपूरचा सुर्वेच, संगमेश्वरात शिवरायांनी ठेवलेल्या तुकडीवर अचानक हल्ला केला. तुकडीचे नेतृत्व तानाजी मालुसरेकडे होते. सतत सावध आणि जागृत असणाऱ्या शिवरायांचेच प्रतिनिधित्व तो करीत होता. तितकाच सावध आणि जागृत रात्रीच्या वेळी अचानक हल्ला करायला म्हणून आलेल्या सुर्यराव सुर्व्याच्या सैन्यावरच तानाजी हल्ला केला.त्यामुळे सुर्व्याचे सैन्य गोंधळून गेले. त्यांचा पार धुव्वा उडाला आणि दगलबाज सुर्वे जीव घेऊन पळाला. आक्रमण हा प्रतिकाराचा सगळ्यात उत्तम मार्ग आहे हे शिवरायांच्या युध्दतंत्रातील महत्वाचे सूत्र त्यांच्या सेनानींना अवगत होते.त्यामुळे शिवरायांचे युध्द तंत्र यशस्वी होऊन त्यात त्यांना यश मिळाले.

शिवराय राजापूरचे स्वराज्यात विलिनीकरण करुन पुन्हा संगमेश्वराला आले. त्यांनी पुन्हा एकदा श्रृंगारपूरच्या सुर्यराव सुर्वेच्या मराठी मनाला साद घातली. 'मला पालीला येऊन भेटावे'

सुर्व्याने एवढा गंभीर गुन्हा केला असूनही स्वराज्य निर्मितीसाठी माणसे जोडणे महत्वाचे आहे याचा त्यांनी कधीही विसर पडू दिला नव्हता. शिवराय आता पलीकडे निघाले होते. कारण पालीचा जसवंतरावही राजे पन्हाळगडावर अडकले असतांना सिद्दीच्या इशाऱ्यावर नाचून विशालगडाला वेढा घालण्यासाठी सूर्यराव सुर्व्याबरोबर धावला होता. पाली शिवरायांनी लगेच ताब्यात घेतली. पालीजवळचा भक्कम चिरदुर्ग काबीज करुन त्यावर आपले सैनिक ठेवले. स्वराज्यात नव्याने आलेल्या या किल्ल्याचे नाव ठेवले मंडनगड . मंडनगडावरुन त्यानी नजर फेकली ती श्रृंगारपुरावर तेथील सुर्व्याने दगलबाजीचा पुन्हा पुरावा दिला. तो पालीला आला नाही. राजे श्रृंगारपुरावर येऊन धडकले. श्रृंगारपूर काबीज केले. सुर्यराव सुर्वे पुन्हा जीव घेऊन पळाला. २९ एप्रिल १६६१ कोकणचा भाग आपल्या ताब्यात घेऊन स्वराज्याशी दगलबाजी करणाऱ्या सुर्व्यांना मग तो इंग्रज असो, मुसलमान असो वा हिंदू असो, सगळ्यांना योग्य शासन करुन राजांनी आपला दबदबा वाढवला आणि स्वराज्याच्या सीमा पश्चिमेकडूनही सुरक्षित केले. अशाप्रकारे छत्रपती शिवरायांनी स्वराज्याचा साम्राज्य विस्तार करुन स्वराज्याला बळकटी आणली.[२७]

## छत्रपती शिवरायांच्या सैन्य रचनेतील वैज्ञानिक दृष्टिकोन

छत्रपती शिवाजी महाराज एक उत्तम योध्दे होते. त्यांनी आपल्या सैन्याची रचना करतांना जी काळजी घेतली ते वाखाण्यासारखे होते. शिवरायांच्या विजयाचे रहस्य त्यांच्या सैनिकांतील शिस्तीमध्ये होते. आपल्या सैनिकांची रचना करतांना शिवरायांनी तर्कपूर्ण विचार केलेला होता. त्यासाठी त्यांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग केलेला दिसून येतो. राजांनी स्वतः नामानिराळे राहून या दोन शक्ती झुंजत ठेवल्या होत्या. औरंगजेबाने मिर्झाराजाला परतण्याचे आदेश दिले. त्यांच्या जागी शहजादा मुआजमला दक्षिणेचा सुभेदार म्हणून पाठविले. १६६६ च्या अखेरीस संभाजीराजे सुखरुप परतयेताच शिवाय शहाजादा मुआजमशी दोस्ती करुन मोकळे झाले आणि औरंगजेबाचीही या दोस्तीला मान्यता मिळाली. कारण औरंजेबाची ही या दोस्तीला मान्यता मिळाली. कारण औरंगजेब उत्तरेतील कटकटी निस्तरण्यात गुंतला असतांना त्याला दक्षिणेत

शिवरायांची डोकेदुखी नको होती. राजे हे ओळखून होते. स्वराज्याचा खजिना मिर्झाराजाच्या वावटळीत ठिकाण झाला होता. शहजादा मुआजम बरोबरीच्या दोस्तीने पाच हजार मराठयांचे सैनिक संभाजी राजाबरोबर मोगलांच्या वतीने मोगलांच्या खर्चाने वऱ्हाड प्रांताची जबाबदारी सांभाळण्यासाठी तिकडे गेले आणि स्वराज्यावरील खर्चाचा भार कमी झाला. ही शिवरायांची आर्थिक क्षेत्रातील एक दुरदृष्टी होती हे या ठिकाणी दिसून येते.

शिवरायांनी विजापूरकरांकडून आपला भाग मोकळा करुन घेण्यास सुरुवात केली. पोर्तुगीजांच्या आश्रयाने स्वराज्यातील जनतेला छळणाऱ्या कुडाळ, पेडणे, दुचालीच्या देसायांना धडा शिकवला. रांगणा किल्ला जिंकण्यासाठी येणाऱ्या बहलोलखान आणि व्यंकोजी हे रांगण्याला वेढा घालण्यासाठी स्थिरावत असतांनाच अत्यंत वेगवान हालचाली करुन बहलोलखानावर अचानक हल्ला करुन त्याला पिटाळून लावले. पोर्तुगीज प्रजेला त्रास देत असल्याचे पाहून नोव्हेंबर १६६७ मध्ये त्यांच्या बारदेश प्रदेशावर अचानक हल्ला करुन पोर्तुगिजांना चांगलाच धडा शिकवला. अनेक पोर्तुगीज मारले गेले. त्यांनी लगेच तह केला. एप्रिल १६६९ मध्ये जंजिऱ्याला वेढा घालून सिद्दीची चांगलीच नाकेबंदी केली. सिद्दी शरण येण्याच्याच बेतात होता पण याच सुमारास औरंगजेबाने धर्मवेडाने प्रेरित होऊन काशीचे काशी -विश्वराचे, बिंदुमाधवचे, मथुरेचे केशवदेवाचे, तर सोमनाथचेही मंदिर उद्ध्वस्त करुन सगळ्या भारताला हादरा दिला. तसा आदेश औरंगजेबाने ९ एप्रिल १६६९ ला काढला होता. त्याचवेळी हिंदू प्रजेला छळण्यासाठी त्यांच्यावर 'जिझिया' कर लादला आणि आगीत तेल पडले. राजांनी कोणाच्याही धार्मिक भावना दुखावल्या नव्हत्या उलट त्यांचा आदरच केला होता. ते असा धार्मिक अत्याचार सहन करणेच शक्य नव्हते;औरंगजेबाने जंजिऱ्याच्या सिद्दीला राजांच्या विरोधात मदत करुन राजांना डिवचले होते. संभाजीराजे सैन्यासह परत आले आणि राजांनी परिस्थितीचा आढावा घेतला. इतके दिवस त्यांनी प्रजेच्या हिताकडे जसे लक्ष दिले होते तसेच आपल्या सैन्याचीही देखभाल केली होती. नौदलही अद्यावत करण्यासाठी परिश्रम घेतले होते. ९ किंवा १२ पौंडी गोळा फेकणाऱ्या दोन-दोन तोफा असणारे दोन-तीनशे टनी गुराब तसेच दोन ते चार पौंडी गोळा फेकणाऱ्या आठ-आठ तोफा

असलेली सत्तर टनी गलबते बांधून तयार होतीच. सेनादलाची रचना एखाद्या मंदिराच्या आकाराची केली होती. दहा दहा सैनिकांच्या पथकावर नाईक, दहा पथकांवर हवालदार, अशा तीन तीन हवालदारांवर जुमलेदार, दहा जुलेदारांवर हजारी अशा पाच ते सात हजारींवर सात हजारी आणि अशा पाच सात हजारींवर सरनौबत अशा सैन्याच्या रचनेप्रमाणेच २५ घोडेस्वारांवर एक हवालदार मग जुमलेदार हजारी अशा पध्दतीने घोडदळाची ही आखणी केली होती. दर पंचवीस घोडेस्वारांमागे एक पखाली आणि एक नालबंद या पध्दतीने शिवरायांनी सैन्य दलात जबाबदारीची पदे देऊन सैन्यदलाच्या रचनेत विकेंद्रीकरण निर्माण करुन सैन्य व्यवस्थेत शिस्तबध्दपणा आणला.[२८]

छत्रपती शिवरायांनी आपल्या सेना दलातून हत्तींना स्थान दिलेले नव्हते. रणक्षेत्रावर हत्तीवर विसंबून राहिलेल्या भारतीय राजांच्या पराभवाचा इतिहास शिवरायांनी अभ्यासला होता. इतिहासातील चुकांची पुनरावृत्ती टाळण्याचे कार्य या युध्दनेत्याच्या अंगी निश्चितच होते. स्वराज्याच्या संरक्षण व्यवस्थेचे आधारस्तंभ म्हणूनच ते किल्याकडे बघत असत. त्यांच्या जवळील तोफा ते किल्यांच्या रक्षणासाठी वापरत असत. किल्ले जिंकून घेण्यासाठी मात्र ते अंधाराचा योग्य तो उपयोग करुन घेऊन कमीत कमी सैन्याच्या जोरावर किल्ले घेत असत. राजांची गुप्तहेर यंत्रणा अत्यंत प्रभावी होती. बर्हिजी नाईक हा राजांचा गुप्तहेर प्रमुख होता. राजांचे गुप्तहेर हे नजरबाज म्हणून ओळखले जात असत. आणि प्रत्येक मोहिमेच्या वेळी त्यांचे नजरबाज शत्रूकडील बित्तंबातमी तर आणून देत असतच पण त्याचवेळी इतर भागातील घडामोडींवर त्यांचे बारकाने लक्ष असे. 'शत क्रोश भवां वार्ता, हरे देक दिनेनवे ' या शुक्रनितीतील उक्तीप्रमाणे शंभर कोसांवर घडत असलेल्या घटनांच्या वार्ताही त्यांना रोजच्या रोज मिळत असत, त्यासाठी गुप्तहेरांची साखळी सदैव तयार रहात असे. आपल्या सैन्यरचनेची आरमाराची, गुप्तहेर यंत्रणेची पूर्ण सत्यता पडताळून पाहिल्यानंतरच छत्रपती शिवराय प्रत्येक मोहिमेची पध्दतशीर नियोजन करत असत. आणि त्यातून शिवरायांमध्ये असलेला एक महान युध्द नेता आपल्या सेनाप्रमुखांना त्या मोहिमेचे उद्दिष्ट अपेक्षित रणक्षेत्र, शत्रूविषयी मिळालेला तपशिल, आपल्या स्वतःच्या सैन्याची त्यांच्या तयारीची, तसेच या

मोहिमेत वापरली जाणार असलेली युध्दपध्दती, वेळप्रसंगी आवश्यकता असल्यास त्यातील लवचिकपणा, युध्द प्रसंगाची प्रशासन व्यवस्था आणि युध्द प्रसंगी एकमेकांशी संपर्क साधण्याच्या पध्दती या सर्व बाबी तपशिलाने सांगत असे. त्यांच्याशी चर्चा करीत असे. युध्द प्रसंगानंतर मृत सैनिकांच्या आप्तेष्टांचे सांत्वन, जखमींची देखभाल, शूरांचे कौतुक आणि पुरस्कार या गोष्टींकडे ते अगत्याने लक्ष पुरवित असत. म्हणूनच नेत्रदीपक विजयश्री नेहमीच त्यांना साथ देत असे.शिवरायांच्या विजयात सैनिकांचे योगदान महत्त्वपूर्ण ठरले होते.अनेक सैनिकांनी रणमैदानात पराक्रम गाजवून स्वराज्यासाठी लढतांना बलिदान दिले होते.[२९]

## सिंहगड आणि इतर किल्ले जिंकण्यासाठी शिवरायांनी वापरेला वैज्ञानिक दृष्टिकोन

छत्रपती शिवरायांनी आपल्या युध्द पध्दतीत वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग केलेला आहे. विविध किल्ले जिंकत असतांना शिवरायांनी याच पध्दतीचा उपयोग केलेला आहे. सिंहगड किल्ला जिंकत असतांना शिवरायांनी वापरलेला वैज्ञानिक दृष्टिकोन पुढील प्रमाणे आहे. पुरंदराच्या तहाप्रमाणे सिंहगड आणि इतर किल्ले या मधील राजगडाला जवळ असलेला आणि लष्करी हालचालीच्या दृष्टीने महत्व असलेला कोंढाणा जिंकणे महत्वाचे होते, म्हणूनच पहिला हल्ला कोंढाण्यावर, निसर्गाच्या आणि अंधाराच्या आधारे तानाजी मालुसरेंच्या नेतृत्वाखाली ४-५ फेब्रुवारी १६७० च्या रात्री कोंढाणा गडाखाली जमले. दोन चिवट मावळे रात्रीच्या अंधारात गडाचा अत्यंत अवघड कडा ज्या-ज्या ठिकाणी पहाऱ्याची व्यवस्था अगदीच नगण्य होती, असा चढून गेले. वर पोहोचताच, कमरेला बांधून आणलेले दोर त्यांनी वर पहारी खोल खोचून त्यांना बांधले आणि दोराला झटका देऊन खाली इशारा केला. याच दोरांवरुन तानाजी मालुसरे आणि दोनशे निवडक मावळे कडा चढून वर गेले. यांच्यातील एक तुकड़ी ठरल्याप्रमाणे कल्याण दरवाजाकडे निघाली वाटेतील चौक्या मारीत त्यांनी कल्याण दरवाजा गाठला आणि तेथील पहारेकऱ्यांना मारुन त्यांनी कल्याण दरवाजा उघडला. आधीच तेथे येऊन तयार असलेले सूर्याजी, शेलारमामा आणि मावळे सैनिक गडात घुसले सारा कोंडाणा " हर हर महादेव " च्या गर्जनाने दुमदुमून गेला.

गडात उडालेल्या गोंधळाने जागा झालेला किल्लेदार उदयभान हा तयार होऊन ढाल व तलवार घेऊन आपल्या सैनिकांना हाकारे देत मराठ्यांवर धावला. तानाजी मालुसरे त्याच्याच शोधात होते. त्यांनी उदयभानला रोखले. दोन महान योध्दयांचे युध्द सुरु झाले. हातघाईची लढाई झाली आणि त्यात दोघांनीही एकमेकांना प्राणांतिक  जखमा केल्या. दोघेही घायाळ होऊन पडले. गोंधळात भर पडली तो पर्यंत सूर्याजी आणि शेलार मामाची नवीन कुमक येऊन पोहोचली आणि मराठ्यांचे मनोधैर्य वाढले. १२०० राजपुतांच्या रक्षणात असलेला कोंडाणा तासाभराच्या लढाईतच मराठ्यांच्या ताब्यात आला.आधीच ठरल्याप्रमाणे पेटवलेल्या गवताच्या गंजीने राजगडावर आतूरतेने वाट पाहणाऱ्या शिवरायांना यशाचा इशारा मिळाला. ते कोंड्याण्यावर आले. तानाजी मालूसरे हा सिंहासारखा साथीदार मात्र त्यांनी गमावला होता. या भावनेनेच त्यांनी कोंडाण्याचे सिंहगड ठेवले. अचानक हल्ला करुन गड घेण्याच्या तोरण्यावरील रंगीत तालमीचे हे प्रत्यक्ष यश होते. यानंतर मात्र राजांनी आपल्या शूरवीर साथीदारांच्या मदतीने, आलेल्या संधीचा फायदा घेऊन जलद आणि गुप्तहालचाली करुन प्रचंड पराक्रम गाजविला. मोरोपंत पेशेवे, निळोजीपंत, आण्णाजी आदींनी १६७० सालच्या चार महिण्यातच, पुरंदराच्या तहाने मोगलांकडे गेलेले सर्व तेवीस किल्ले जिंकून घेतले. माहूलीवरील हल्ला फसला तर कल्याण-भिवंडी जिंकून घेतली हा त्यांच्या युध्दयोजनेतील लवचिकपणा लक्षात ठेवण्याजोगा आहे. ८ मार्च १६७० ला अशाच एका अचानक घातलेल्या छाप्यात निळोपंत मुझुमदारांनी पुरंदरच हस्तगत केला आणि किल्लेदार शेख राजीउद्दीन याला अटक केली. राजांचे मोगलांच्या प्रदेशात चौफेर हल्ले चालू होते. मोगल आणि मराठे यांच्यातील युध्दाने सारा दक्षिण भारत हादरुन गेला होता.[३०]

शिवरायांच्या युध्दनीतीने त्यांच्या वेगवान आणि गुप्त हालचालींनी मोगलांचे धाबे दणाणले होते. शिवरायांच्या युध्दनीतील वातावरण निर्मितीने योग्य तोच परिणाम साधला होता. केवळ "शिवाजी "या नावानेच मोगली फौजांची पांगापांग होत होती. तो केंव्हा कोठून कसा घाला घालील हा नेमच राहिला नव्हता. तेंव्हाच्या पाश्चात्य अधिकाऱ्यांनी लिहिलेल्या पत्रात शिवाजीचा देह वायुरुप आहे अशी शंका येते. असा उल्लेख आढळतो. शिवाजी आपल्या बाजूला येतो आहे हे

ऐकताच मोगल सरदार पळून जात असत. अहमदनगरपासून १८० मैल पूर्वेला असलेल्या नांदेडचा फौजदार फतेजंग असाच पळून गेला तेंव्हा औरंगजेबाने त्याची जंग ही पदवी काढून टाकली आणि त्याचा फत्तेखान करुन टाकला. ज्या माहूलीच्या किल्लेदाराने शिवरायांच्या पहिल्या हल्याला एखाद्या वीराप्रमाणे तोंड देऊन तो हल्ला परतवून लावला होता तोच माहूलीचा शूर किल्लेदार मनोहरदास आता शिवाजी या नावानेच इतका हादरला होता की, आता त्याला औरंगजेबाकडून दाऊदखानासारख्या सरदाराबरोबर नवीन कुमक येऊनही, किल्ला दाऊदखानाच्या ताब्यात देऊन तो पळून गेला. पावसाळा आता सुरु झाला होता. तीस तीस हजाराची फौज घेऊन वेगवान हालचाली करणारा शिवाजी आता तरी गप्प बसेल अशी मोगल सरदारांना आशा वाटत होती. पण इतके दिवस सह्याद्रीची आणि अंधाराची साथ घेऊन हालचाली करणाऱ्या शिवरायाला आता तुफान पावसाचीही साथ मिळत होती. त्यांनी मोगलांच्या आशा धुळीला मिळविण्यासाठी पहिला दणका दिला, १५ जून १६७० ला हिंडोळ्याचा किल्ला घेऊनच आणि लगेच दुसऱ्याच दिवशी हल्ला केला तो अवघड अशा माहूलीच्या किल्यावर आणि एका झटक्यात तो ताब्यात घेतला. इतक्या पावसात शिवरायांचे सैनिक आपल्या किल्यावर हल्ला करतील हे मोगलांना स्वप्नातही वाटले नव्हते. दाऊदखान तर केंव्हाच किल्ला सोडून गेला होता. संपूर्ण दक्षिण भारत राजांचे एक प्रचंड रणक्षेत्र झालेले होते. मोगलांच्या ताब्यात असलेल्या त्या रणक्षेत्रावर हा रणराज एखाद्या महान जेत्याप्रमाणे अनिर्बंधपणे विजयी पताका घेऊन वावरत होता. म्हणूनच त्या काळच्या महान युध्दनेत्यांमध्ये त्याची गणना केली जात होती. नंतरच्या पाश्चात्य इतिहासकारानी तर त्याची तुलना नेपोलियन आणि अलेक्झांडर यांच्याशी केली होती. दुर्दैवाने त्यांनी जिंकलेला भूप्रदेश त्यांच्या ह्यातीतच त्यांच्या हातून निघून गेला होता. पण शिवरायांनी जिंकलेल्या भूप्रदेशावर त्यांनी लावलेल्या स्वराज्याच्या रोपट्याचा प्रचंड वृक्ष निर्माण झाला होता. इतकी त्या रोपाची पाळे मुळे पक्की होती. शिवाजी राजे युध्द तंत्रामध्ये प्राविण्य प्राप्त केले होते.त्यांनी युध्दाच्या पार्श्वभूमीवर घेतलेले अनेक निर्णय अत्यंत अचूक होते.युध्दासाठी रणमैदानाची निवड शत्रूपक्षाची शक्तीस्थाने आणि दुर्बलस्थाने शिवरायांनी

उत्तम रितीने हेरलेले होते.कारण त्यांचे हेरखाते अत्यंत कार्यक्षम होते.म्हणूनच शिवराय अनेक संकटातून सहिसलामत बाहेर पडून यशस्वी झाले.[३१]

**छत्रपती शिवाजी महाराजांची युध्दनीती आणि व्हिएतनाम X अमेरिका युध्द**

परकीय लोकांनी छत्रपती शिवाजी महाराज आणि मराठा सैन्याबद्दल अनेक नोंदी केल्या आहेत...

छत्रपती शिवाजी महाराज खुद्द लष्करी मोहिमेत भाग घेत असत त्यावेळी ते अतिशय साधेपणाने राहत आणि वागत असून, सुरत मोहिम व कर्नाटक मोहिमेत अनेक युरोपीय लोकांनी छत्रपती शिवाजी महाराजांना पाहिले होते. या परकीय लोकांनी छत्रपती शिवाजी महाराज आणि मराठा सैन्याबद्दल आपल्या डायरीत अनेक नोंदी केलेल्या आहेत.

फ्रेंच गव्हर्नर मार्टिन लिहितो, महाराजांच्या सैन्यात फारसे सामानसुमान नव्हते अथवा स्त्रियाही नव्हत्या. मराठा फौजेत फारसा तोफखानाही नव्हता त्यामुळे त्यांना आपल्या फौजेच्या चपळ हालचाली करणे शक्य होत असे आणि शत्रूस सावध होण्यास व लढण्यासाठी सिध्द होण्यास अवधी मिळत नसे.

डॉ. फेअर हा युरोपीयन मराठा सैन्याबद्दल नोंद करतो, गाणे बजावणे, पोशाखाचा भपका, ऐट इत्यादीपासून मराठे अलिप्त असतात. कष्टमय जीवन, वेगाने दौड करण्याची सवय आणि सुखाकडे दुर्लक्ष या कारणामुळे शिवाजीचे हे लोक लष्करी पराक्रम करण्यात अधिक लायक आहेत. डॉ. फ्रायर हा युरोपियन प्रवासी मराठा लष्कराबद्दल लिहितो, शिवाजीच्या सैनिकांना हाल अपेष्टांची सवय होती ते सुखाशीन बनलेले नव्हते त्यामुळे कोणत्याही साहसी आक्रमणाला ते कायम तयार असत. सुरत मोहिमेच्या दरम्यान तर छत्रपती शिवाजी महाराज एका झाडाच्या सावलीत उभे राहून मोहिमेचे नियोजन करत होते अशी नोंद आढळते. मराठा लष्कर किती सक्षम आणि प्रभावी होते.हे या ठिकाणी आपल्याला दिसून येते.

व्हिएतनाम आणि अमेरिका यांच्यामध्ये सलग २० वर्ष युध्द सुरु होते. सुरुवातीला अमेरिकेला वाटले होते की, या देशाला नष्ट करणे म्हणजे जेमतेम काही तासांचे काम परंतू प्रत्यक्षात अमेरिकेला व्हिएतनामशी युध्द करणे जडच गेले. त्याला अनेक कारणे आहेत. मात्र त्यातील सर्वात महत्वाचे कारण असे आहे की, व्हिएतनामी जनतेच्या नायकपदी विराजमान होते. 'छत्रपती शिवाजी महाराज' व्हिएतनाममधून अमेरिका बाहेर पडली आणि व्हिएतनामचा विजय झाला. त्यावेळी व्हिएतनामच्या राष्ट्रपतींना पत्रकारांनी विचाराले की, अमेरिकेसारख्या बलाढ्या शक्तीला नामोहोरम करण्यात तुम्ही कसे सफल झालात? त्यावेळी राष्ट्रपतींनी म्हटले होते की, अमेरिकेला हरवणे हे नि : संशयपणे आमच्या कुवतीबाहेरचे होते, परंतु आम्ही हिंमत सोडली नाही. राष्ट्रपती सांगतात, त्याचवेळी भारतातातील एक शूरवीर राजाचे चरित्र माझ्या हाती आले. त्यावरुन प्रेरणा घेऊन मी आमची युध्दनीती आखली आणि ती कसोशीने अमलात आणली. त्याचा परिणाम काहीच दिवसांत आम्हाला दिसला. पत्रकारांनी त्या राजाचे नाव विचारताच राष्ट्रपती सहजपणे पटकन बोलून गेले. छत्रपती शिवाजी महाराज ते जर आमच्या भूमीवर जन्माला आले असते तर आम्ही जगावर राज्य केले असते काही काळानंतर व्हिएतनामाचे राष्ट्रपती मरण पावले. त्यांच्या मृत्यूपत्रात त्यांनी लिहून ठेवले होते की, माझ्या समाधीवर एक वाक्य अवश्य लिहा ' छत्रपती शिवाजी महाराजांचा एक सैनिक समाधिस्त झाला '. आजही त्यांच्या समाधीवर हे वाक्य वाचायला मिळते.शिवाजी महाराजांच्या गनिमीकावा या युध्द नितीचा वापर व्हिएतनाम या राष्ट्रांने केला होता. म्हणूनच ते त्या ठिकाणी यशस्वी झाले.

काही काळानंतर व्हिएतनामच्या परराष्ट्रमंत्री भारताच्या दौऱ्यावर आल्या. आपल्या राजकीय रिवाजानुसार त्यांना लाल किल्ला आणि महात्मा गांधी समाधी दाखवण्यात आली. त्यावर त्यांनी विचारले की, शिवाजी महाराजांची समाधी कुठे आहे? बरोबरचे भारत सरकारचे अधिकारी गप्पच झाले. आजपर्यंत असा प्रश्न त्यांना कोणी विचारला नव्हता . व्हिएतनाम पराष्ट्रमंत्र्याबरोबर जे त्यांचे इतर अधिकारी आलेले होते. त्यांनीच सांगितले की, छत्रपतीची समाधी महाराष्ट्रात रायगड येथे आहे. व्हिएतनामी पराष्ट्रमंत्री महोदया इतके ऐकून थांबल्या नाहीत त्यांनी छत्रपतींच्या

समाधीला वंदन करण्याची इच्छा व्यक्त केली. ज्या व्यक्तीपासून प्रेरणा घेऊन आम्ही अमेरिकेसारख्या देशाला नमवले त्यांना वंदन केल्याशिवाय मी स्वदेशी परत जाऊ शकत नाही. असे म्हणून त्या रायगडाला गेल्या. महाराजांच्या समाधीचे डोळे भरुन दर्शन घेतले. ओल्या डोळ्यांनी त्यांनी तिथली माती उचलली ती आपल्या बॅगेमध्ये भरली आणि कपाळाला लावली. परराष्ट्र मंत्रालयाचे अधिकारी आश्चर्यचकित झाले होते.शिवाजी महाराजांवरील त्यांची श्रध्दा पाहून त्यांना वाटले एखादा भक्त जणू या मंदिरात आपल्या देवतेची पूजा करण्यासाठी खास आला आहे. पत्रकारांनी त्यांना याबद्दल छेडले असता, मंत्री महोदया म्हणाल्या की, ही माती शूरवीरांची माती आहे. या मातीत शिवरायासारखा महान चारित्र्यवान शूर लढवय्याचा जन्म झाला ही माती मी माझ्या देशात नेऊन तिथल्या मातीत मिसळेन म्हणजे व्हिएतनामच्या भूमीवरही छत्रपती शिवाजी सारखा राजा जन्माला येईल. बऱ्याच काळानंतर सशक्त भारत नावाच्या मासिकाने नोव्हेंबर २०१३ च्या अंकात वरील घटना प्रसिध्द केली. वाचून सगळेच आश्चर्यात पडले आणि छत्रपतीपासून प्रेरणा घेऊन अनेक देशांनी आपला इतिहास घडवला. या गोष्टीचा प्रत्येक भारतीयाला अभिमानही वाटला.

व्हिएतनामसारख्या अगदी छोट्या नगन्य देशाने अमेरिकेला धूळ चारावी, हा खरोखरच एक चमत्कारच आहे. दक्षिणपूर्व आशियातील हा लहानसा देश आपल्या स्वतंत्र अस्तित्वासाठी वर्षानुवर्ष लढत राहिला. अमेरिका अणवस्त्रधारी देश होता. व्हिएतनामला भस्मसात करणे अमेरिकेच्या डाव्या हातचा खेळ होता परंतु असे घडले नाही. पहिल्या आणि दुसऱ्या महायुध्दातील विजयी देश व्हिएतनामसमोर टिकू शकला नाही. अमेरिकेच्या शक्तिसंपन्न राष्ट्रपतींना व्हिएतनामसमोर गुडघे टेकावे लागले. अमेरिकेने हल्ला करताच व्हिएतनामी गोरिला सैनिक नक्की कुठे लपून बसतात हे शोधून काढणे अमेरिकेच्या सैन्याला जमले नाही. व्हिएतनामी गोरिल्लांना शोधून काढण्यासाठी अमेरिकेजवळ अत्यंत प्रभावी यंत्रसाम्रगी होती, पण या अत्यंत संवेदनशील यंत्रानाही व्हिएतनामी गोरिल्लानी भीक घातली नाही. व्हिएतनामी युध्दावर अनेक पुस्तके प्रकाशित झाली आहेत. त्यातून मूठभर व्हिएतनामींनी बलाढ्य अमेरिकेच्या नाकात कसा दम आणला

याच्या कथा वाचायला मिळतात. अखेर व्हिएतनामचे विभाजन करणे अमेरिकेला अशक्य झाले. या छोट्याशा देशापूढे नमते घ्यावे लागले. व्हिएनामींची स्वातंत्र्याची उर्मी अणुबाम्बही नष्ट करु शकत नाही हे अमेरिकेला कळून चुकले. यातील योगायोगाची गोष्ट अशी की, छत्रपती शिवाजी महाराज मोगलांना याच पध्दतीने सतत फसवत आले तेच धोरण व्हिएतनामी सैनिकांनी अवलंबले होते. त्याबद्दलची काही उदाहरणे तर अत्यंत रोमहर्षक आहेत. अमेरिकेची सर्वात मोठी डोकेदुखी ही होती की, व्हिएतनामी गोरिल्ला जंगलात कुठे लपून बसले आहेत हेच त्यांना समजत नसे. त्यांची यंत्रसामग्रीही उपयोगी ठरत नव्हती. अखेर अमेरिकेच्या सीआयएने आपल्या शस्त्रज्ञाना असे एखादे जबरदस्त यंत्र बनवण्याचे आवाहन केले. ज्यामुळे व्हिएतनामी सैनिकांचा पत्ता लागेल. अमेरिकेच्या लष्कराशी सबंधित शास्त्रज्ञांनी विचार करायला सुरुवात केली त्यांच्या मनात विचार आला की, सैनिक भलेही कुठेही लपून बसू देत परंतु मल-मूत्र उत्सर्जनाची भावना प्रत्येक माणसाला असतेच म्हणून त्यांनी मूत्रामधील रासायनिक तत्वांवर आधारित असे सिग्नल तयार केले. ज्यामुळे मूत्र विसर्जनाची जागा सापडेल. त्या क्षेत्रात दिवे उजळल्याबरोबर अमेरिकेन सैनिक तेथे पोहोचत आणि बॉम्ब टाकून हल्ला करत अशा पध्दतीने अनेक गोरिल्लांना ठार करण्यात अमेरिकेला यश आले. काही काळातच गोरिल्लांना ही गोष्ट लक्षात आली. या प्रकारच्या हल्याला प्रत्युत्तर देण्यासाठी व्हिएतनामी सैनिकांनी नामी युक्ती शोधून काढली आधीच पण प्रभावी आता हे सैनिक एका मातीच्या मोठ्या हंड्यात मुत्र विसर्जन करायला लागले आणि तो हंडा झाडावर टांगून ठेवू लागले त्याचा परिणाम म्हणजे अमेरिकन सैनिकांना अनेक ठिकाणाहून एकाच वेळी सततच सिग्नल यायला लागले. अमेरिका अक्षरक्षः भांबावून गेली आणि काही दिवसात ही कारवाई बंद पडली.छत्रपतीच्या युध्दतंत्रातील बारकावे अभ्यासून छोट्या व्हिएतनामने बलाढ्य अमेरिकेला नामोहरम केले.[३२]

## संदर्भ ग्रंथ


| | | | |
|---|---|---|---|
| १. | कॅ.राजा लिमये | - | रणराज शिवाजी दिलिपराज प्रकाशन प्रा.लि. पुणे द्वितीय आवृत्ती (सुधारित आवृत्ती) १५ सप्टेंबर २००२,पृष्ठ - २४ |
| २. | पूर्वोक्त | - | पृष्ठ - २६ |
| ३. | सेतू माधवराव पगडी | - | छत्रपती शिवाजी 'नॅशनल बुक' ट्रस्ट इंडिया नवी दिल्ली पहिली आवृत्ती १९८९ पृष्ठ -१०३ |
| ४. | गोविंद सखाराम सरदेसाई मुख्य संपादक स.मा.गर्गे | - | मराठी रियासत खंड-१ शहाजीराजे भोसले, शककर्ता शिवाजी पॉप्युलर प्रकाशन मुंबई दुसरे पुनर्मुद्रण जानेवारी २०११ पृष्ठ क्रमांक - १७५ |
| ५. | कै. न्यायमूर्ती महादेव रानडे अनु. नरहर रघुनाथ फाटक | - | मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष Rise of the Maratha Power साहित्य आणि संस्कृती मंडळ, महाराष्ट्र राज्य पृष्ठ क्रमांक ११८ |
| ६. | गोविंद पानसरे | - | शिवाजी कोण होता ? लोकवाड्.मय गृह मुंबई पहिली आवृत्ती एप्रिल १९८८ पृष्ठ क्रमांक - ३७ |
| ७. | संपादक अ.रा.कुलकर्णी ग.ह. खरे | - | मराठ्यांचा इतिहास खंड - १ कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे प्रथमावृत्ती १९८४ पृष्ठ - १४४ |
| ८. | श्रीमंत कोकाटे | - | विश्ववंद्य छत्रपती शिवाजी महाराज (शिवचरित्र) जिजाई प्रकाशन पुणे प्रथमावृत्ती १९ फेब्रुवारी २००१ पृष्ठ क्रमांक - २८ |

९. नरहर कुरुंदकर - छत्रपती शिवाजी महाराज जीवन रहस्य इंद्रायणी साहित्य प्रकाशन पुणे - ३० प्रथमावृत्ती १५ ऑगस्ट २००३ पृष्ठ क्र. ४३

१०. अ.रा. कुलकर्णी - अशी होती शिवशाही राजहंस प्रकाशन प्रा.लि.पुणे प्रथमावृत्ती १८ मार्च १९९९ पृष्ठ क्रमांक ४५

११. प्रबोधनकार ठाकरे - दगलबाज शिवाजी नवता बुक वर्ल्ड ६०२ आदित्य अपार्टमेंट आशानगर कांदिवली (पुर्व) मुंबई पहिली आवृत्ती १९२६ पुनर्मुद्रण नोव्हेंबर २०१५,पृष्ठ क्रमांक २९

१२. अ.रा.कुलकर्णी - शिवकालीन महाराष्ट्र राजहंस प्रकाशन प्रा.लि.पुणे प्रथमावृत्ती १९९९ पृष्ठ क्रमांक १०४

१३. डॉ. ज्ञानेश्वर जाधव - छत्रपती शिवाजी महाराज अक्षर पब्लिकेशन औरंगाबाद प्रथमावृत्ती ऑक्टोबर २०११ पृष्ठ क्रमांक ११२

१४. सेतू माधवराव पगडी - छत्रपती शिवाजी नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया नवी दिल्ली पहिली आवृत्ती १९८९ पृष्ठ क्रमांक १०६

१५. कॅ. राजा लिमये - रणराज शिवाजी दिलिपराज प्रकाशन प्रा.लि. पुणे द्वितीय आवृत्ती १५ सप्टेंबर २००२ पृष्ठ क्रमांक २६

१६. गोविंद सखाराम सरदेसाई मुख्य संपादक स.मा.गर्गे - मराठी रियासत खंड -१ शहाजीराजे भासले शककर्ता शिवाजी पॉप्युलर प्रकाशन मुंबई दुसरे पुनर्मुद्रण जानेवारी २०११ पृष्ठ क्रमांक २०८

१७. संपादक अ.रा.कुलकर्णी ग.ह. खरे - मराठ्यांचा इतिहास खंड -१ कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे, प्रथमावृत्ती १९८४, पृष्ठ क्रमांक २५७

१८. घाणेकर प्र.के. - साद सह्याद्रीची/भटकंती किल्ल्यांची स्नेहल प्रकाशन पुणे, द्वितीय आवृत्ती मे. १९८८ पृष्ठ २१९

१९. डॉ. द.ग. देशपांडे - महाराष्ट्रातील किल्ले डायमंड पब्लिकेशन्स पुणे प्रथमावृत्ती २९ ऑक्टोबर २००९ पृष्ठ क्रमांक १३०

२०. कॅ.राजा लिमये - रणराज शिवाजी दिलीपराज प्रकाशन प्रा.लि. पुणे द्वितीय आवृत्ती (सुधारित आवृत्ती ) १५ सप्टेंबर २००२ पृष्ठ क्रमांक -११३

२१. पूर्वोक्त - पृष्ठ क्रमांक -१३६

२२. पूर्वोक्त - पृष्ठ क्रमांक -१३८

२३. गोविंद सखाराम सरदेसाई मुख्य संपादक स.मा.गर्गे - मराठी रियासत खंड -१ शहाजी राजे भोसले, शककर्ता शिवाजी पॉप्युलर प्रकाशन मुंबई दुसरे पुनर्मुद्रण जानेवारी २०११ पृष्ठ क्रमांक -१८६

२४. पूर्वोक्त - पृष्ठ क्रमांक -१८८

| | | | |
|---|---|---|---|
| २५. | पुरुषोत्तम खेडेकर | - | लोकराजे शिवराय जिजाऊ प्रकाशन पुणे प्रथमावृत्ती २०१० पुनर्मुद्रण २०१२ पृष्ठ क्रमांक ६५ |
| २६. | त्र्यंबक शंकर शेजवलकर | - | श्री.शिवछत्रपती संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना आराखडा व साधने, मराठा प्रकाशन डॉ.नायर रोड मुंबई पृष्ठ २०२ |
| २७. | पूर्वोक्त | - | पृष्ठ क्रमांक २०४ |
| २८. | डॉ.गिरीश प. जाखोटिया | - | छत्रपती शिवाजी महाराज व्यवस्थापन गुरू आणि व्यूहरचनाकार,साकेत प्रकाशन पुणे,तिसरी आवृत्ती ऑक्टोबर २०१४,पृष्ठ क्र.१९६ |
| २९. | पूर्वोक्त | - | पृष्ठ क्रमांक १९७ |
| ३०. | डॉ.जयसिंगराव पवार | - | छत्रपती शिवाजी महाराज अरुंधती प्रकाशन कोल्हापूर शके (१९०२) सन १९८० पृष्ठ २०६ |
| ३१. | पूर्वोक्त | - | पृष्ठ क्रमांक २०७ |
| ३२. | मुझफ्फर हुसेन | - | दै.पुण्यनगरी, मंगळवार, १७ डिसेंबर २०१३ पृष्ठ - ०४ |

# प्रकरण - पाचवे

# "आर्थिक, सामाजिक आणि धार्मिक क्षेत्रातील वैज्ञानिक दृष्टिकोन "

## आर्थिक क्षेत्रातील वैज्ञानिक दृष्टिकोन

छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वराज्याची स्थापना केली. फक्त स्वराज्य स्थापना करुन ते थांबले नाहीत तर स्वराज्याचे सुराज्यात रुपांतर केले. त्यासाठी त्यांनी आर्थिक क्षेत्रात आमूलाग्र असा बदल घडवून आणला. मानवी जीवनाच्या दैनंदिन व्यवहारातील अतिशय महत्वाचा घटक म्हणजे आर्थिक घटक होय. आर्थिक घटक जर मजबूत असेल तर मानवाचे जीवन सुखी, समाधानी आणि आनंदी होईल, तो आनंदी जीवन जगेल तो व्यक्ती जर आर्थिक दृष्ट्या कमकुवत असेल तर तो स्वराज्य उभारणीत योगदान देऊ शकणार नाही ही जाणीव शिवरायांना होती. म्हणून त्यांना रयतेच्या आर्थिक विकासाकडे लक्ष दिले. स्वराज्यातील प्रत्येक व्यक्तीच्या हाताला काम मिळाले पाहिजे हे काम देत असतांना त्यांची जात न बघता त्याचे गुण पाहिले. गुणवत्ता हा निकष स्वराज्यात अमलात आणला.शिवरायांने आपल्या वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या आधारे सर्व समाज घटकांना समान न्याय दिला.[१]

## मध्ययुगीन काळातील आर्थिक परिस्थिती

छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळात आर्थिक परिस्थिती कशी होती ? याचा विचार करीत असतांना छत्रपती शिवाजी महाराज ज्या मध्ययुगीन काळात होऊन गेले. त्या मध्ययुगीन काळातील आर्थिक परिस्थीतीचा अभ्यास करणे क्रमप्राप्त आहे.

सुलतानशाही आणि मुगल काळात भारतीयांची आर्थिक स्थिती कशा प्रकारची होती त्याविषयी अधिकृत माहिती मिळत नाही.बाबरची मुलगी गुलबदनने 'हुयायूननामा ' लिहिला त्यात भारतात धान्य स्वस्त असल्याचा ती उल्लेख करते. राणा वीरसालच्या अमरकोट येथे (जेथे

अकबराचा जन्म झाला) एका रुपयाला चार बकरे मिळत असल्याचा ती उल्लेख करते. अशा त्रोटक माहितीवरुन तत्कालीन भारतीयांच्या आर्थिक परिस्थिती विषयी स्पष्ट कल्पना येत नाही. अबुल फझलच्या ऐने अकबरीत मात्र जीवनावश्यक वस्तूंचे दर दिले आहेत त्यावरुन व तत्कालीन मजुरांच्या उत्पन्नावरुन त्यावेळच्या भारतीयांच्या आर्थिक स्थितीची आपण ढोबळ कल्पना करु शकतो. ऐने अकबरीतील भाव पुढील तक्त्यात दर्शविलेले आहेत.

| अ.क्र. | वस्तु | दर (दाम) |
|---|---|---|
| ०१ | गहू | १२ |
| ०२ | बार्ली | ०४ |
| ०३ | ज्वारी | १० |
| ०४ | तूप | १०५ |
| ०५ | बाजरी | ८८ |
| ०६ | तेल | ०८ |
| ०७ | दुध | २५ |
| ०८ | पांढरी साखर | १८८ |

वरिल तक्त्यात दर्शविल्या प्रमाणे त्याकाळातील विविध वस्तूचे भाव दिसून येतात. त्यातून आपल्याला त्याकाळातील आर्थिक स्थितिची कल्पना येते. अकबराच्या काळात एक मण हा ५५.५ पौंडाचा म्हणजे सुमारे २४ किलोचा होता. वस्तूंचा किंमती कमी असल्यामुळे लोकांचे जीवनमान सुखी होते. असे समजण्याचे काही कारण नाही. कारण लोकांचे उत्पन्नही तोकडे होते. अकुशल कामगाराला एक दिवसाची २ दाम किंवा १/२० रुपये इतकी अल्पमजुरी मिळे. त्यातही त्याला किमान दहा तास अविश्रांत श्रम करावे लागत कुशल कामगाराला दिवसाची ७ दाम मजूरी मिळे शिवाय दररोज प्रत्येकाला काम मिळेलच याची शाश्वती नसे. वर्षातून २०० दिवस काम मिळाले

तर कामगाराला आकाश ठेंगणे झाल्यासारखे वाटे. व्ही.ए. स्मिथ आणि मौरलॅंड या इतिहासकारांच्या मते त्या काळात इतकी स्वस्ताई होती की, आजच्यापेक्षा त्याकाळी मजूर सुखी होते, परंतु दोघांचे हे विधान एकागी वाटते. त्या काळातील तुलनेत आज वस्तूंचे भाव ज्याप्रमाणात वाढले त्या प्रमाणात मजुरीचे दर कितीतरी वाढलेले दिसतात. शिवाय कामाचे तासही कमी झालेले दिसतात. एक गोष्ट स्पष्ट आहे की, कामगारांना खाण्याची कमतरता नसली तरी त्यांच्या मजुरीतून त्यांच्या इतर जीवनावश्यक वस्तुंची पूर्तता होणे केवळ अशक्य होते. शिवाय त्यांनी कित्येकदा वेठबिगारीही करावी लागे. अनेक लढाया तसेच दुष्काळ आणि इतर नैसर्गिक आपत्ती यामुळे त्याकाळातील रयत व मजुरांची परिस्थिती हलाखिची झाली होती.[२]

**मध्ययुगीन काळातील चलन :-**

शेरशहाने जूनी चलन व्यवस्था बदलून ' दाम ' नावाचे नवे चलन सुरु केले. दाम हे तांब्याचे नाणे असून त्याचे वजन ३११ ते ३२२ ग्रॅम दरम्यान असे.

४० दामाचा एक रुपया होत असे. त्याचे वजन ५ टंका म्हणजे एक तोळा, ८ मासे व ७ गुंज इतके असे. हा रुपया शेरशहाने चलनात आणला. सर्वसामान्य माणसाच्या व्यवहारात दाम या चलनाचाच वापर होत असे. रुपया त्यांच्या दृष्टीलाही पडत नसे. राज्याचा महसूल हा दाममध्येच मोजला जाई. अकबराच्या मृत्यूनंतर ही रुपया या चलनात विशेष फरक झाला नाही. रुपयात १७५ ग्रेन इतकी चांदी असे. ४० दाम बरोबर एक रुपया हे प्रमाण १६१६ पर्यंत कायम होते. १६२७ पासून १ रु बरोबर ३० दाम हे प्रमाण सुरु झाले निरनिराळ्या वजनाची व किंमतीची रुपयाची नाणी असली तरी प्रमाणित रुपयातच व्यवहार होत असे. पाश्चात्य प्रवाशांच्या प्रवास वर्णणानुसार रुपया हा शुध्द चांदीचा होता.चलनात त्याचा वापर होत असे.[३]

## कृषी :-

भारत हा पूर्वीपासून कृषीप्रधान देश राहिलेला आहे.शेती हा भारत देशाच्या उत्पन्नाचा मुख्य कणा होता. या काळातील कृषिव्यवस्थेवर प्रकाश टाकतांना डॉ. आशिर्वादीलाल म्हणतात. "भूमीची सुपिकता, पर्याप्त पर्जन्य दीर्घकाळापासून चालत आलेली सिंचन व्यवस्थाआणि कृषीवलांचे परिश्रम यामुळे देशात धनधान्याचे इतके उत्पन्न होई की, या देशातील सर्वसामान्य जनतेच्या अन्नधान्याच्या गरजा भागल्यानंतरही अन्नधान्याचा भरपूर साठा शिल्लक राहत असे. त्यामुळे परदेशात धान्याची निर्यात होई". मोठ्या प्रमाणात होणारी शेती उत्पादन आणि जीवनावश्यक वस्तूंच स्वस्त होत्या.सामान्य व्यक्ती खाऊन पिऊन सुखी होता. डाळी, मका, गहू, तांदूळ, जव, बाजरी, तीळ, उस, कापूस ही मुख्य पिके होती. डॉ. अशरफ म्हणतात, ' मध्ययुगीन भारतात शेतीत उत्पन्न होणारे धान्य आणि आधुनिक भारतात उत्पन्न होणारे धान्य यात तंबाखू, चहा, कॉफी, इ. आधुनिक पिकांचा अपवाद वगळता विशेष फरक नव्हता.' ते म्हणतात की, अलाहाबाद आणि त्याच्या बाजूची जमीन इतकी सुपीक होती की या परिसरात गहू, तांदुळ आणि उसाचे भरघोस उत्पन्न होई. या क्षेत्रातून मोठ्या प्रमाणात धान्य दिल्लीला पाठवले जातअसे.अशा पध्दतीने भारत हा संपूर्ण जगात कृषीप्रधान देश म्हणून ओळखला जात होता.[४]

परकीय यात्रेकरु प्लेसर्टच्या मते भारतात एका वर्षात खरीप व रबी अशी दोन पिके घेतली जात. तांदूळ, नीळ, बाजरी, उडीद, मूग ही खरिपाची तर गहू, जव, चणा आणि गळीत धान्ये ही रबीची पिके होती. त्यांच्या मते यमुनेच्या काठावरील मैदाने आणि मध्यभारतात नीळ उत्पादन फार मोठ्या प्रमाणात होई. खाफीखानाच्या कथनानुसार दक्षिणेत ज्वारी व बाजरी  तेलंगणामध्ये तांदळाचे उत्पादन मोठ्या प्रमाणात होई. अत्याधुनिक अवजारे सोडली तर तत्कालीन व आधुनिक शेती अवजारांमध्ये विशेष फरक नव्हता.शेती क्षेत्रात परंपरागत अवजारांचा उपयोग केला जात होता.

## उद्योगधंदे :-

मध्ययुगीन काळात कृषी हे जरी बहुतांश लोकांचे उदारनिर्वाहाचे साधन असले तरी या काळात शहरी व ग्रामीण भागात काही उद्योगांनी मूळ धरले होते. हे उद्योग दोन प्रकारचे होते. एक म्हणजे राजाद्वारे संचलित आणि दुसरे म्हणजे व्यक्तीद्वारे संचलित खाजगी उद्योग होते.उद्योग धंद्याच्या माध्यमातून काही खेडी परिपूर्ण होतांना दिसून येतात.[५]

## शिवपूर्वकाळातील आर्थिक स्थिती :

## (शिवाजी महाराजांपूर्वी महाराष्ट्रातील आर्थिक स्थिती)

छत्रपती शिवाजी महाराजांपूर्वी महाराष्ट्राची ' आर्थिक स्थिती ' अत्यंत बिकट होती. इथले दारिद्र्य मराठी माणसाच्या पाचवीलाच पुजलेले होते. महाराष्ट्राच्या भूगोलानेही येथील अर्थव्यवस्थेवर अन्याय केलेला होता. कारण इथला प्रदेश डोंगरदऱ्यांनी व्यापलेला होता. प्रमुख नद्यांच्या खोऱ्यात थोडी सुपीक जमीन असली तरीही महाराष्ट्राची बहुतांशी जमीन माळरान, नापीक व हलक्या प्रतीची होती. पश्चिमेकडच्या कोकणात भरपूर पाऊस असला तरी उर्वरीत महाराष्ट्रात त्याचे प्रमाण अत्यल्प होते. येथील कोरडवाहू शेती पावसावर अवलंबून असल्याने अस्मानी संकट कायमचेच होते. आदिलशाही मोगलांची परकीय सुरक्षा असल्याने त्यांची सतत आक्रमणे होत आणि त्यावेळी शत्रूसैन्यामुळे उभ्या पिकांची नासाडी होत असे. तत्कालीन शासन व्यवस्थेकडून दुष्काळातही शेतकऱ्यांकडून जबर शेतसारा जुलमी पध्दतीने वसुल करीत. त्यांना शेतसाऱ्यात केंव्हाही सुट मिळत नव्हती. मराठी समाजात अठरापगड जातींचे लोक होते. ते बहुतांशी ग्रामीण भागात राहत होते. शेतीवर आधारीत आपल्या महाराष्ट्रामध्ये बार बलुतेदार आणि अठरा अलुतेदारची प्रथा होती. लोहार, सुतार, कुंभार, चांभार, महार, माळी, बुरुड, तेली, विणकर, रंगारी, कोळी, सोनार, धोबी शिंपी इ. व्यावसायिक खेड्यात राहत होते.त्यांचा उदरनिर्वाह हा शेतीवर अवलंबून होता.

बारा बलुतेदार व आलुतेदार यांचे व्यवसाय हे शेतीवर आधारीत होते. त्यामुळे ग्रामीण भागातील अर्थव्यवस्था बऱ्याच प्रमाणात स्वयंपूर्ण व स्वावलंबी होती. यावेळी व्यापार उद्योगाचा विकास झालेला नव्हता व बरीच जमीन वतनदारांच्या ताब्यात होती. शेतीच्या तुटपुंज्या उत्पन्नावर तो समाधान मानत असे. "दुष्काळ व उपासमारीने व्याकुळ झालेली माणसे माणसास खाऊ लागली व बापाची आपल्या मुलावरील माया कमी होऊन त्यांच्या मांसावर नजर जाऊ लागली." असे मन सुन्न करणारे या दुष्काळाचे वर्णन अहमदशहा लाहोरीने केलेले आहे. इंग्रज अधिकारी एल्फिन्सटोनने देखील या दुष्काळामुळे मराठी माणसे देशांतर करुन दुसरीकडे जाऊ लागली व बरीच गावे ओस पडली असे म्हटलेले आहे. परकीयांच्या सततच्या आक्रमणामुळे लुटालुट-जाळपोळीने येथील प्रदेश उध्वस्त होत गेले. तत्कालीन महाराष्ट्राची आर्थिक स्थिती अत्यंत दयनीय झाली होती.महाराष्ट्राचा मुख्य व्यवसाय शेती हा अत्यंत वाईट स्थितीला पोहचला होता.[६]

## वैज्ञानिक दृष्टिनोकानच्या आधारे छत्रपती शिवरायांनी केलेली आर्थिक क्रांती.

कोणतेही राज्य उभे करणे म्हणजे फक्त दगडमातीचे किल्ले उभे करणे, सैन्य जमविणे एवढच कार्य नव्हते. प्रमुख भाग म्हणजे राज्य निर्माण करणे आणि ते राखणे आणि यासाठी लागतात ते पैसे हे पैसे उभे करण्यासाठी एक व्यवस्थाच उभी करावी लागते आणि तिला म्हणतात अर्थव्यवस्था अर्थाशिवाय उभी राहू शकत नाही आणि टिकू देखील शकत नाही.त्यासाठी अर्थव्यवस्था बळकट करण्यासाठी काही नियम बनवावे लागतात, काही निर्णय घ्यावे लागतात तेव्हाच एक उत्तम अर्थ व्यवस्था निर्माण होते हे कार्य छत्रपती शिवरायांनी केलेले आहे.

अर्थव्यवस्था उभी करणे हे दोन टप्याचे काम असते. पहिले म्हणजे व्यापारउद्योग उभा करणे आणि दुसरे म्हणजे या व्यापार उद्योगाचे संरक्षण करणे या पैकी एकाजरी गोष्टीची कमतरता राहिली तरी अर्थव्यवस्था उभी राहू शकत नाही. आपल्याला एक उदाहरणा दाखल अमेरिकेत ११ सप्टेंबर २००१ रोजी घडलेल्या घटनेचा उल्लेख करता येईल.अतिरेक्यांच्या द्वारे जे वर्ल्ड ट्रेड सेंटर वर हल्ला झाला.म्हणजेचअमेरिकेने वर्ल्ड ट्रेड सेंटरचे सरंक्षण करु शकले नाही.त्यामुळे अमेरीकेला

खूप मोठ्या प्रमाणात आर्थिक नुकसान सोसावे लागले. अफगाणिस्तानची तर पार राख रांगोळी होऊन त्यांची अर्थव्यवस्था कोलमडली या दोन उदाहरणावरुन छत्रपती शिवरायांनी अर्थ व्यवस्थेला सरंक्षण दिले पाहिजे ही गोष्ट सांगितली त्याचे महत्त्व दिसून येते. अत्यंत दुर्गम अशा ठिकाणी स्वराज्याची उभारणी करणे आणि केलेली उभारणी टिकावी यासाठी थोडे अवघड वाटले तरी महाराजांनी आपली सुरुवात पुणे परिसरातून केली. यातून शिवाजी महाराजांची दूरदृष्टी लक्षात येऊन त्यांनी आर्थिक विकासात वापरलेला वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.त्याबरोबरच शिवरायांनी शेती व्यवसायाकडे भरपूर लक्ष दिले.शेतकऱ्यांना उत्तम प्रकारचे बी-बीयाणे मिळतील यावर लक्ष दिले.त्याबरोबरच सिंचनावर भर देऊन शेती फक्त निसर्गावरच अवलंबून राहणार नाही याची काळजी घेतली.[७]

सह्याद्रीच्या डोंगर प्रांतातील मावळचा भाग अत्यंत दुर्गम पाऊस खूप कमी पडायचा आणि दुसऱ्या बाजूला शेतीयोग्य जमीन खूप कमी, उपजिविकेचे साधन नाही पर्यायाने लोकांची वस्ती नाही. घनदाट जंगल त्यामुळे श्वापदांचा वावर जास्त असे. त्यामुळे हा प्रदेश शून्य उत्पन्नाचा असल्यामुळे साहजिकच भौगोलिक संपन्नता या प्रदेशाच्या आर्थिक विकासाच्या आड येत होती. परंतु याच नकारात्मक गोष्टीला शिवाजी महाराजांनी सकारात्मक केले. प्रतिकूल परिस्थितीवर मात केली. जो प्रदेश दुर्गम असतो तेथील लोकसुध्दा तेवढेच काटक असतात. त्यामुळे मावळातील लोक जे जगण्यासाठी वाघ, लांडग्यांशी दोन हात करतात ते आपलं जीवन सुकर करण्यासाठी परिस्थितीशी दोन हात करुन शिवरायांनी दुर्गम अशा मावळात अर्थव्यवस्था उभी करुन राजगड ही राजधानी केली. त्याकाळी लोकवस्ती विरळ आणि जंगल घनदाट असल्यामुळे लोकांचा गावाचा एकमेकांशी संपर्क कमी होता. या सर्व गोष्टींचा अभ्यास करुनच शिवाजी महाराजांनी घाट आणि कोकण याच्या बरोबर मध्यभागी राजधानी राजगड उभा केला.स्वराज्य उभे करण्यासाठी दुर्गम प्रदेश आपल्या ताब्यात असले पाहिजे ही शिवरायांची भूमिका होती. त्यादृष्टिने त्यांनी प्रयत्न केलेले दिसून येते.[८]

छत्रपती शिवरायांनी जंगल दऱ्याखोऱ्यात अर्थव्यवस्था उभी करुन ती राखण्याचे महत्वपूर्ण काम केले. शिवाजी महाराज जगातील पहिले दूरदृष्टी असणारे अर्थतज्ञ होते. मोगल बादशहा औरंगजेबाला २७ वर्ष संघर्ष करुन देखील ही अर्थव्यवस्था कमजोर करता आली नाही.यावरुन शिवरायांनी ही अर्थव्यवस्था किती मजबूत पायावर उभी केली होती याची आपल्याला प्रचिती येते. किती नियोजनबध्द पध्दतीने ती राखली होती. हे हेरुनच शिवाजी महाराजांनी प्रत्येक घाटात किल्ला आणि प्रत्येक घाटावर चौकी बसविली. व्यापारातून जकात आणि जकातीतून अर्थव्यवस्थेची सुरक्षा झोकात असा क्रम बसविला. व्यापाराला संरक्षण नसेल तर अर्थव्यवस्था उभी राहणार नाही हे ओळखूनच महाराजांनी घाटाच्या तोंडावर चौकी, घाटात जकात नाका, घाटावर किल्ला आणि घाटाच्या शेवटी बाजार पेठा वसविल्या होत्या . यातून शिवाजी महाराजांची आर्थिक नीती दिसून येते.त्या बरोबरच शिवरायांनी व्यापारी वर्गाना सरंक्षण देऊन स्वराज्यातील व्यापार भरभराटीस आणला होता.

शिवरायांनी आपली अर्थव्यवस्था सुस्थितीत ठेवतांना दोन गोष्टीकडे खूप महत्त्व दिलेले होते.एक अर्थव्यवस्था निर्माण करणे आणि दुसरी निर्माण झालेल्या अर्थव्यवस्थेचे संरक्षण करणे. अर्थव्यवस्था सांभाळता आली नाही म्हणून मुघलशाही संपली तर निर्माण केलेली अर्थव्यवस्था सांभाळता आली म्हणूनच मराठेशाही टिकली. १७६५ पर्यंत तर सगळा देश मराठ्यांच्या ताब्यात आला होता.जगाच्या पाठीवर कोणत्याही राजाने एवढ्या कमी कालावधीत एवढे जास्त किल्ले बांधले नाहीत. जगाच्या पाठीवर शिवाजी महाराजांनीच जेवढे किल्ले बांधले तेवढे किल्ले क्वचित काही राजे आणि महाराजांनी बांधले असतील.त्याच बरोबर शिवरायांनी व्यापार आणि उद्योगाला संरक्षण दिले आणि आपल्या किल्ल्याच्या संरक्षणाकडे विशेष लक्ष दिले. महाराजांची अर्थव्यवस्था ऊलथवून टाकाणे एवढे सोपे नव्हते. कारण शिवाजी महाराजांच्या ताब्यात असणारी जी चारशे बावीस किल्ले होते त्या किल्ल्यांमध्ये शिवरायांची अर्थव्यवस्था टिकूण होती. म्हणून मोगल बादशहा औरंगजेबाला सुध्दा दक्षिणेमध्ये येऊन आपल्या आयुष्यातील महत्त्वपूर्ण सत्ताविस वर्ष त्यांनी मराठ्यांशी संघर्ष करण्यात घालविले. परंतु स्वराज्याची एक इंच भूमी सुध्दा औरंजेबाला

ताब्यात घेता आले नाही. यावरुन शिवरायांची अर्थनिती आणि युध्दनिती मध्ये वैज्ञानिक दृष्टिकोन किती परिपूर्ण पणे होता हे दिसते.[९]

छत्रपती शिवाजी महाराज अजिंक्य होण्यामागे त्यांचे रणकौशल्य महत्वाचे होते त्याच प्रमाणे त्यांची अर्थनिती सुध्दा महत्वाची आहे. आर्थिक नितीची वापर करत असतांना महाराजांनी वापरलेला वैज्ञानिक दृष्टिकोन आपल्याला दिसून येतो. ज्यांची अर्थव्यवस्था अबाधित तोच अजिंक्य असतो हे महाराजांनी हेरले होते. महाराज हे दुरदृष्टीचे राजे होते आपल्या देशावर परकीयांचा अमल होऊ शकतो म्हणून त्यांनी एका ठिकाणी इंग्रजांना उद्देशून म्हणतात फक्त ' तराजु बघा तलवार काढू नका ' आणि तसं केलात तर मग राजापूरच्या वखारीच काय झाल कशी वखार खणून काढली तेही दाखवून दिले. व्यापाऱ्यावर अर्थव्यवस्था अवलंबून असते, पण तो व्यापार जर राजाच्या नियंत्रणात असला तरच सर्वसामान्य जनतेला फायदा होतो. अन्यथा व्यापारी सर्वसामान्य माणसाच शोषण करतो.म्हणून शिवरायांनी व्यापाराला चालना दिली तसेच रयतेला समृध्द केले.[१०]

शिवरायांनी आपल्या स्वराज्यात असणाऱ्या व्यापाऱ्यांचा फायदा जरुर झाला पाहिजे, पण ग्राहकाचे शोषण न करता रयत जगली तर राज्य जगेल राज्य जगले तर व्यापार जगतो आणि व्यापार राहिला तर नफा होतो. तेंव्हा संरक्षित अर्थव्यवस्था ही सगळयांच्याच्या फायद्याची असते. तेंव्हा तिला वाढविणे आणि सरंक्षण देणे ह्या दोन्ही गोष्टी झाल्याचं पाहिजे. असा दूरदृष्टी निर्णयक्षमतेमुळे शिवाजी राजाची अर्थव्यवस्था अर्थात स्वराज्य कायम वाढत गेली. कायम फायद्यात राहिली आणि सर्वसामान्य माणसाचे कल्याण करीत गेली. यामुळेच महाराजांच्या आयुष्यात लढाया खूपच कमी आणि मोहिमा छापेच जास्त होते. शिवाजी महाराजांनी अर्थव्यवस्था गतिमान केली. आपल्या स्वराज्यातील तरुणांना रोजगार मिळाला पाहिजे म्हणून त्यांनी प्रत्येक घरातील एका तरुणाला आपल्या लष्करी व्यवस्थेत सामावून घेऊन त्या तरुणाला आर्थिक दृष्ट्या उभे केले त्यातून स्वराज्य उभे राहिले.त्याचबरोबर तत्कालीन हिंदू धर्मानुसार समुद्रावर प्रवास

करणे,समुद्र ओलांडणे निषिध्द समजल्या जात होते. परंतु शिवरायांनी या अंधश्रध्देला बळी न पडता समुद्रावर विविध उद्योगांची निर्मिती करुन तरुणांना रोजगार उपलब्ध करुन दिले.[११]

शहाजीराजे आणि जिजाऊ यांनी शिवाजीराजांना लहानपणापासूनच अनेक ठिकाणी फिरवले होते. हवा पालट होण्यासाठी नाही तर हवा पालटवण्यासाठी १६३० ते १६३२ राजे शिवनेरीवर होते. तेथून पुढे १६३२ ते १६३५ या कालावधीत सिंदखेडराजा येथे म्हणजे पुण्यापासून जवळपास ३०० किलोमीटर अंतरावर पुढे १६३५ ते १६३७ पुन्हा पुण्यात आणि १६३७ ते १६४२ बंगलोर येथे म्हणजे पुण्यापासून ९०० किलोमीटर पुढील काळात महाराजांचा मिर्जाराज जयसिंह याच्याशी पुरंदरचा तह होऊन महाराज १६०० कि.मी. अंतरावर आग्रा येथे गेले. पुढे १६७६ला राज्यभिषेकानंतर महाराज हैद्राबाद ते तंजावर पर्यंत म्हणजे जवळपास २५०० कि.मी. पेक्षा जास्त प्रवास केले. उभ्या आयुष्यात महाराजांनी जेवढा प्रदेश फिरले, जवळून बघितले तर तो आग्रा ते मद्रास एवढा विशाल होय. आणि महाराजांचे तर ध्येयच होते स्वराज्याचा विस्तार करणे हा उत्तर दक्षिण असा झाला पाहिजे ही महाराजांची महत्त्वकांक्षा होती.त्यासाठी त्यांनी स्वराज्याच्या आर्थिक नितीला प्राध्यान्य देऊन रणनितीत वेगवेगळ्या योजना आमलात आणून जास्तीत जास्त प्रदेश आपल्या नियंत्रणाखाली आणण्याचा प्रयत्न शिवरायांनी केलेला आहे.[१२]

अर्थव्यवस्था कायम मजबूत असली पाहिजे त्यासाठी त्यांनी व्यापार आणि उद्योगाला प्रोत्साहन दिले. व्यापार आणि उद्योग हाच अर्थव्यवस्थेचा कणा आहे हे शिवाजी महाराज जाणून होते. व्यापाऱ्यांना आणि वखारीला जागा कोठे आणि कशी द्यावी यात त्यांचे भूगोलाचे ज्ञान दिसून येते. यातील काही सूचना महाराजांचा मंत्री निलो मुजूमदार याचा मुलगा रामचंद्रपंत अमात्य याने लिहून घेतल्या. त्या सूचना आज्ञापत्र नावाने प्रसारित केल्या. कारण मुजुमदार आणि अमात्य ही नावे वेगळी वाटतात पण ती एकाच अर्थखात्याशी सबंधित आहेत. अमात्य हा संस्कृत शब्द तर मुजुमदार हा शिवाजी महाराजांचा शब्द मुजुम किंवा अमात्य याचे काम म्हणजे आर्थिक धोरण

ठरविणे, अमलात आणणे. शिवाजी महाराजांनी स्वराज्य यशोशिखरावर कसे पोहचेल यासाठी दूरदृष्टीने आर्थिक धोरण निश्चित केले.

शिवाजी महाराजांनी व्यापार आणि उद्योगाला किती महत्त्व दिलेले होते हे खालील आज्ञानपत्रावरुन लक्षात येते.

"साहुकार म्हणजे राज्याची व राजश्रींची शोभा. साहुकाराकरिता राज्य अबादान होते. न मिळे ते वस्तुजात राज्यात येते. राज्य श्रीमंत होते. पडिले संकटप्रसंगी पाहिजे ते कर्जवाम मिळते. तेणेकरुन आले संकट परिहार होते. साहुकाराचे संरक्षणामध्ये बहुत फायदा आहे.याकरिता साहुकाराचा बहुमान चालवावा.कोण्हेविषयी त्यावरी जलल अथवा त्याचा अपमान होऊ न द्यावा.पेठापेठात दुकाने वखारा घालोन हत्ती,घोडे,नरमिना,जरबाब,पशमी आदि करुन वस्त्रजात व रत्ने व शस्त्रे अदिकरुन अशेष वस्तुजात यांचा उदिम चालवावा.हुजूर बाजारामध्येही थोरथोर साहुकार आणून ठेवावे .वर्ष संबंधे तैसेचे लग्नादि महोत्सवी त्यांचे योग्य ते रुप प्रतिष्ठेने बोलाऊन आणून वस्त्रे पात्रे देऊन समाधान करित जावे.परमुलकी जे-जे साहुकार असतील त्यांची समाधाने करुन ते आणावे.त्यांसे अनुकूल न पडे तरी असतील तेथेच त्यांचे समाधान रक्षूण आपली माया त्यास लाऊन, त्यांचे मुतालिक आणून त्यास अनुकूल ते जागा दुकाने देऊन ठेवावे.तैसेच दर्यावर्दी साहूकार यासही बंदरोबदंरी कौल पाठवून आमदरफ्ती करावी. या वरील आज्ञापत्रावरुन शिवरायांचा व्यापार उद्योग आणि व्यापाऱ्यांविषयी असलेला सकारात्मक दृष्टीकोन दिसतो.[१३]

छत्रपती शिवाजी महाराजांनी अर्थनितीला किती महत्व दिले हे दिसून येते. सावकार म्हणजे राज्याची शोभा आहे. त्याचा मान, सन्मान राखला गेला पाहिजे. याकडे महाराजांनी लक्ष दिले. कर्जाचा पुरवठा करणारा व्यक्ती महत्वाचा घटक आहे. कर्जाचा पुरवठा करुन व्याज खाणारे वाईट असतात. ही जी खुळचट समजूत होती  त्याला शिवरायांनी आपल्या वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या आधारे मूठमाती दिली. व्याज घेणे म्हणजे पाप नसून तो व्यवहाराचा एक भाग आहे. आणि माणसाला आपला दैनंदिन व्यवहार सुरळीत पार पाडण्यासाठी व्यवहार करावाच लागतो त्यात पाप

पुण्य या गोष्टी न आणता व्यवहारिक दृष्टिकोनाचा अंगिकार माणसाने करायला पाहिजे असा विज्ञानवादी विचार छत्रपती शिवरायांच्या अर्थनितीतून हे स्पष्ट होते.[१४]

## शिवरायांनी शेतकऱ्यांचे हित जोपासले.

स्वराज्याचा आधारस्तंभ म्हणजे शेतकरी शेतकरी जगला पाहिजे तो स्वाभिमानाने आणि ताठ मानेने राहिला पाहिजे असे शिवरायांचे वाटत असे. म्हणून या राज्यातील शेतकरी जो पर्यंत सुखी होणार नाही तो पर्यंत रयत सुखी होणार नाही. आणि रयत सुखी नाही झाली तर राजा सुखी नाही हे शिवरायांचे धोरण होते. म्हणून त्यांनी शेतकऱ्यांच्या आर्थिक उन्नतीकडे विशेष लक्ष दिले. कोणतीही अर्थव्यवस्था उदयाला आणणे आणि गतिमान करणे यासाठी आवश्यक असते ते भांडवल आणि भांडवलाशिवाय,पैशाशिवाय अर्थव्यवस्था उभी राहू शकणार नाही हे शिवरायांनी हेरले होते.म्हणून त्यांनी शेतकऱ्यांच्या हाताला काम देऊन त्यांच्याकडे पैसा कसा खेळता राहिल याची व्यवस्था केली.म्हणूनच प्रत्येक घरातील एका शेतकऱ्याच्या मुलाला त्यांनी आपल्या सैन्यात भरती करुन घेतले. शिवाजी महाराजांनी वयाच्या पंधराव्या वर्षी स्वराज्याची शपथ घेतली.शपथ घेण्यामागचा त्यांचा मुख्य हेतू होता रयतेला गरिबीच्या चक्रव्यूहातून बाहेर काढणे कारण त्याकाळात विविध राजांमध्ये भांडणे होत असे.परंतु त्याचा त्रास मात्र रयतेला सहन करावा लागत होता.त्यातून रयतेचे खूप हाल होत होते. हि गोष्ट शिवरायांना खटकत होती.म्हणून त्यांनी सर्व प्रथम रयतेच्या आर्थिक गोष्टीकडे लक्ष दिले.त्याच बरोबर त्यांनी शेतकऱ्यांना शून्य व्याज दराने कर्ज उपलब्ध करुन दिले.त्यामुळे व्याजाच्या दुष्टचक्रातून सामान्य रयतेला बाहेर येता आले.हेच शिवरायांच्या अर्थनितीचे यश होते.[१५]

## शेती प्रमुख व्यवसाय

छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळी जवळपास ८०% रयत शेतीवर आपला उदरनिर्वाह करीत असे. शेती हेच लोकांच्या उत्पन्नाचे प्रमुख साधन होते. बहुतांश शेती ही निसर्गावर अवलंबून होती. परंतु वेळोवेळी वतनदारांना शेतसारा मात्र द्यावा लागायचा.शेतीमध्ये उत्पन्न होवो अथवा न होवो वतनदारांना शेतसारा देणे चूकत नसे.त्यामुळे शेतकरी हवालदिल झाले होते. त्यातून त्यांनी आपली शेती सावकाराकडे गहाण ठेवून वेळेवर शेतसारा भरत असत. परंतु एखादे वर्षी पावसाळा व्यवस्थित झाला नाही तर शेतीमध्ये काहीच पिकत नसे अशा प्रसंगी मात्र शेतकऱ्यांचे खूप हाल होत असे. त्यामुळे रयत पिचल्या जात असे त्यातच आदिलशाही आणि निजामशाही यांच्यात नेहमी संघर्ष आणि युध्दे होत असे.याचे कार्यक्षेत्र मात्र आपल्या महाराष्ट्राचा बहुतांश भाग असे.त्यामुळे विजय कुणाचाही होवो मात्र नुकसान महाराष्ट्रातील लोकांचे होत असे. हे शिवरायांनी पाहिले होते. तेंव्हा शिवरायांनी आपल्या मनोमनी असे ठरविले की,या रयतेला आदिलशाही आणि निजामशाहीच्या त्रासातून मुक्त करावयाचे त्यासाठी त्यांनी वयाच्या पंधराव्या वर्षी स्वराज्याची शपथ घेऊन स्वराज्यस्थापनेचे कार्य हाती घेतले.शेतकरी हाच आपल्या स्वराज्याचा आधार स्तंभ आहे.शेतकरी जगला पाहिजे असे शिवरायांना वाटत असे.शेतकरी हा श्रमजीवी वर्ग आहे.म्हणून श्रमाच्या मुल्यावर आधारित अर्थव्यवस्था निर्माण करण्याचे काम शिवराय करु लागले.प्रस्थापित जहागिदाराची अरेरावी आणि आत्मविश्वास गमावून बसलेले गोर गरिब यांच्यातील लढाई महाराज लढत होते. जहागीरदाराकडून जो गोर-गरिबांना त्रास होत होता. या त्रासापासून त्यांचे सरंक्षण करणे अशा दोन्ही आघाड्यावर आधारीत महाराजांची आर्थिक क्रांतीची लढाई होती. सतराव्या शतकात शेती हेच गोर-गरिबांच्या उदरनिर्वाहाचे प्रमुख साधन होते.त्यामुळे त्या शेतीचा अधिकार लोकांना मिळाला पाहिजे म्हणून शिवरायांनी जमिनदारांच्या आणि वतनदारांच्या विरोधात संघर्ष करुन ती शेती सामान्य रयतेला मिळवून दिली ही खऱ्या अर्थाने शिवरांयाची आर्थिक क्रांती होती.[१६]

छत्रपती शिवाजी महाराजांनी आर्थिक पायाभरणी केली. समाजाला लागणारे भांडवल लोकसहभागातून उभे केले. त्यावेळी मुख्य भांडवल म्हणजे काय होते तर शेती आणि जमीन. महाराजांनी ओसाड जमिनी लागवडीखाली आणण्यासाठी प्रयत्न केला, दुसरे म्हणजे जी जमीन जंगलव्याप्तआहे. पण शेती योग्य होऊ शकते अशी जमीन मोकळी करुन तिही लागवडीखाली आणली. अशा प्रकारे Barren Land आणि Forest Land शेती योग्य केली गेली. आणि तेही महाराजांनी शक्य केले ते लोकसहभागातून आणि लोकांनी गावात रहायला येऊन वस्ती केली पाहिजे.ग्रामीण अर्थव्यवस्था जी गावकेंद्रीत असेल ती जन्माला यायची तर गावे वसविली गेली पाहिजेत आणि त्यानुसार महाराजांनी नागरीकरण Urbanisation सुरु केले. पूर्वीची गावे आजच्या सारखीच गजबजलेली असायची तेंव्हा १७ व्या शतकातील गावं म्हणजे आजचे छोटे शहरच होय. अनावश्यक असलेली जंगले साफ करुन माळरान जमीन जी अनेक वर्ष पिकवली न गेल्याने पार पडीक झाली होती. अशा सर्व जमिनी एकत्र करुन महाराजांनी त्या ताब्यात घेतल्या. ती सर्व जमीन सरकारच्या नावे केली. खाजगी जमिनीचे सरकारीकरण करणारे शिवाजी महाराज हे जगातील पहिले राजे होत. सर्व खाजगी जमीन रयतेकडे दिली. ही जमीन कुटुंबातील सदस्य संख्या आधारभूत मानून महाराजांनी वाटप केली. गावची लोकसंख्या भागीले एकूण उपलब्ध जमीन असे समीकरण करुन सर्वांना समान प्रमाणत कसायला जमीन उपलब्ध करुन दिली. पुढे जसजशी लोकसंख्या वाढणार तस तसे आणखी जमीन लागवडीखाली आणली जाईल आणि कायम भांडवल पुरवठा होऊ शकेल याची महाराजांनी दक्षता घेतली. भूमीहिनांना, गरीबांना जमीन मिळाली. त्यांना हे भांडवल आयुष्यात पहिल्यांदाच मिळाले होते. भांडवल क्रियाशील करण्यासाठी आणखी काही गोष्टी कराव्या लागतात त्या शिवरायांनी त्या दिल्या ते म्हणजे पेरणीसाठी लागणारे उत्कृष्ट दर्जाचे बी-बीयाणे देऊन शेतकऱ्यांना आर्थिक दृष्ट्या सक्षम बनविले ही शिवरायांची शेतकऱ्यांबद्दल असलेली आस्था आणि प्रेम आपल्याला दिसून येते.[१७]

## शिवाजी राजे अर्थशास्त्राचे जाणकार

छत्रपती शिवाजी महाराज अर्थशास्त्राचे जाणकार होते. एका अर्थशास्त्रातील जाणकार माणसाकडून अशी चूक होणे शक्य नव्हते. जमीन शेती करण्यासाठी योग्य होण्यासाठी लागणारे बाकीचे पुरक भांडवल सुध्दा महाराजांनी पुरवायला सुरुवात केली. भूमीहीन ते नवीन शेतकरी असा प्रवास करणाऱ्या शेतकऱ्यांना महाराजांनी आता बैलजोडी , बारदाणा आणि बि-बियाणे सुध्दा दिले. शेतकऱ्यांनी तर मोठ्या उत्साहात आता हे पुरक भांडवलसुध्दा स्विकारले आणि काळजीचे काही कारण नव्हते कारण ते बिनव्याजी भांडवल होते. परंतु जर अर्थव्यवस्था गतिमान करुन वाढवायची असेल तर ते भांडवल बुडता कामा नये. उलट ते शाबूत राहिल पाहिजे आणि आणखी ते वाढवले गेले पाहिजे. जेणे करुन आणखी नवीन लोकांना असच भांडवल पुरवून त्यांनाही स्वतःच्या पायावर उभे करता येईल. म्हणून महाराजांनी हे भांडवल मुद्दलाच्या रुपात परत करण्याचेही शेतकऱ्यांना सांगितले आणि स्वराज्यातील शेतकरी गरीब होते. पण अप्रामाणिक नव्हते. त्यामुळे त्यांनी उसने घेतलेले भाग भांडवल परत करायला काहीच अडचण येणार नव्हती. आणि त्याकाळी हे गरीब लोक ते भांडवल आर्थिक स्वरुपात परत करु शकत नव्हते. तेंव्हा महाराजांनी ते भांडवल शेतसाऱ्यांच्या रुपाने स्वीकारायचे ठरविले. आणि ते शेतीसाठी कशा पध्दतीने सारा जमा करायचा याची आणेवारी ठरवून दिली. आता हा शेतसारा म्हणजे भाग भांडवल परत करण्याचा कार्यक्रम तेंव्हाच शक्य आहे जेंव्हा पीक येईल आणि हे सगळे तर निसर्गाच्या साथीवर देखील अवलंबून होते. तेंव्हा असे ठरले की जर पीक आले नाही तर शेतसारा द्यायचा नाही. उलट सरकारातून शिवाजी महाराज पुन्हा दुसऱ्या वर्षी नव्याने बि-बियाणे देणार होते. शिवाय नवीन शेत पिकवून ते खळ्यावर मळून तयार होईपर्यंत शेतकऱ्याला जगण्यासाठी लागणारे धान्यही महाराज पुरवणार म्हणजे शेतकऱ्याला दोन वेळच्या जेवणाची हमी आणि गरज पडल्यास आणखी पतपूरवठा हे धोरण महाराजांनी अवलंबलेले म्हणजे अस्मानी सुलतानी संकट तर महाराजांनी नियंत्रणात आणले. आता राहिले दुसरे सुलतानी संकट म्हणजे जहागीरदारांचे हितसबंध दुखावल्याने त्यांच्याकडून निर्माण केले जाणारे अडथळे आणि सकंटे शिवरायांनी मोडून काढले

आणि गोर-गरीबांना  स्वतःच्या पायावर उभे केले. त्यामुळे जहागिरदार व वतनदार यांना कोण विचारणासे झाले. म्हणून ही मंडळी शेतातील पीक कापून नेणे, त्यात गुरे चारणे असे उपद्व्याप करीत आणि यातूनही जर पीक खळ्यापर्यंत गेले तर तेथून ते शेतकऱ्यांच्या घरापर्यंत जाऊ द्यायचे नाही म्हणून लुटमार व्हायची आणि शिवाजी महाराजां पुढे तर हे संकट अस्मानी पेक्षा मोठे होते. या भांडवलदारांच्या कचाट्यातून शेतकऱ्यांचे पिक वाचवणे आणि त्यासाठीच घेतलेल्या पिकांचे अर्थात गरीबाच्या घामातून कष्टातून उभे राहिलेल्या पिकाचे सरंक्षण करण्यासाठी महाराजांनी लष्कर बांधणीला सुरुवात केली.या पध्दतीने शेतकऱ्यांना सरंक्षण दिले.[१८]

जगाच्या पाठीवर स्वराज्य उभे करण्यासाठी राजे लोकांनी लष्करे उभी केल्याचीच उदाहरणे आहेत. पण शेतकऱ्यांनी स्वंयपूर्ण व्हावे म्हणून शून्य दराने कर्ज दिले तसेच लष्कर उभे करणारे शिवाजी महाराज हे पहिलेच राजे होत. कारण महाराजांना माहित होते की, एकवेळ भांडवल पुरवणे सोपे आहे पण ते टिकवणे वाढविणे अवघड आहे आणि म्हणूनच महाराजांनी अर्थव्यवस्था भक्कम करण्याबरोबरच सुरक्षित करण्यावरही भर दिला. अशा प्रकारे जमीन उपलब्ध करुन तिचे राष्ट्रीयकरण करुन महाराजांनी ती गरीबांना उपलब्ध करुन बि-बियाणे, अवजारे यासह वाटप केली आणि तिही कायमस्वरुपी मालकी हक्काने दिली. शिवाजी महाराजांनी  एक अट घातली आणि ती म्हणजे भांडवल म्हणून दिलेली जमीन कायम भांडवलच राहिल याची काळजी घेतली. जमीन विक्री करण्यास पायबंद घातला. जेणेकरुन या शेतकऱ्याभोवती पुन्हा सावकारी पाश आवळला जाऊन पुन्हा ते कर्जबाजीरी होऊन पुन्हा गरीबीच्या दुष्टचक्रात अडकणार नाहीत. गरीबांना उभे तर केलेच पण ते आयुष्यात पुन्हा आडवे पडणार नाहीत किंवा त्यांना दुसऱ्या कोणालाही आडव करता येणार नाही याची काळजी घेतली. शेतकऱ्यांच्या हिताबद्दल छत्रपती शिवराय किती विचारपूर्वक निर्णय घेत होते हे यातून दिसते . शेतकरी हा स्वराज्याचा आधारस्तंभ आहे. हा आधार ढासळता कामा नये. हीच शिवरायांची भूमिका होती.[१९]

## वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या आधारे उद्योगधंद्यास प्रोत्साहन

छत्रपती शिवराय नुसते योध्दे नव्हते तर एक उत्तम प्रशासक होते.म्हणून त्यांनी आपल्या स्वराज्यातील सर्वांना उदरनिर्वाहाची सोय करुन दिली. हे करीत असतांना धर्म, जात याचा विचार न करता जो जो स्वराज्यातला तो तो आपला आहे ही त्यांची भावना होती. स्वराज्यातील प्रत्येक व्यक्तीला काम मिळाले पाहिजे यावर त्यांचा कटाक्ष होता. त्यासाठी त्यांनी प्रत्येकाच्या हाताला काम उपलब्ध करुन दिले. मध्ययुगीन काळात अंधश्रध्देचा आणि रुढीपरंपरेचा पगडा होता. अमुक जातीतील लोकांनी अमुकच काम करावे असा दंडक होता. परंतू शिवरायांनी हा अंधश्रध्दा जुगारुन त्या व्यक्तीच्या गुणाचा विचार करुन त्याला काम दिले. आपल्या हिंदू धर्मातील तथाकथित तत्वानुसार समुद्रावर प्रवास करता येत नाही. समुद्र ओलांडता येत नाही समुद्र ओलांडणे म्हणजे धर्म बुडीविणे होय. ही समजूत होती परंतु या वाईट समजूतीला शिवरायांनी मूठमाती दिली राज्याच्या भरभराटीसाठी उद्योगधंदे आवश्यक आहेत. त्याशिवाय देशाचा विकास होणार नाही आणि रयतेचा विकास होणार नाही याचा विचार करुन उद्योग धंद्याला प्रोत्साहन दिले.

न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांनी छत्रपती शिवाजी महाराजांच्या कामगिरीचे वर्णन करतांना म्हणतात. स्वराज्य अथवा मराठा राष्ट्र निर्मिती हे होय. पण या त्यांच्या विधानात थोडीशी भर घालून असे म्हणता येईल की, त्यांनी ही नवजात मराठी सत्ता आर्थिक दृष्ट्या सबल करण्याचा आटोकाट प्रयत्न केला यासाठी शेती व्यवसाय कसा सुधारता येईल, उद्योगांचा विकास कसा करता येईल, राज्याच्या उत्पन्नात कशी वाढ करता येईल, याचा सतत विचार करुन आपले आर्थिक धोरण अवलंबविले.[२०]

छत्रपती शिवाजी महाराजांनी आपले व्यापार विषयक धोरण मोठ्या धूर्तपणे आखले होते. महाराष्ट्राची पश्चिम किनारपट्टी सुमारे ७२० कि.मी. च्या जवळपास इतकी आहे. आणि शिवकाळात कोकण भागात गजबजलेली बरीच व्यापारी केंद्रे होती. त्यात चौल, दाभोळ, कल्याण,भिवंडी ,वेंगुर्ला,पेण, तारापूर,केळचे माहीम, वसई, नागोठणे, श्रीवर्धन, जैतापूर, खारेपाटण

इत्यादी ठिकाणाचा उल्लेख करता येईल. चौल आणि दाभोळ ही बंदरे तर व्यापाराच्या दृष्टीने सुरत आणि गोव्यासारखी गजबजलेली असत. शिवाजी राजांच्या ताब्यात असलेली राजापूर, दाभोळ, केळशी ही बंदरे मुंबईच्या व्यापाराला अत्यंत आवश्यक होती असे व्यापारी लोक मानीत . सूरत ही त्यावेळची मोगलांच्या मुलखात असलेली एक फार मोठी बाजारपेठ होती. तेथे आयात-निर्यात माल मोठ्या प्रमाणावर होत असे, पण इंग्रजी व्यापाऱ्यांच्या मते मराठी राज्याच्या बंदरातून वस्तू अधिक स्वस्तात मिळत होत्या.

कोकण किनारपट्टीवर इंग्रज, फ्रेंच, डच यांच्या वखारी होत्या. फ्रेचांना शिवाजी राजाने राजापूर येथे वखार घालण्यास परवाना दिला होता. वेंगुर्ला येथे डचांची वखार होती. पोर्तुगीजांनी गोव्याची किनारपट्टी व्यापली होती. या साऱ्या परदेशी व्यापाऱ्यांना टोपीकर असे म्हणत, पण या सर्वटोपीकरांत इंग्रज मराठी मुलखाशी अधिक सबंधित होते. शिवाजीराजाने त्यांच्याशी राजकीय दृष्टीने सबंध ठेवणे आवश्यक असले तरी अंतर्गत व्यापारापासून त्यांना दूर ठेवण्यात आले होते. स्थानिक व्यापाऱ्यांना त्यांच्या स्पर्धेची झळ पोहोचू नये म्हणून त्यांच्यावर अनेक निर्बंध घातले होते. या परकीय व्यापाऱ्यांपासून स्थानिक व्यापाऱ्यांना सरंक्षण देणे अगत्याचे होते. कोकण हा मराठी राज्याचा कणा होता. कोकण म्हणजे 'नवनिधी ' म्हणजे नवी नवी संपत्ती निर्माण करण्याचे नैसर्गिक ठिकाण असे मानले जात होते. शिवरायांना ' कोकणचा राजा ' आणि मराठी राज्य म्हणजे कोकणचे राज्य असे मानण्याकडे लोकांची प्रवृत्ती होती. शिवकाळात कोकणातील एक प्रमुख व्यवसाय म्हणजे मिठाचे उत्पादन, ठाणे, कुलाबा, रत्नागिरी या कोकणातील जिल्ह्यात अनेक मिठागरे होती. विशषत : पेण, पनवेल, नागोठणे,रेवदंडा, ठाणे येथील मिठागरे चांगलीच प्रसिध्द होती. शेती व्यवसाय सांभाळून शेतकरी मीठ उत्पादनाचा जोडधंदा करीत. या मिठागरातून उत्पन्न होणारे मीठ देशावर विकले जात असे. मिठाच्यावाहतूकीसाठी खास गलबतांचा तांडा शिवाजीराजांनी तयार केला होता. कल्याण, भिवंडी येथे त्यांचा बोटी बांधण्याचा कारखाना होता.[२१]

मिठाच्या जहाजांच्या ताफ्याला सिद्दी लोकांकडून नेहमीच त्रास होत असे. मोरोपंत पिंगळे ने या राजांना एकदा म्हटले होते की, मिठाच्या व्यापारासाठी हा सिद्दीकडून होणारा त्रास चुकविण्यासाठी आपण इंग्रजांची जहाजे भाड्याने घ्यावीत. कारण इंग्रज आणि सिद्दी यांचे मित्रत्वाचे सबंध असल्याने त्यांचे निशाण असलेले जहाज अडविण्याचा प्रयत्न होणार नाही. त्याप्रमाणे कंपनीकडे बोटीची मागणी केली असता सुरतेच्या ऑफिसने ती फेटाळली. त्याचे म्हणणे असे होते की, एकदा मिठासाठी बोटींचा वापर केला म्हणजे त्या बोटी इतक्या खराब होतील की, त्यातून चांगला माल वाहून नेणे अवघड होईल. यापासून धडा घेऊन मराठ्यांनी आपला मिठाच्या जहाजांचा ताफा सतत तयार ठेवला.या बोटी मीठ आणि इतर वस्तू घेऊन मस्कत मोचा (Mocha ) इराण, बसरा, एडन इत्यादी  दूरवरच्या ठिकाणी जात होती. अशी इंग्रजांनी नोंद केली आहे. मराठ्यांच्या मालवाहू बोटी गुजरातेत सुरतेपर्यंत जात. अंतर्गत मिठाच्या व्यापारासाठी कोकणात पाडावांचा वापर केला जात असे. अशा रीतीने इंग्रजांना या महत्वाच्या व्यापारात मराठ्यांनी शिरकाव करु दिला नाही. मीठ जीवनात अत्यंत आवश्यक वस्तू असल्याने साहजिकच त्याला मोठी मागणी सर्व भागांतून येत असे. शिवरायांच्या राज्याच्या हद्दीत तयार होणाऱ्या मिठाला पोर्तुगीजांच्या गोव्यातील मिठापासून विशेष स्पर्धा होत असे. मराठे आणि पोर्तुगीज यांच्या हद्दी परस्परांना अगदी लागून असल्याने मिठाच्या व्यापाऱ्याची पोर्तुगीजांच्या प्रदेशातून सारखी ये-जा होत असे. गोव्याकडे मीठ तयार करणे, विकणे हा मोठा उद्योग होता. विशेषत : बारदेश भागात उत्तम मिठाची पैदास होत असे. आणि तेथे निर्माण होणारे मीठ मराठी मुलखापेक्षा स्वस्त असावे. त्यामुळे देशावरील व्यापारी मीठ खरेदीसाठी स्वराज्याचा मुलुख ओलांडून बारदेशात जात व तेथून मीठ देशावर आणून विकत असत. सातारा, कोल्हापूर इत्यादी देशावरील व्यापारी वाहतूकीचा त्रास आणि खर्च सोसून बार-देशातील मीठ खरेदी करण्यासाठी येत होते. त्याअर्थी निश्चितच तेथील मीठ स्वस्त असणार, अथवा कदाचित तेथील मिठाची चव आणि प्रत मराठी मुलखातील मिठापेक्षा निराळी असणार. पिकते तिथे विकत नाही असे म्हणतात. तेंव्हा कोकणात विपुल प्रमाणात होणारी मिठाची पैदास कोकणात किती विकल्या जाणार. देशावर मीठ पिकत नव्हते आणि मीठ ही जीवनावश्यक वस्तू

असल्याने पडेल त्या भावाने दररोज लागणारे मीठ गरीब-श्रीमंताना खरेदी करावेच लागे. देशावरची ही मीठ बाजारपेठ परक्यांनी काबीज केल्यामुळ आणि त्यांच्याशी स्पर्धा करणे स्थानिक उत्पादकांना परवडण्यासारखे नसल्याने स्वराज्यातील बरीच मिठागारे ओस पडली होती. मिठाचा धंदा बसला. मिठावरील जकातीचे उत्पन्न कमी झाले. यावर काहीतरी उपाय करणे सरकारला आवश्यक होते. या सर्व परिस्थीतीचा शिवरायांने पुर्णपणे विचार केला आणि आपल्या राज्यातील मिठाच्या महत्वाच्या व्यवसायाला ' संरक्षण ' दिले.[२२]

## युरोपीय व्यापारी नितीचा प्रारंभ शिवरायांच्या अर्थनितीत.

छत्रपती शिवाजी महाराजांनी १७ व्या शतकात जी अर्थनीती वापरली तीच अर्थनिती, व्यापारनीती १९ व्या शतकात युरोपीय राष्ट्रांनी वापरलेली आहे.यातून शिवराय काळाच्यापुढेजाऊन विचार करणारे राजे होते. हे आपल्याला दिसून येते. वैज्ञानिक गोष्टी आणि तार्किक गोष्टी फक्त युरोपातच निर्माण होऊ शकतात अशी जी आपली विचार पध्दती आहे. ती विचार पध्दती शिवरायांची अर्थनिती पहिल्यानंतर खोटी ठरते. शिवाजी महाराज १७ व्या शतकात ज्या गोष्टीचा विचार केला. ते पूर्णपणे वैज्ञानिक दृष्ट्या परिपूर्ण, तार्किक दृष्ट्यापरिपूर्ण होते हे स्पष्ट होते. १८ व्या शतकात इंग्लंडमध्ये औद्योगिक क्रांती झाली. तेंव्हा युरोपातील इतर राष्ट्रांना बरीच आर्थिक झळ सोसावी लागली. कारण इतर अप्रगत युरोपीय राष्ट्रांना इंग्लंडशी स्पर्धा करणे शक्य नव्हते. इंग्लंडने स्वतःच्या फायद्यासाठी खुल्या व्यापाराचे धोरणे स्वीकारले होते. याचा अर्थ इंग्लंडमध्ये आयात-निर्यात मालावर कसलीच जकात आकारली जात नसे. इतर युरोपीय राष्ट्रांनी तशाच प्रकारच्या धोरणाचा अवलंब करावा अशी इंग्लंडची इच्छा होती. या धोरणामुळे इंग्लंडला कच्चा माल स्वस्तात मिळू लागला. त्याच्या उत्पादनावरील खर्चात कपात झाली. तयार मालाच्या किमती कमी झाल्या. त्यामुळे इंग्लिश मालाची मागणी वाढली इतर राष्ट्रामध्ये अद्याप औद्योगिक विकास इंग्लंडप्रमाणे झाला नव्हता. त्यामुळे व्यापारी स्पर्धेत ती टिकत नव्हती.

जर्मनी हे १९ व्या शतकातील युरोपातील एक महत्वाचे राष्ट्र होते, पण ब्रिटीशांच्या या खुल्या व्यापाराच्या धोरणाचा फटका जर्मन उद्योधंद्यांना बराच बसू लागला. तेंव्हा तेथील एक अर्थशास्त्रज्ञ फ्रेडरिश लिस्ट याने सरंक्षण धोरणा चा पुरस्कार केला आणि जर्मनीच्या औद्योगिक प्रगतीला चालना मिळाली या धोरणानुसार परदेशातून येणाऱ्या मालावर जबर जकात बसविली जात असे. ती जकात भरुन जर परदेशी माल जर्मनीत आलाच तर त्या परदेशी मालाची किंमत स्थानिक मालापेक्षा अधिक होई. त्यामुळे साहजिकच महागडी परदेशी वस्तू लोक घेईनासे झाले. त्यातून स्थानिक उद्योग धंद्यांना सरंक्षण मिळाले. त्यांच्या मालाची मागणी वाढली. शिवाय जबर आयात जकातीमुळी सरकारी उत्पन्नही वाढले. या सरंक्षण धोरणा मुळे जर्मनीचा असा दुहेरी फायदा झाला.

१९ व्या शतकात व्यापाराच्या बाबतीत जर्मनीमध्ये जे धोरण राबविण्यात आले होते. तसेच धोरण छत्रपती शिवाजी महाराजांनी १७ व्या शतकात आपल्या स्वराज्यात राबविले. त्याकाळात अतिशय आघाडीवर असलेला उद्योग म्हणजे मिठाचा उद्योग होय मिठाच्या व्यापारावर अशाच प्रकारचे संकट कोसळले होते. शिवाजी महाराजाने कसल्याही आर्थिक सिध्दान्ताचा आधार न घेता असाच सरंक्षणाच्या धोरणाचा पुरस्कार केला होता. कुडाळचा सरसुभेदार नरहरी आनंदराव यास १६७१ साली मिठावरील करासबंधी पत्र लिहून मिठाच्या धंद्याला प्रोत्साहन कसे देता येईल यासबंधी आपले विचार कळिवले होते हे पत्र म्हणजे दुसरे तिसरे काही नसून ' संरक्षण ' धोरणाचेच सुत्र विशद करणारे होते.[२३]

कोकणातील प्रभावळीपासून कल्याण-भिवंडीपर्यंत मिठाच्या आयातीवर कर आकारणी कशी केली जावी यासबंधीची माहिती त्या खात्यातील अधिकाऱ्यांना दिली आहे. महाराजांच्या असे लक्षात आले होते. की कोकणातील मिठाचे भाव वाढल्यामुळे देशावरचे सारे व्यापारी लोक गोव्याकडील बारदेशात मीठ खरेदीसाठी जातात आणि त्यामुळे कोकणातील मिठाचा उठाव आवश्यक त्या प्रमाणात होत नाही. यावर महाराजांनी उपाय म्हणून सुचवीले होते. की बारदेश या

गोव्याच्या बाजारपेठेतून येणाऱ्या मिठावरजबर जकात बसवावी म्हणजे तेथून येणाऱ्या मिठाची किंमत चांगलीच वाढेल व वाहतूकीचा खर्च करुन बारदेशातून मीठ आणण्यापेक्षा हे व्यापारी आपल्या प्रदेशातील मिठागरांतून मीठ खरेदी करतील आणि त्यामुळे आपल्या मालाला उठाव मिळेल. एवढे करुनही काही व्यापारी बारदेशात गेलेच तर ते मीठ घेऊन आपल्या प्रदेशातून जात असतील तर त्यांना जबर जकात द्यावी लागेल आणि ते जकातीचे उत्पन्न सरकारला मिळेल, म्हणजे या सरंक्षणाच्या धोरणामुळे सरकारचा दुहेरी फायदा होईल. एक, मिठाचे दर कमी म्हणून उठाव जास्त आणि दोन, आयातीवर जबर जकात द्यावी लागणार म्हणून जकातीच्या उत्पन्नात वाढ होईल असे महाराज लिहितात.

" तुम्ही घाटी जकात जबर बैसविणे, बारदेशात मीठ विकते त्याचा हिशेब प्रभावळीकडे संगमेश्वराकडे मीठ विकते त्याने कित्येक जबर पडते ते मनास आणून त्या अजमासे जकराती जबर बैसविणे की संगमेश्वरी विकले आणि घाट पावेतो जे बेरीज पडेल त्या हिशेब बारदेशीच्या मिठास जकाती घेवणे. संगमेश्वराहून बारदेशीचे मीठ महाग पडेल ऐसा जकातीचा तह देणे."

जकातीसंबंधीच्या कराराची अंमलबजावणी सर्व संबंधित अधिकाऱ्यांनी करावी असे महाराजांनी बजावले ते म्हणतात.[२४]

पोर्तुगीजांच्या देशातून येणाऱ्या मालावर जबर जकात बसविल्याने, तेथून येणाऱ्या मालाचा ओघ घटेल. आपल्या देशातील मालाची मागणी वाढेल, मागणी वाढली म्हणजे उत्पादन वाढेल, जबर जकातीमुळे सरकारी उत्पन्न वाढेल आणि त्यामुळे 'साहेबाचा बहुत फायदा ' होईल असे महाराजांनी बजावले होते. याच पत्रात पुढे म्हटले आहे.

"मिठाचा मामला... कर्द लाख रुपये यावयाचा मामला आहे. तरी लिहिले प्रमाणे अंमल करणे."

शिवाजी राजे या पत्रावरुन १६७१ साली आपल्या राज्याच्या उद्योगधंद्याच्या विकासाबाबत तसेच सरकारच्या उत्पन्नासबंधी महाराजांनी किती खोलवर विचार केला होता याची कल्पना येते. स्वराज्याचे सुराज्य होण्यासाठी त्या राज्याचा आर्थिक पाया भक्कम झाला पाहिजे, यासाठी शिवाजीराजांनी जे काही प्रयत्न केले त्यापैकी ' मिठाचा मामला ' हे मिठावरील शिवरायांचे कर धोरण होते.ज्या धोरणामुळे स्वराज्यातील मिठाच्या उद्योगाचा विकास झालेला दिसून येतो.[२५]

## दुष्काळातून स्वराज्याची भरारी (आर्थिक क्रांती)

छत्रपती शिवाजी महाराजांचे विचार एवढे तर्कनिष्ठ आणि तर्कपूर्ण होते की, त्या विचाराने त्यांनी घेतलेले निर्णय यशस्वी ठरले. यावरुन असे लक्षात येते की, शिवरायांच्या अंगी वैज्ञानिक दृष्टिकोन असल्याशिवाय असे तर्कपूर्ण आणि तर्कनिष्ठ विचार निर्माण होणे शक्य नव्हते. कोणतेही धोरण आखत असतांना त्याच्या खोलात जाऊन विचार करणे. हे शिवरायांचे वैशिष्ट्य होते. कोणताही व्यक्ती असा खोलवर जाऊन तेव्हाच विचार करु शकतो. जेंव्हा त्याच्यात वैज्ञानिक दृष्टिकोन असेल. म्हणून शिवरायांनी आर्थिक धोरण आखतांना तर्कपूर्ण विचार केलेले दिसून येतात. शिवाजी महाराजांनी केलेल्या आर्थिक विकासाला आर्थिक क्रांतीच म्हणावे लागेलअशी परिस्थिती होती. महाराजांनी स्वराज्य उभे करण्याच्या वेळी महाराष्ट्रात आणि देशात दुष्काळाने अक्षरशः हाहाकार उडवून दिलेला होता. १६३० पासून महाराष्ट्रात दुष्काळ होता. आणि बरोबर १९ फेब्रुवारी १६३० लाच महाराजांचा जन्म झाला. म्हणजे महाराजांचे स्वागत सर्वात पहिले कोणी केले असेल तर ते या दुष्काळाने आणि हा दुष्काळ किती भयावह आणि प्रदीर्घ कालखंड होता आणि यावरुन आपल्याला महाराजांसमोरील आव्हानाची कल्पना येईल. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत बाल वयातील शिवाजीराजे या दुष्काळावर मात करुन स्वराज्याचे स्वप्न उराशी बाळगून वाटचाल केली. सन १६३० च्या दुष्काळाला इतिहासात मोठा दुष्काळ म्हटले जाते. कारण या दुष्काळामुळे १६३० ते १६५३ या तेवीस वर्षात काही पिकले नव्हते. मोरलंड नावाच्या इतिहासकाराने या दुष्काळाचे वर्णन केलेल आहे. ' बादशहानामा' या ग्रंथाच्या आधारे तो म्हणतो," या दुष्काळामुळे

दक्षिणदेश निदान एक पिढीपर्यंत तरी दरिद्री राहिला. १६५३ पर्यंत दक्षिण देशातून बादशाहाच्या खजिन्यात पैसे जमा झाले नाही. एवढेच नव्हे तर स्थानिक प्रशासनाचा खर्चही या भागाला करता येत नव्हते.अशा कठिण अर्थव्यवस्थेचा सामना करुन शिवरायांनी थोड्याच अवधीत दुष्काळावर मात करुन अर्थव्यवस्था व्यवस्थित केली."[२६]

या दुष्काळाविषयी अनेक ग्रंथातून याचा उल्लेख झालेला आहे. बादशहानामा या ग्रंथात १६३० च्या दुष्काळाबाबत काय लिहिले आहे ते पाहणे अगत्याचे ठरेल. बादशहानामा म्हणजे मुघल बादशाहाचे अधिकृत वर्तमानपत्र आणि सरकारी दस्तऐवज आहे. त्यामुळे यातील वर्णन अत्यंत खात्रीलायक असे आपणास समजता येते. बादशहानाम्यात दुष्काळाचे आलेले वर्णन असे आहे.

भाकरीच्या तुकड्यासाठी लोक स्वतःला विकून घ्यावयास तयार होते, पण विकत घेणाराच कोणी नव्हता. एका भाकरीसाठी आपल्या पदाचा त्याग करावयास लोक तयार होते, पण त्याची कोणाला पर्वा नव्हती. ज्या हातांनी इतरांना उदंड दान केले तेच हात आता भिक्षेसाठी पुढे पसरले होते, ज्या पावलांनी सदा सुखाचाच मार्ग क्रमिला होता. तीच पावले आता अन्नाच्या शोधासाठी बाहेर पडत होती. कित्येक दिवस कुत्र्याचे मास बकरीच्या मासाच्या दराने विकले जात होते. आणि मृतांच्या हाडाची भूकटी पीठात मिसळून ते विकले जात असे. शेवटी दारिद्र्य इतके शिगेला पोहचले की, माणसे माणसांना खाऊ लागली, आणि पुत्रप्रेमापेक्षा त्याचे मास पित्याला प्रिय वाटू लागले. मृतदेहांनी गावच्या रस्त्यात अडथळे निर्माण केले, आणि ज्यांना या यातनांनी मरण येत नव्हते आणि हालचाल करण्याचे त्राग अद्याप ज्यांच्यात होते ते परप्रांतात भटकेगिरी करण्यास निघून गेले.त्यामुळे स्वराज्यातील माणसे परागंदा होऊन स्वराज्य ओस पडले होते.अशा स्वराज्यात माणसांना आणून स्वराज्याचे रुपांतर सुराज्यात करण्याचे महत्त्वपुर्ण कार्य शिवरायांनी केले.

हा दुष्काळ इतका तीव्र स्वरुपाचा होता की, या देशाच्या इतिहासात त्याला तोड सापडणार नाही. अवर्षणामुळे जी धान्यटंचाई निर्माण झाली तेच या मोठ्या दुष्काळाचे मुख्य कारण होते. मराठी जनतेला दीर्घकाळ याचे परिणाम भोगावे लागले. कौटुंबिक जीवनाचे विघटन झाले होते.

कारण लोकांना अन्नासाठी दाही दिशा भटकावे लागे. शेतीव्यवसाय खचला, लोक स्वतःला गुलाम म्हणून विकून घेऊ लागले. भूकेने मरु लागले, उद्योग-धंदे संपुष्टात आली. म्हणजे या दुष्काळाने उद्योग-धंदे बसवलेत, माणसे भुकेने मरु लागलेत आणि लोक स्वतःचा जीव देऊ लागलेत अशा परिस्थितीत इतिहासच नव्हे तर भविष्यकाळातही असे दुष्काळ निवारण झाले नसेल होणार नाही. असे काम शिवबाराजे हाती घेतात. महाराजांचे कर्तृत्व आणि आर्थिक ज्ञान सतत या दुष्काळाच्या पृष्ठभूमीवर अत्यंत उठावदारपणे कोरलेले दिसते. अशा भयान परिस्थीतीतून देश आणि अर्थव्यवस्था बाहेर काढणे हे अशक्य कोटीतील काम होते. ते शिवाजी महाराजांनी हाती घेतले. ज्या परिस्थितीत माणसाला जगणे शक्य नाही अशा परिस्थितीत महाराज माणसे, जनावरे जगवतात त्यांना उभारी देतात आणि मगच आपल्या स्वराज्याचा कारभार सुरु करतात. उपासमारीने भरणारे लोक स्वप्नातही स्वराज्याचे स्वप्न पाहू शकत नाहीत. तेंव्हा त्यांना जगवावे, वाढवावे आणि मगच पुन्हा अशा भयान संकटात मग ते अस्मानी असो कि, सुलतानी यात ते सापडू नये म्हणून मजबूत अशा अर्थव्यवस्थेचा पाया घातला. अर्थव्यवस्थेत शेतीला महत्त्वाचे घटक समजून शिवरायांनी शेतीच्या नियोजनाकडे आणि शेती सुधारणाकडे भरपूर लक्ष दिले त्यामुळेच अशा भयान दुष्काळातून सुध्दा स्वराज्याची अर्थव्यवस्था टिकू शकली.[२७]

"१६५३ पर्यंत दक्षिण देशातून बादशहाच्या खजिन्यात एक पैही जमा झाला नाही. एवढेच नव्हे तर स्थानिक प्रशासनाचा खर्चही या भागाला करता येत नव्हता असे ' बादशाहानामा ' म्हणतो बादशाहानाम्यात १६३० च्या दुष्काळाचे भेदक वर्णन करण्यात आले आहे."

महाराष्ट्रावर या दुष्काळाचे परिणाम काय झाले हे स्थानिक साधनांच्या अभ्यासावरुन स्पष्ट होते. ' राधा माधव विलास चंपू' या समकालीन ग्रंथात या दुष्काळी परिस्थिती बाबत म्हटले आहे.

" शक १५५२ (१६३०) साली गोदातीरी अवर्षणाने भयंकर दुष्काळ पडला. एका हुनक्यास म्हणजे लहान होनास दोन शेर दाणे झाले. करवसुली शक्य नसल्यामुळे मूर्तिजाची आधीच

खंगलेली तिजोरी पूर्णपणे शुष्क होऊन गेली. फौज परागंदा, कारभारी अजुर्दा व मुलूख उकीर्डा बनून मूर्तिजा हलाखीच्या अगदी शेवटच्या पायरीस पोहोचला."

परमानंदाच्या शिवभारतात दुष्काळाचा थोडासा उल्लेख आहे, आणि तो म्हणतो, "पुष्कळ काळपर्यंत त्याच्या (अहमदनगरच्या) निजामशाहाच्या देशात पाऊस न पडल्याने धान्य अत्यंत महाग झाले आणि सोन मात्र स्वस्त झाले. श्रीमंत लोक शेरभर रत्ने देऊन मोठ्या प्रयासाने शेरभर कुळीथ घेत. खाण्यास काही न मिळाल्यामुळे एकच हाहाकार उडून जाऊन पशू पशूस आणि माणसे माणसांस अशी परस्परांसे खाऊ लागली." (शिवभारत अ.८:५३-५५)

तुकाराम महाराजांच्या अभंगातूनही समकालीन दुष्काळाची माहीती दिसून येते.

*मंद झाल्या मेघवृष्टी*

*अपीक धान्ये दिवसें दिवस।*

*गाई म्हैसी चेवल्या गोरसे ।*

*नगरी दिसती ऊध्वंसे ।। ३०३५ ।।*

*दुष्काळे अटिले द्रव्य नेला मान*

*स्त्री एकी अन्न अन्न करिता मेली ।*

*लज्जा वाटे जीवा त्रासलो या दुःखे*

*वेवसाय देवे तुटी येता ।। १३३३ ।।*

*बरे झाले देवा निघाले दिवाळे*

*बरी या दुष्काळे पीडा केलीत ।।१३३५ ।।*

दुसऱ्या एका अभंगात ते म्हणतात,

*" बाईल मेली मुक्ता जाली ।*

*देवे माया सोडविली ।।१।।*

*पोरे मेले बरे जाले*

*देवे मायाविराहित केले ।।२।। ७७८* [२८]

या अभंगातून ' बरे झाले ' असे तुकारामांनी म्हटले असले तरी दुष्काळामुळे त्यांची जी अपरिमित हानी झाली होती ती काही लपून रहात नाही. दुष्काळामुळे रयतेचे खूप हाल झाले होते.जीवन जगणे कठीण झाले होते.

*बरगासाठी (दुष्काळासाठी) खादले शेण मिळता अन्न न सोडी ।। ८५ ।।*

संत तुकाराम महाराज म्हणजे पुण्यातील सर्वात मोठे सावकारांचे सावकार म्हणजे महाजन होते. कौटुंबिक नुकसान तर खूप मोठ्या प्रमाणात झाले होते.कारण या दुष्काळात त्यांची पत्नी आणि मुले मृत्यू पावली परंतु त्याचे दुःख करत न बसता त्यांनी अनेक लोकांना आपल्याकडील कर्जाची मागणी न करता त्यांना कर्जमुक्त केले.आजच्या काळात कोणतेही शासन अशा प्रकारचे औदार्य दाखवू शकत नाही. परंतू संत तुकाराम महाराजांनी १७ व्या शतकात हे जे औदार्य दाखविले त्याला तोड नाही.

या दुष्काळाचे वर्णन एका समकालीन डच व्यापाऱ्याने केले आहे. तो म्हणतो,"लोकांची एकच मागणी होती आम्हास अन्न द्या अथवा मारुन टाका." आणखी एका ठिकाणी इंग्रज फॅक्टरी रेकॉर्डमध्ये काय म्हटले आहे बघा," गुजरात ते गोवळकोंडा हा सारा प्रदेश म्हणजे एक मोठी स्मशानभूमीच बनली होती. आणि माणसांच्या स्मृतीत एवढा मोठा दुष्काळ आणि एवढी प्रचंड हानी याची नोंद नव्हती. आपल्याला छत्रपती शिवाजी महाराजांना समजून घ्यायचे असेल तर त्यांच्या आर्थिक नीतीचा अभ्यास करणे गरजेचे आहे. त्यांची स्वराज्य उभारणी आणि आर्थिक क्रांती अभ्यासायची आहे. ते या दुष्काळाच्या पार्श्वभूमीवर शिवाजी महाराजांनी निर्माण केलेले स्वराज्य या अशा बिकट दोन दशकातील दुष्काळाच्या खाईतून पार केलेले एक मोठे अग्निदिव्य आणि जगाच्या पाठीवरील अजोड असे ध्येय होते. हा दुष्काळ कायमस्वरुपी निवारण होण्यासाठी दूरगामी आणि प्रभावी ठरेल अशी अर्थनीती तयार केली आणि त्यानुसार शिवाजी महाराजांनी स्वराज्यातील दुष्काळावर मात करुन जगात एक आदर्श घालून दिला की,दुष्काळातही कशी मात करता येऊ शकते आणि आपल्या रयतेला सुखी आणि समाधानी ठेवता येते हि त्यांच्या अर्थनीतीतील यश

होते. शिपायाचा पगार  एक होन होता. अष्टप्रधान मंडळातील मंत्र्याचा वार्षिक पगार १०,००० होन होता. यावरुन छत्रपती शिवरायांची अर्थनिती दिसून येते. उजाड आणि ओसाडगावे, शहरे वसविण्यासाठी महाराजांनी जगातील पहिली रोजगार हमी योजना सुरु केली. लोकांच्या हाताला काम दिले. धरणे बांधली, तलाव खोदले, विहिरी बांधल्या, कालवे काढले, रस्ते बनविले, पशुधन वाचविले आणि वाढविले ही शिवरायांची अर्थ नीती होती.[२९]

छत्रपती शिवाजी महाराजांनी जमिनीचे राष्ट्रीयकरण करुन भूमिहिनांना जमीन दिले.त्याचबरोबर बी-बियाणे, बारदाणा, अवजारे, बैलजोडी दिली. आणि इतर किफायतशीर सवलती देऊन गावे-शहरे वसवायला प्रेरीत केले. त्यानंतर लष्करी शक्ती वाढविली. स्वराज्याची बांधणी केली आणि १६५६ नंतर मग व्यापार, उद्योग याकडे लक्ष देत स्वराज्याला आर्थिक स्थैर्य मिळवून दिले.

पहिल्या वर्षी १ रुका

दुसऱ्या वर्षी २ रुके

तिसऱ्या वर्षी ९ रुके

पाचव्या वर्षी १२ रुके

सहाव्या वर्षी अर्धा रुपया

सातवर्षी १ रुपया

या सात वर्षात शेती-उद्योग भरभराटीला आल्यानंतर मलिक अंबरी पध्दतीप्रमाणे उत्पादन खर्चाच्या २/५ एवढा शेतसारा भरावा. यामुळेच अत्यंत कमी कालावधीत फार मोठ्या प्रमाणावर लोकांना प्रोत्साहन मिळून मोठ्या प्रमाणात स्वराज्यात आर्थिक भरभराट आली आणि स्वराज्याच्या विस्तारही वेगाने झाला. उजाड ओसाड गावे ते विकसित शहरे असा प्रवास महाराजांनी १६४५ ते १६६५ या वीस वर्षात केला. यावरुन छत्रपती शिवरायाचा आर्थिक क्षेत्रातील वैज्ञानिक दृष्टिकोन

दिसून येतो.स्वराज्य बलाढ्य करण्यासाठी आर्थिक क्षेत्रात परिपूर्ण असणे गरजेचे आहे.त्यासाठी शेती हा मुख्य व्यवसाय केवळ निसर्गावर अवलंबून न राहता त्यावर जलसिंचनाची व्यवस्था तसेच पर्यावरण संतुलन राखून येणाऱ्या संकटाना विशेषतः दुष्काळावर मात करुन शिवरायांनी अन्नधान्याच्या बाबतीत स्वराज्याला स्वंयपूर्ण बनविले.[३०]

## सामाजिक क्षेत्रातील वैज्ञानिक दृष्टिकोन -

छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वराज्याचे सुराज्यात रुपातंर करीत असतांना रयतेला सर्व सुखी सोईंनी समृध्द करण्याचा प्रयत्न केलेला आहे. मध्ययुगीन काळात सामाजिक परिस्थितीत म्हणावे तसे बदल घडवून आले नाहीत. परंतु शिवरायांनी आपल्या स्वराज्यात आर्थिक, सामाजिक, धार्मिक क्षेत्रात आमूलाग्र बदल घडवून आणण्याचा प्रयत्न केलेला आहे. तत्कालीन काळात रयतेवर अंधश्रध्देचा प्रंचड पगडा होता. तो शिवरायांनी झुगारुन दिला. ही गोष्ट त्यांनी आपल्या स्वतःच्या आचरणाने दाखवून दिली. मध्ययुगीन काळात समाजावर राज्याच्या वर्तनाचा खूप प्रभाव होता. एखादी गोष्ट राजा करीत असेल तर प्रजा सुध्दा त्याचे अनुकरण करत. म्हणून शिवरायांनी स्वतःअंधश्रध्देचा त्याग करुन सामाजिक क्षेत्रात समता प्रस्थापित करुन अंधश्रदेला मूठमाती दिली. तर्कनिष्ठ आणि वैज्ञानिक दृष्टिने विचार करुन सामाजिक क्षेत्रात विज्ञानवादी विचाराला चालना दिली.समाजामध्ये डोळसपणा निर्माण केला.[३१]

छत्रपती शिवाजी महाराजांनी आपल्या स्वराज्यात राहणाऱ्या रयतेला सामाजिक बाबतीत जे बदल घडवून आणले. त्याचा आढावा घेण्यापूर्वी मध्ययुगीन काळात सामाजिक स्थिती कशी होती. याचाही आढावा पुढील प्रमाणे आहे.

### राजा -

मध्ययुगीन समाजव्यवस्थेचा सरंजामशाही हा पाया होता. राजा हा या समाजव्यवस्थेचा प्रमुख होता. समाजजीवनाच्या सर्वच क्षेत्रावर त्याचा एकाधिकार चालत असे. राजाच्या कुटुंबातील

व दरबारातील प्रत्येक व्यक्तीचे भवितव्य हे राजाच्या मर्जीवर अवलंबून असल्याने राजाची मर्जी संपादन करण्यासाठी प्रत्येकाची धडपड असे.

**सरदार**

साम्राजातील बहुतेक महत्वाची पदे ही सरदारांच्या हाती असत. त्यांना राजाचा पाठिंबा असल्याने समाजात त्यांना मोठी प्रतिष्ठा असे. तत्कालीन समाजातील प्रत्येक कर्तबगार व महत्वाकांक्षी व्यक्ती सरदार बनण्यास उत्सुक असे. हा समाजातील श्रेष्ठ वर्ग असे.

**मध्यम वर्ग -**

या वर्गात श्रीमंत व्यापारी, व्यावसायिक व कनिष्ठ श्रेणीच्या मसबदारांचा समावेश होत असे. या वर्गातील श्रीमंत व्यापारी त्याच्या संपत्तीवर वरिष्ठांची नजर पडू नये म्हणू स्वतःची संपत्ती दडवून ठेवत. बर्नियरच्या मते व्यापारी वर्ग नेहमीच गरिबीचे सोंग घेऊन वावरत असे, परंतु पश्चिम किनाऱ्यावरील श्रीमंत व्यापाऱ्याची स्थिती भिन्न होती. ते व्यापारात अमाप पैसा कमवित. त्याचे प्रदर्शनही करीत व त्याचा उभोगही घेत. त्यांना वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून त्यांच्या मालमत्तेचे अपहरण होण्याची भीती वाटत नसे. सावकारीच्या धंद्यात ते अमाप पैसा कमवित.एकंदरीत श्रीमंत व्यापारी दर्जेदार जीवनप्रणालीने जगत असे.[३२]

**कनिष्ठ वर्ग -**

कनिष्ठ वर्गात लहान व्यापारी, दुकानदार, कारागिर, घरकाम करणारा नोकरवर्ग, शेतकरी, गुलाम इ.समावेश होत असे. त्यांच्यापैकी एखाद दुसरा अपवाद वगळता इतरांचे जीवन अतिशय कष्टमय होते. त्याची वस्त्रे जाडीभरडी असून त्यांच्यापैकी अत्यल्प पादत्राणांचा वापर करीत. त्यांच्या गरजा मर्यादित होत्या. त्यांचे जीवन अत्यंत साधे व धोपटमार्गी असे. त्यातल्या त्यात लहान व्यापारी व दुकानदार यांची परिस्थिती बरी असे, जे नोकर सरकारी अधिकाऱ्यांकडे काम करीत

त्यांची समाजातील लोकांशी वागणूक अत्यंत उद्दामपणाची असे कारागिरांचे जीवन हलाखीचे होते. त्यांना पोटाची खळगी भरण्यासाठी सतत भ्रमंती करावी लागत असे.

## रुढी-परंपरा -

मध्ययुगीन काळात समाजात रुढी व परंपरांना अत्यंत महत्व होते. हिंदू धर्मामध्ये सोळा संस्कार खूप महत्त्वाचे समजल्या जातात. जन्मापासून ते मृत्यू पर्यंत मानवी जीवनाच्या विविध टप्यावर या सोळा संस्काराचे वर्गीकरण करण्यात आलेले होते. त्यापैकी विवाह संस्कार खूप महत्त्वाचे समजल्या जात असे. एखाद्या व्यक्तिला समाजाने स्विकारण्यासाठी त्या व्यक्तीने विवाह हा केलाच पाहिजे असे संकेत होते. त्याच बरोबर अंतिम संस्कार समजला जाणारा अंत्यसंस्कार अतिशय महत्त्वाचा होता.मृत्यू म्हणजे जीवन संपणे नव्हे तर आत्मा एका शरिरातून दुसऱ्या शरिरात प्रवेश करतो अशी हिंदू धर्मियांची समजूत होती. हिंदू धर्मात विवाहाचे आठ प्रकार मानले जात होते.त्यापैकी चार प्रकारच्या विवाहांना समाज मान्यता होती. तर चार प्रकारच्या विवाहाना समाज मान्यता नव्हती. विवाह हा पवित्र संस्कार मानला जात असे.

## स्त्रियांचा दर्जा -

मध्ययुगीन काळात स्त्रीला कुटुंबात सन्मानाचे स्थान होते. स्त्री ही स्वभावतःच त्यागी, सहनशिल, प्रेमळ व निष्ठावान असल्याने तिच्या शब्दाला कुटुंबात वजन असे. तिच्यावरच घरचे घरपण अवलंबून असे. मुस्लिम समाजात बहुपात्नित्व प्रथा होती. काही हिंदूही एकापेक्षा जास्त स्त्रियांशी विवाह करीत. मुसलमानांमध्ये घटस्फोट आणि पुर्नविवाह या गोष्टी सर्रास होत्या. हिंदू मध्ये घटस्फोटाला मान्यता नव्हती. कारण त्यांच्यात विवाह हा करार नसून पवित्र बंधन समजले जाई. हिंदूमध्ये सतीप्रथा होती. ज्या कुटुंबातील विधवा स्त्री सती जात असे त्या कुटुंबाला समाजात समाजात फार मोठी प्रतिष्ठा प्राप्त होत असे.[३३]

## शिवाजी महाराजांपूर्वी महाराष्ट्रातील सामाजिक स्थिती -

दक्षिण भारतात बहमनी साम्राज्याच्या कालखंडात (इ.स.१३४७ ते १४९०) महाराष्ट्रातील समाजजीवन तेजोहीन बनले. क्षात्रवृतीच्या मराठ्यांना यवनी राज्याच्या दरबारात स्थान मिळू शकले नाही. बहमनी दरबारात हिंदू धर्माचा राजाश्रय संपला. त्यामुळे ब्राम्हणांचा सुध्दा राजाश्रय संपला. त्यामुळे अनेक ब्राम्हणांनी काशी-प्रयागकडे प्रयाण केले. काहींनी विजयनगरच्या राजाचा आश्रय घेतला. संस्कृतचे वर्चस्व संपले. मराठीचे कौतुकही संपुष्टात आले. फारशी भाषेला राजदरबारी स्थान प्राप्त झाले. फारसी व उर्दु या भाषांना महत्व प्राप्त झाल्यामुळे कारकुनी नोकऱ्या मिळविण्यासाठी हिंदू लोक या भाषांचा अभ्यास करुन प्राविण्य संपादन करु लागले.

शाही राजवटीच्या काळात सर्व सामान्य जनतेची परिस्थिती मात्र खरोखरच दयनीय अशी होती. सामाजिक विषमता मोठ्या प्रमाणावर होती. स्त्रियांचे क्षेत्र घराच्या चार भिंतीपुरते मर्यादित झाले होते. बहुजन समाज अक्षरशत्रु होता. राज्यकर्ते मुस्लिम असल्यामुळे त्यांच्या संस्कृतीचा व आचार विचारांचा प्रभाव सामाजिक जीवनावर पडू लागला होता. मुस्लिमांचा विजार कुडता हा पोशाख हिंदूनी स्वीकारला. मुस्लिमांची गोषा पध्दतीही काही हिंदू जातींनी उचलली. बालविवाहाची पध्दत रुढ झाली. फारसी भाषेचा प्रभाव इतका वाढला की, मराठी वाक्यरचनाही फारसी वाक्यांच्या धर्तीवर केली जाऊ लागली. अनेक अरबी व फारसी शब्द प्रादेशिक भाषांत मिसळून गेले. इ.स. १६२८ च्या सुमारास कागदपत्रांतून केवळ १४.६ टक्के मराठी शब्द येत असल्याचे दिसते. शिवपूर्वकाळातील एका मराठी लेखात दीडशे शब्दांपैकी केवळ सातच मराठी शब्द आढळून आले. यावरुन मराठी भाषेवर कोणती संक्रांत आली होती. ते स्पष्ट होते. अशा परिस्थितीत गोव्यामध्ये मात्र ख्रिश्चन धर्माचा प्रसार करण्यासाठी मराठी भाषेत वाङ्मय निर्माण होत होते. फादर थॉमस स्टिफन्स (१५४९-१६१९) या धर्मोपदेशकाने इ.स. १६१६ मध्ये मराठी भाषेत 'ख्रिस्त पुराण' लिहिले. गोव्यामध्ये मोठ्या प्रमाणावर ख्रिश्चनी करणाचे प्रयत्न चालू होते.

राजकीय दृष्ट्या सर्वसाधारण जनता या काळात न्यूनगंडाने पछाडली होती. 'स्वराज्य स्वातंत्र्य ' या कल्पना इतिहास जमा झाल्या होत्या. सुलतानांच्या लहरी नुसार तयार होणारे आणि अमलात येणारे कायदे निमूटपणे मान्य करण्याची त्यांना सवय झाली होती. अन्यायाविरुध्द आवाज उठविण्याची शक्ती त्यांच्यामध्ये शिल्लक राहिली नव्हती.गुलामी प्रवृत्ती लोकांमध्ये वाढत गेलेली दिसून येते.[३४]

## वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या आधारे छत्रपती शिवरायांनी केलेली सामाजिक क्रांती -

छत्रपती शिवाजी महाराज केवळ योध्दे नव्हते तर उत्तम प्रशासक व समाजसुधारक सुध्दा होते. तत्कालीन समाजावर अंधश्रध्देचा जो प्रचंड पगडा होता. तो त्यांनी आपल्या आचरणाने अंधश्रध्देचा त्याग करुन रयतेपुढे आदर्श निर्माण केला. म्हणून रयतसुध्दा त्यांच्या आचरणाचे अनुकरण करु लागली. त्यामुळे ज्या काही अनिष्ठ रुढी, परंपरा होत्या त्याचा रयतेने त्याग केला.अधश्रध्देतून शिवरायांनी तत्कालीन समाजाची सुटका केली.

## सती प्रथेवर बंदी -

मध्ययुगीन काळात हिंदू धर्मात सती जाण्याची पध्दत होती. सती जाणे म्हणजे स्त्रीचे कर्तव्यच आहे. ती जर सती गेली तर तिला स्वर्ग मिळतो. अशी धारणा निर्माण करण्यात आलेली होती. सती न जाणाऱ्या स्त्रीच्या पती प्रेमाविषयी शंका घेतल्या जात असे. शहाजी राजे कर्नाटक प्रांतात असतांना होदगिरे या परगण्यात एका नरभक्षक वाघाने धुमाकूळ घातला. शेकडो लोकांचे एका मागून एक असे नरडे फोडण्याचे प्रकार वाढू लागले. तेंव्हा शहाजी राजे यांचेकडे त्या ठिकाणी जनतेने या नर भक्षक वाघाचा बंदोबस्त करण्याची विनंती केली. म्हणून शहाजी राजे स्वतः या नर भक्षकाचा बंदोबस्त करण्यासाठी होदीगरे या ठिकाणी दाखल झाले. याच ठिकाणी त्या नर भक्षक वाघाचा पाठलाग करीत असतांना भरधाव घोड्याचा पाय राणवेलीत अडकुन घोडा पडला आणि याच अपघातात शहाजी राजे मृत्यूमुखी पडले इ.स.१६६४ मध्ये सर्व काही अनपेक्षित असे घडले.

शहाजी राजे यांच्या निधनाची बातमी ताबडतोब महाराष्ट्रात राजगडावर जिजाऊ साहेबांपर्यंत पोहचविण्यात आली. जाणात्या राजाचे सेवक कशा प्रकारे जाणते असतात याचे ज्वलंत उदाहरण म्हणजे शहाजी राजांच्या सहकाऱ्यांनी ही बातमी शिवाजी महाराजांना आणि जिजाऊ साहेबांना एकाच वेळी मिळेल याची खबरदारी घेतली. शिवाजी महाराज त्यावेळी सुरतेच्या लढाईवर होते. सुरतेवर छापा टाकून परत फिरले होते आणि तेवढ्यात ही वाईट बातमी राजगडापासून १५० मैलाच्या अंतरावर असतांना शिवाजी महाराजांना मिळाली.[३५]

छत्रपती शिवराय जलद गतीने राजगडच्या रोखीने निवडक सहकाऱ्यांसह घोड्यानिशी निघाले. इकडे राजगडावर शिवाजी महाराज हजर नसल्याचा फायदा घेण्याचे धर्मपंडीतांनी ठरवले. शिवाजी महाराजांचे स्वराज्य बुडवावे यासाठी अनेकवेळा यज्ञ-याग केलेली मंडळी संधी चालून आल्याचे पाहून मनातून खूप आनंदी झाले. एका दिवसात महाराज राजगडापर्यंत पोहचणे अवघड आहे आणि जिजाऊ साहेब राजगडावर एकट्या आहेत ही संधी म्हणजे धर्म मार्तंडासाठी मोठी पर्वणीच होती. जिजाऊ साहेबांना धर्माचे दाखले देत सती जाण्यासाठी धर्म मार्तंड, कारभारी मंडळी सल्ला देऊ लागली. " परलोकांत महाराज आपली वाट पहात आहेत. आपण सती जाण्याने त्यांना स्वर्ग मिळेल." या आणि इतर अनेक गोष्टी सांगून जिजाऊ साहेबांना मानसिक दबावाखाली आणले जात होते. नेहमी धर्ममार्तंडाच्या थोतांडाना पुरुन उरणाऱ्या जिजाऊ साहेब आपल्या पतीच्या निधनामुळे झालेल्या दुःखाच्या डोंगराखाली दबून गेलेल्या असतांना धर्ममार्तंड आणि कारभारी मंडळी शिवाजी आणि संभाजी सारखे युगपुरुष घडविण्याऱ्या जिजाऊसाहेब रुपी क्रांतिसूर्य दडपण्याचा प्रयत्न करीत होते.[३६]

जिजाऊ साहेब म्हणजे स्वराज्याचे सुप्रीम कोर्ट होते. संकटकाळी शिवाजी महाराजांच्या पाठीशी ठामपणे उभे राहणाऱ्या आणि सामाजिक सुधारणा करीत असतांना तरुण पिढीला पुढे करणाऱ्या माँ साहेब महाराजांचे शक्तीस्थळ होते,कवचकुंडल होते. तेच महाराजांचे मर्मस्थानही होते. म्हणूनच महाराजांच्या गैर हजेरीचा पुरता लाभ उचलण्याचा प्रयत्न कारभारी मंडळी आणि

धर्ममार्तंडांनी केला. अचानक कोसळलेल्या या दुःखाच्या डोंगराखाली जिजाऊ साहेब दडपून गेल्या होत्या. राजे महाराष्ट्राबाहेर तर शंभू राजे अगदी लहान होते. या असहाय्यपणाचा लाभ उठवत त्यांना सती जाण्यासाठी तयार केले जात होते. शिवाजी महाराजांच्या गैरहजेरीत कारभाऱ्यांची ही चाल इतर कोणाच्याही लक्षात सहज येण्यासारखी नव्हती. परंतु महाराणी पुतळाबाईनी कारभाऱ्याच्या सगळ्या स्वराज्यावर घाला घालणाऱ्या मनसुभ्यावर पाणी फेरले. त्यांनी राजगडावर हजर असणाऱ्या तल्लख बुध्दीच्या आणि जिजाऊ साहेबांच्याच तालमीत वाढलेल्या बाल संभाजी राजांना मदतीला घेतले. जिजाऊ साहेब ज्या ठिकाणी सती जाण्यासाठी वस्त्रे परिधान करणार होत्या. त्या ठिकाणी घेऊन आल्या. अत्यंत वेदनामय परिस्थिती असल्यामुळे जिजाऊ साहेबांनी स्वतःला एका महालात बंद करुन घेतले होते. पुतळाबाईंनी संभाजी राजांना सर्वकाही समजावून सांगितले आणि त्याप्रमाणे संभाजी राजांनी आपल्या चिमुकल्या परंतु क्रांतिकारी हातांनी दरवाजावर थाप टाकली. दरवाजा पुन्हा पुन्हा वाजवूनही आतून काहीच आवाज किंवा प्रतिसाद येत नव्हता. संभाजी राजे जोरजोराने दरवाजावर थाप मारीत होते. परंतु जिजाऊ साहेबांवर त्याचा काही परिणाम होत नव्हता. त्या जवळपास बेशुध्द अवस्थेत होत्या आणि मग निर्णायक क्षण येवून पोहचला होता.[३७]

राजमाता जिजाऊंनी जेंव्हा सती जाण्याचा निर्णय घेतला तेंव्हा शंभू राजांनी अक्षरक्षः हबंरडा फोडला.'आऊ साहेब दार उघडा नाहीतर आम्ही याच उंबरठ्यावर डोके आपटून थोरल्या आबासाहेबाकडे जातो.' बाळ राजांनी फोडलेला हा टाहो कामी आला.वासराने हंबरडा फोडल्यावर जशी गाय असेल तेथून धावत वासरा पर्यंत पोहचते तशा जिजाऊ साहेब भानावर आल्या आणि त्यांनी दरवाजा उघडला. दरवाजात रडत उभे असलेल्या बाळ संभाजी राजांना छातीशी कवटाळले. पुतळाबाईसुध्दा जिजाऊ साहेबांच्या गळयात गळा घालून रडू लागल्या. एवढे सगळे होत असतांना शंभू राजांनी मात्र आपले धैर्य सोडले नव्हते. लहान वयाचा हा बाळ राजा आऊ साहेबांना गळ घालीत होता, "तुम्ही जर थोरल्या आबासाहेबांकडे जाणार तर मग आमच्या आबासाहेबांनी कोणाकडे जायचे ? आणि आऊसाहेब, तुम्ही तर हे ही विसरलात की, आमच्या आऊ तर तुम्हीच आहात मग आम्हीही तुमच्याबरोबर स्वर्गात येणार! नेणार ना आम्हाला तुमच्या सोबत ?" बाळ

राजांचे ऱ्हदयाच्या आरपार जाणारे हे शब्द ऐकले आणि जिजाऊ साहेबांना शहाजी राजांनी दिलेले वचन आठवले "जाधव, भोसले, निबांळकर या तीन घरण्यांनी गेल्या तीन पिढ्यापासून आरंभलेला स्वराज्य स्थापनेचा संकल्प शिवबाकडून पूर्ण करुनच विश्रांती घ्या." हा संकल्प सिध्दीला नेण्यासाठी १६२९ साली निजामाच्या भर दरबारात दगा फटका करुन लखोजी राजे आणि जिजाऊ साहेबांच्या तीन भावांचा खून पाडण्यात आल्यानंतहरी जिजाऊ साहेबांच्या मातोश्री म्हाळसाबाई राणीसाहेब आणि त्यांच्या तीनही सुना सती न जाता काळाचा मुकाबला करण्यास मागे थांबल्या होत्या. अशा म्हाळसाराणीसाहेब सिंदखेड राजासारखे वसविलेले वैभव संपन्न शहर सोडून जिजाऊ साहेबांच्या पाठीशी ठाम उभे राण्यासाठी पुण्यात येऊन राहिल्या होत्या. जिजाऊ साहेबांच्या डोळ्यासमोर हे सर्व चित्र उभे राहिले. आपली आई, तीन भावजया स्वराज्याचा संकल्प पूर्ण करण्यासाठी सती न जाता आपल्याला साथ सोबत करण्यासाठी थांबल्या असल्याचे स्मरणात आले आणि धर्म मार्तंडांनी त्यांना जिवंतपणे सरणात ढकलण्याचा जो कट रचला होता तो हाणून पाडण्यात आला.[३८]

" आऊ साहेब ! आपण सती जाणार नाही ना ? आमच्यासाठी आमच्या आबासाहेबांसाठी थांबणार ना !" अशी गळ घालून शंभू राजांनी जिजाऊ साहेबांचे सती जाणे मोठ्या मुत्सद्देगिरीने थांबविले, आणि जिजाऊ साहेबांनी कबुलच केले, " आम्ही तुमच्यासाठी, तुमच्या आबासाहेबांसाठी आणि शहाजी राजांचा स्वराज्याचा संकल्प पूर्ण करण्यासाठी सती जाणार नाही. आम्हीच तुमच्या दोघांचेही आबासाहेब आणि आऊ साहेब तुम्हाला एकटे सोडून आम्ही कोठेच जाणार नाही." जवळच उभे असलेल्या पुतळाबाईंना संभाजी राजांच्या या कर्तृत्वामुळे खुपच हायसे वाटले आणि स्वराज्याचा उभा डोलारा कोसळतांना तोलून धरणाऱ्या बाळ संभाजी राजांचे कौतुकही वाटले.

स्वराज्याचा संकल्प पूर्ण करीत असतांना आणि स्वराज्य रक्षण करीत असतांना मराठे रणांगणावर धारातीर्थी पडले तर त्यांची स्वप्ने पूर्ण करण्यासाठी मराठ्यांच्या स्त्रिया स्वर्गात जाण्यासाठी सती जाण्याऐवजी जीवात जीव असेपर्यंत लढतील आणि हा महाराष्ट्र गनिम मुक्त

करुनच मुक्ती मिळवतील. जिजाऊ साहेबांचे हे शब्द पूर्ण झालेले आपणांस पहावयास मिळतात. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर सोयराबाई सती गेल्या नाहीत (इ.स.१६८०) संभाजी महाराजांच्या मृत्यूनंतर येसूबाई सती गेल्या नाहीत. (इ.स.१६८९) आणि राजाराम महाराजांच्या नंतर ताराराणी सुध्दा सती गेल्या नाहीत. (इ.स. १७००)

स्वराज्याच्या संकल्पासाठी मराठे मरतात परंतु स्वराज्य रक्षणासाठी मराठ्यांच्या स्त्रिया मृत्यूशी दोन हात करीत जिवंत असतात त्याचा हा पुरावा होय. त्यामुळे सतीची चाल या देशात बंद करण्याचा मान मिळतो. तो या महाराष्ट्रालाच आणि तोही शिवाजी महाराजांच्या आजी म्हाळसाराणी साहेब (१६२९) आऊसाहेब जिजाऊंना (१६६४) म्हाळसाराणी साहेब आणि जिजाऊ साहेब जर सती गेल्या असत्या तर स्वराज्याची संकल्पना अस्तित्वात येण्या अगोदरच संपुष्टात आली असती. तसेच अनेक स्त्रिया हकनाक सतीच्या अनिष्ठ प्रथेला बळी पडल्या असत्या. म्हणून जिजाऊ साहेब हेच स्त्रियांचे आराध्य दैवत आणि मुक्ती देवता आहेत.ज्यांनी स्वतः सती न जाण्याचा घेतलेला निर्णय क्रांतीकारक ठरला.भविष्यात अनेक स्त्रीया सती प्रथेपासून मुक्त राहिल्या.[३९]

**राजारामांचा जन्म प्रसंग आणि शिवरायांचा वैज्ञानिक दृष्टिकोन -**

सिंहगड ताब्यात घेऊन पंधरा दिवस झाले होते. तानाजी मालुसरे ने आपल्या बलिदानाने कोंडाण्याचे नामकरण 'सिंहगड' असे केले होते.

राजगडावर महाराणी सोयराबाईंना पुत्र रत्नाचा लाभ झाला. दि.२४ फेब्रुवारी १६७० रोजी राजगडावर बालराजांचा जन्म झाला तेंव्हा सासवडमधील अनेक ब्राम्हण मंडळी न बोलविता राजगडावर बालाराजांच्या जन्म घटीकेची दिशा गृहस्थिती पाहू लागले. आकडेमोड करु लागले आणि सर्वांनी आपले चेहरे गंभीर केले. शिवाजी राजे नेमके महालाच्या दिशेने त्याचवेळी येते होते. राजांना पाहताच ब्राम्हण मंडळीने मुलगा पालथा जन्माला येणे अपशकून असल्याचे सांगत या

संकटातून मुलाला बाहेर काढण्यासाठी नवगृह शांती करावी लागेल असे सांगितले. शिवाय पुढील अरिष्ठ टळावे यासाठी ब्राम्हण भोजने घालावी लागतील व दानधर्म करावा लागेल असे सुचविले.तेंव्हा शिवाजी राजे म्हणाले,माझा मुलगा पालथा जन्माला आला ते एका अर्थाने योग्यच आहे. पालथा जन्माला आलेला हा पुत्र, "दिल्लीची पातशाही पालथी घालण्यासाठी जन्माला आला आहे. याचे हे सुचक आहे. तसा संकेतच त्याच्या पालथ्या जन्माला आल्याने दिला आहे. यावरुन शिवराय अंधश्रध्देला न मानता वैज्ञानिक दृष्टिकोन बाळगणारे होते हे सिध्द होते.[४०]

जिजाऊ साहेबांची वाणी अगदी परखड असायची. त्यांनी शिवाजी राजांना कधीच अंधश्रध्देच्या वाटेला जाऊ दिले नाही. माणसाने नेहमी आपल्या विचारावर व कर्तृत्वावर विश्वास ठेवायचे हे शिकविले प्रयत्नाची कास धरण्याचे शिकविले. दैववादावर अवलंबून न राहता व्यक्ती कर्तृत्वाने घडतो आपला पुरुषार्थ गाजविल्याने घडतो ही शिकवण जिजाऊनी शिवरायांना दिली.

## सर्व समाजघटकांना संधी -

स्वराज्यातील कुणबी, महार, रामोशी, कुंभार, न्हावी,तेली, सोनार, कोळी, माळी, मांग आदि अठरापगड जातीच्या मावळ्यांना शिवरायांनी आपापले कौशल्या दाखविण्याची संधी दिली. नरहर कुरुंदकर यांच्या मते पहिली गोष्ट म्हणजे शिवाजी कुशल सेनानी, युध्दतज्ञ होता. यात वाद नाही. पण याखेरीज तो मुलकी कारभाराचा तज्ञ होता. जनतेच्या इहलौकिक कल्याणाची जबाबदारी राजाची आहे. असे त्याला वाटे. इतक्या लढाया तो लढला, पण त्यासाठी प्रजेवर नवे कर त्याने लादले नाहीत. राज्याभिषेकाचा खर्चही वतनदारांवर कर लावून त्याने काढला. जनतेवर कराचा बोजा वाढविला नाही."

## अस्पृश्यता निवारण -

प्रतापगडाचे बांधकाम पूर्ण झाल्यावर हिरोजी इंदूलकरांनी गडावर तुळजाभवानीचे मंदिर बांधले. या मंदिरातील मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करतांना अस्पृश्यांना मंदिरात प्रवेश देऊ नये. असे

तिथल्या पुजाऱ्याने सांगितले. परंतु छत्रपती शिवरायांनी पुजाऱ्याच्या म्हणण्याला न जुमानता अस्पृश्यांना मंदिरात जाऊ देण्याचे आदेश देऊन समताधिष्ठितसमाजाची निर्मिती करुन वैज्ञानिक दृष्टिकोनाचा पायंड़ा घातला.हा सामाजिक समतेचा सल्ला शिवरायांनी १७ व्या शतकात महाराष्ट्राला दिलेला आहे. [४१]

## धार्मिक क्षेत्रातील वैज्ञानिक दृष्टिकोन -

छत्रपती शिवाजी महाराजांनी आपल्या स्वराज्यात सर्वांना समानतेची वागणूक दिली. जात, धर्म, पंथ, संप्रदाय असा भेदभाव न करता सर्वांना समानतेची वागणूक दिली. एखादा राजा किंवा सम्राट आपल्या प्रजेला तेंव्हाच समानतेची वागणूक देऊ शकतो. जेंव्हा त्या व्यक्तीच्या अंगी वैज्ञानिक दृष्टिकोन आहे. वैज्ञानिक दृष्टिकोन अंगी नसणारा व्यक्ती अंधश्रध्दा आणि खुळचट विचार करुन अंधश्रध्दापूर्ण वर्तन करीत असतो. आणि त्या व्यक्तीच्या वर्तनाचा परिणाम समाजावर होऊन समाजाचे धार्मिक धोरण सुध्दा दोषयुक्त होत असते. म्हणून शिवरायांनी आपल्या अंगी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा स्विकार केल्यामुळे धार्मिक धोरण संतुलित राहिले. तदवतच शिवरायांच्या स्वराज्याचे रुपांतर सुराज्यात झाले. त्याचे मुख्य कारण म्हणजे शिवाजी महाराजांच्या काळातील धार्मिक धोरण होय. [४२]

## मध्ययुगीन काळातील धार्मिक परिस्थिती :

हिंदूचे धार्मिक सण आणि उत्सव : हिंदू व मुसलमान दोघेही उत्सव प्रेमी होते. हिंदूचे सण पुढील प्रमाणे होते.

**होळी** :

होळी हा सण फाल्गुन (मार्च) महिन्यात साजरा केला जाई. होळी हा सण शुद्रवर्गात विशेष लोकप्रिय होता. यादिवशी रंग, गुलाल यांची परस्परांवर मुक्त उधळण केली जाई. मध्ययुगीन काळात जे परकीय प्रवासी भारतात आले त्यांनी त्यांच्या प्रवास वर्णनात या सणाचे सविस्तर वर्णन

केले आहे. वरिष्ठ हिंदू वर्गातही हा सणअतिशय उत्साहाने साजरा होई. श्रीकृष्ण चरित्राशी या सणाचे नाते असल्याचे मथूरा, वृंदावन या भागात हा सण अतिशय धूमधडाक्यात साजरा होई.

**दसरा (विजयादशमी) :**

विजयादशमी दसरा हा क्षत्रियांचा अत्यंत प्रिय सण होता. रामाने रावणावर मिळविलेल्या विजयाप्रित्यार्थ हा सण साजरा केला जाई. या दिवशी क्षत्रिय त्यांच्या शस्त्रांची पूजा करीत. रस्त्यावरुन रामाच्या मूर्तीची मिरवणूक काढली जाई. मोगल दरबारातही हा सण उत्साहाने साजरा होई.[४३]

**दिपावली :**

हा वैश्यांचा प्रमुख सण होता. कार्तिक महिन्यात येणाऱ्या या सणासाठी घराची साफसफाई करुन सायंकाळी घरावर दिवे लावून लक्ष्मी या संपत्तीच्या देवतेची पूजा करीत. या दिवशी फटाके ही फोडले जात. या दिवशी रात्रभर जुगार खेळण्याची परंपरा होती. अकबर या सणात विशेष रुची घेत असे. त्याला या दिवशी करण्यात येणाऱ्या रोषणाईचे आकर्षण होते. जहांगीर या दिवशी रात्रभर जुगार खेळत असे.

**शिवरात्री :**

भगवान शिवाची उपासना करण्यासाठी हा उत्सव पाळला जाई. हा सण माघ महिन्यात शेवटी किंवा फाल्गुन महिऩ्याच्या प्रारंभी येतो. या दिवशी हिंदू लोक उपवास करीत. मुघल बादशाहा या सणात रुची घेत. या दिवशी जहांगिर बादशहा रात्रभर जागरण करुन योगीशी विचार विमर्श करीत असे. अबुल फझल या सणाविषयी अकबराच्या बाबतीत म्हणतो, "वर्षातून एकदा शिवरात्रीच्या रात्री साम्राज्यातील साधूची विशाल सभा होत असे. यावेळी बादशहा सांधुबरोबर

फलहार घेतअसे. सामान्य माणसापेक्षा तिप्पट चौपट आयुष्य बादशहाला लाभावे म्हणून साधु परमेश्वराकडे प्रार्थना करित असत."

**रक्षाबंधन :**

रक्षाबंधन हा सण श्रावण पोर्णीमेला साजरा होई. बहिण भावांना राखी बांधत असत. हा सण बहीण-भावाच्या निरपेक्ष आणि निःस्वार्थी प्रेमाचे सूचक मानले जाई. अकबर या दिवशी दरबाराचे आयोजन करी व दरबाऱ्यांकडून स्वतःला राख्या बांधून घेई. अबुल फझल ऐने अकबरीत म्हणतो, "लाल मणी, मोती, अत्यंत मौल्यवान रत्ने रेशमाच्या दोऱ्यात गुंफून सम्राटाच्या मनगटावर राख्या बांधल्या जात." "हिंदू अमीर आणि जाती प्रमुखांनी माझ्या मनगटावर राखी बांधावी " असा आदेश जहांगिरने काढला होता.मोगल कालखंडात रक्षाबंधन हा सण मोठ्या थाटामाटाने साजरा केला जात असे.

**इतर सण :**

वरील प्रमुख सणाव्यतिरिक्त रामनवमी, कृष्णजन्माष्टमी हे सण अत्यंत उत्साहाने साजरे केले जात. संक्रांत व पोर्णिमेच्या दिवशी हिंदू लोक नद्यांवर स्नानासाठी जात. कुभमेळयात लक्षावधी भाविक जात. या शिवाय हरिद्वार, प्रयाग, अयोध्या, गया, बनारस, मथुरा, कुरुक्षेत्र, पुरी इ. पवित्र ठिकाणी हिंदू यात्रेनिमित्त जात. गंगा स्नानाला हिंदूच्या जीवनात अंत्यत महत्व होते. गंगेत एकदा स्नान केले की, सर्व पापांचे क्षालन होऊन मुक्ती मिळते ही हिंदूची श्रध्दा होती.[४४]

## मुस्लिम सण व उत्सव :

**ईद-उल-झुआ**

इस्लामी कालगणनेनुसार वर्षातील शेवटच्या महिन्याच्या दहाव्या दिवशी हा सण साजरा केला जाई. मुसलमानाचा हा महत्त्वाचा सण होता. या दिवशी बकऱ्याची कुर्बानी (बळी) चढवला

जाई. काही ठिकाणी सोयीनुसार इतर प्राण्यांचाही बळी चढविला जाई. ईदगाह येथे सामान्य जनता आणि बादशहाचा शाही परिवार सामुहिक प्रार्थनेसाठी एकत्र येत असे. यानंतर परस्परांचे अभिष्टचिंतन करुन आभार मानण्यात येत. निरनिराळ्या प्रांतात तेथील सुभेदारांच्या देखरेखीखाली हा सण साजरा होई. जो व्यक्ती सामूहिक प्रार्थनेत सहभागी होऊ शकत नसत. तो व्यक्ती घरीच नमाज अदा करुन बकऱ्याचे बलिदान करीत असे.

**ईद-उल-फितर :**

इस्लामी कालगणनेच्या दहाव्या महिन्यातील हा पहिला दिवस. महंमद पैगंबारांनी हिजरी संवतच्या दुसऱ्या वर्षी हा सण सुरु केला.

**नौरोज :**

नववर्षाचा हा राष्ट्रीय सण पारशी नववर्षावर आधारित होता. १९ दिवस चालणाऱ्या या सणाची सुरुवात वसंत ऋतूच्या सुरवातीला होई. या सणाचा पहिला व अंतिम दिवस अत्यंत धुमधडाक्यात साजरा केला जाई. या १९ दिवसांत मोगल दरबारात नृत्यगायन कार्यक्रमांचे आयोजन होई. पर्शिया हून खास संगीतकार निमंत्रित केले जात. या प्रसंगी सरकारी टाकसाळीत 'निसार' नावाची नाणी तयार करुन ती गोरगरिबांना वाटली जात. याप्रसंगी बादशहाचा तुलादानविधी होई. त्याच्या वजनाइतक्या सर्व वस्तू साधू आणि गरिब लोकांना दिल्या जात असे.

**शब -ए बरात :**

काही इतिहासकारांच्या मते हा सण म्हणजे हिंदूच्या शिवरात्री या सणाचे अनुकरण होय. हा सण इस्लामी कालगणनेच्या ' शबाना ' या आठव्या महिन्याच्या १४ व्या रात्री साजरा केला जाई. इस्लामी श्रध्देनुसार या सणाच्या रात्री प्रत्येक मनुष्याचे भाग्य येणाऱ्या वर्षासाठी जन्नत (स्वर्ग) मध्ये

निश्चित केले जाते. त्यामुळे मुसलमान या दिवशी रात्री घरांवर रोषणाई करुन फटाके उडवित. जहांगिर व शहाजहाँनला या सणात विशेष आवड होती.[४५]

## मोहरम :

महंमद पैगंबराच्या मुलीचा धाकटा मुलगा इमाम हुसेन याने धर्मासाठी करबला येथे जे हौताम्य पत्करले त्याबद्दल शोकसंवेदना व्यक्त करण्यासाठी शियापंथी मुसलमान हा दिवस पाळतात. या दिवशी ताजीये (ताबुत) मिरवून त्यांचे विसर्जन करतात. मोगल काळात हा उत्सव मोठ्या प्रमाणावर होत असे. ताजियांच्या मिरवणुकीला मूर्तिपूजेला दुर्गंध येतो. अशी औरंगजेबाची धारणा असल्याने त्याने या मिरवणुकीवर बंदी घातली. परंतु त्याच्या या निर्णयाची कधीही कठोरपणे अंमलबजावणी होऊ शकली नाही.

## शिवाजी महाराजांपूर्वी महाराष्ट्रातील धार्मिक स्थिती :

इ.स. च्या ९ व्या शतकात इजिप्तहून नुरुद्दीन हा सूफी दक्षिण भारतात आला. आणि त्याने राक्षसभुवन व जोनगाव येथे इस्लामचा प्रचार केला. १३ व्या शतकात जलालुउद्दीन गजरवां आणि मोमीन अरिफ हे दोन सुफी संत दक्षिणेत येऊन स्थायिक झाले.

पैठण हे महाराष्ट्रातील सूफी संप्रदायाचे महत्त्वपूर्ण केंद्र बनले होते. सुरुवातीला शहा मोईजुद्दीन आणि त्यानंतर निजामुद्दीन यांनी पैठणच्या परिसरात सूफी पंथाचा प्रसार केला.

संताची भूमी असलेल्या महाराष्ट्रात ज्ञानेश्वर, एकनाथ, नामदेव, तुकाराम, रामदास आदी महान संतानी, कवींनी भोळ्या-भाबड्या मराठी जनतेला मातृभाषेतून धर्माची शिकवण दिली. ज्ञानेश्वरांने महाराष्ट्रात रुजवलेल्या वारकरी संप्रदयातील विविध जातीतील संतानी जातपात, उच्चनीच्चता,रुढीप्रियता, अंधश्रध्दा या सामाजिक दोषांवर अचूक बोट ठेवून सामाजिक समतेवर आधारलेली भक्ती हाच ईश्वर प्राप्तीचा खरा मार्ग आहे. हे अत्यंत तळमळीने व सातत्याने समाजास पटवून दिला. एका देवतेमध्ये सर्व देवता आणि विविध देवतांमध्ये एकाच देवाला पाहण्याची

शिकवण देत. या महाराष्ट्रीयन संतानी आपल्या शिकवणूकीतून सामाजिक दोष आणि उच्चनिच्चतेची भावना नष्ट करुन समाजातील लोकांमध्ये समता प्रस्थापित केली. [४६]

## वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या आधारे छत्रपती शिवरायांनी केलेली धार्मिक क्रांती :

छत्रपती शिवाजी महाराज हिंदू धर्माचे होते, हिंदू धर्माला मानणारे होते. परंतु त्यांनी इतर धर्माचा कधी अनादर केला नाही. मूळात शिवाजी महाराज अंधश्रध्दाळू नव्हते. ते एक श्रध्दावान व्यक्तीमत्व होते. ते कोणतीही गोष्ट विचारपूर्वक आणि तर्कनिष्ठपूर्वक करत होते. धार्मिक बाबतीत सुध्दा त्यांचे विचार आणि आचार विज्ञानाला धरुन होते. शिवरायांची धार्मिक वृत्ती सहिष्णू होती. शिवाजी महाराजांपूर्वी महाराष्ट्रात जी धार्मिक स्थिती होती ती धर्मद्वेषाची होती. ती सर्व अवस्था महाराजांनी आपल्या कृती आणि विचाराने बदलवून टाकले. म्हणून शिवरायांच्या धार्मिक धोरणाचा अभ्यास करणे महत्वाचे आहे. धार्मिक धोरणात वैज्ञानिकता आणून हिंदू धर्मात असलेली अंधश्रध्दा, अनिष्टता नष्ट केली.त्यासाठी स्वतःच्या आचरणापासून सूरवात केली.

शिवाजी राजाने इतर धर्माचा नेहमी आदरच केला आहे. शिवाजी राजांच्या राजधानी रायगडावरही त्यांनी मस्जीद बांधली होती व ईदचा चाँद पाहिल्यावर तोफांची अतिषबाजीही केली जायची. शिवाजी महाराजांचे एक गुरु हे केळशीचे बाबा याकुतखान होते. शिवाजी महाराजांनी ख्रिस्ती धर्मियांचाही मान राखला. प्रत्येकाला आपला धर्म आचरण्याचा अधिकार दिला होता. परंतु त्याचवेळी सक्तीचे किंवा फसवणूक करुन धर्मांतर घडवून आणणाऱ्यांना पूर्ण विरोध होता. असे प्रकार करणाऱ्यांना कडक शिक्षाही दिली. मस्जिदी पाडून मंदिर बांधण्याचे कार्य शिवरायांने कधीच केले नाही. सुरतेत प्रामाणिकपणे आणि योग्य रितीने धार्मिक कार्य करणाऱ्या क्रफसीन मिशनच्या ॲम्ब्रोस या फ्रेंच मिशनऱ्यांचा त्याच्या सेवाभावी कार्यासाठी महाराजांनी सत्कारही केला व त्याच्या चर्चला संरक्षणही दिले. [४७]

छत्रपती शिवराय धर्माला मानत होते. साधु संतांना नक्कीच मानत होते. परंतु राजकारभारात ढवळाढवळ करायला कोणत्याही साधु संताला कसलीही परवानगी दिली नाही. यापेक्षा लोक कल्याणकारी राजसत्ता अधिक प्रभावी असतो हे दाखवून दिले. शिवाजी महाराजांचे जेवढे प्रेम हिंदूवर होते. तेवढेच इतर धर्माच्या जातीच्या रयतेवरही होते आणि म्हणूनच अठरापगड जातीच्या व वेगवेगळ्या धर्माच्या लोकांना शिवाजीचे राज्य आपले वाटत होते आणि म्हणूनच या राज्याच्या रक्षणासाठी इतर धर्मिय लोक तेवढ्याच आपुलकीने लढत होते. स्वराज्यासाठी बलिदान देत होते. त्यामुळे सिध्दी अंबर सारख्या आदिलशाही सरदाराने लढाई न करता कोंढाणा किल्ला महाराजाच्या स्वाधीन केला. सिध्दी इब्राहीम व सिध्दी वाहवाह हे महाराजांना पन्हाळ्याच्या वेढ्यातून बाहेर काढतांना धारातीर्थी पडले. तर मदारी मेहतर याने तर प्रत्यक्ष मृत्यू समोर दिसत असतांनाही महाराजांना आग्र्यातून सही सलामत सुटण्यासाठी स्वतःचा जीव धोक्यात घातला. शिवाजी महाराजांचा जातीपेक्षा कर्तृत्त्वावर अधिक विश्वास असल्यामुळे स्वराज्याचे सर्वोच्य न्यायालयाचे न्यायधिशाचे कामकाज आणि परराष्ट्रांशी होणारे गुप्त कामकाज आणि पत्रव्यवहार याची जबाबदारी काजी मुल्ला हैदर यांना दिली होती. तर महम्मद सैस सारख्या अनुभवी शिलेदाराच्या ताब्यात संपूर्ण अश्वशाळा दिली होती. सर्वच धर्मातील साधूसंताचा महाराज आदर करीत व गुरुचे आर्शिवाद घेत. त्यांनी केळशीचे (कोकण) सुफीपंत हजरत पीर सय्यद याकुब यांच्या दर्ग्याला उद फुले व फकिराची बिदागी वगैरे बावींवर खर्च करण्यासाठी उंटबर केळशी या गावातील ६५३ एकर जमीन आज्ञापत्राने इनाम दिली होती. शिवरायांनी त्यांच्या दर्ग्याच्या बांधकामासही सुरुवात केली.[४८]

शिवरायांच्या मृत्यूनंतर एक वर्षाने बाबा याकूबही पैगंबरवासी झाले. तेंव्हा शिवरायांनी सुरु केलेल्या पण अपुऱ्या राहिलेल्या दर्ग्यामध्ये त्यांचे विधिवत दफन करण्यात आले. या दर्ग्याचे बांधकाम राजाराम महाराजांच्या कारकिर्दीत पूर्ण झाले. शिवाजी महाराजांनी केळशी येथे येऊन १६६१ साली या संताचे दर्शन घेतले. त्यांना महाराजांचे ११ वे गुरु मानले जाते. शिवरायांनी १६७९ मध्ये कोल्हापूर जिल्ह्यातून पाटगावच्या मौनीबाबांच्या पुरोहितांना १८ होनांचे वर्षासन देऊ केले होते. १६७१ मध्ये आळंदीच्या ज्ञानेश्वर मंदिरास त्यांनी इनाम दिले होते. आणि १६६५ मध्ये वाराणसीच्या

बालकराम तिवारीसही त्यांनी सनद दिली होती. धर्म सहिष्णूता महाराजांच्या रोमारोमात भिनली होती. त्यामुळे ते सर्व धर्मांना समान मानत. शिवाजी महाराजांच्या धर्मसहिष्णूतेमुळे त्यांचे विचार उदात्त व वर्तन नितिमान असेच राहिले. औरंगजेबाचा चरित्रकार व मोगल इतिहासकार खाफी खान हा मराठ्यांचा कट्टर विरोधक आणि सडकून टिका करणारा म्हणून जगप्रसिध्द आहे. परंतु त्यांने आपले पुस्तक 'मुतखंब - उल-लुबाब' या मध्ये शिवाजी महाराजांबद्दल प्रशंसा करणारी वाक्ये लिहितो.

शिवरायाने आपला राज्य कारभार करतांना दिलेले आदेश गौरवपूर्वक उल्लेखित करतो. "युध्द प्रसंगी मशिदीला धक्का लावू नका. लढाईत पवित्र कुराण मिळाल्यास आदर पूर्वक मुस्लिम सैनिकांच्या किंवा सेवकाच्या स्वाधीन करावे, हिंदू किंवा मुस्लिम स्त्री कैदी म्हणून हाती सापडली तर त्या स्त्रीची तिच्या कुटुंबाकडे रवानगी होईपर्यंत काटेकोरपणे निगा राखावी तिचा उपमर्द होता कामा नये. आपण जसे आपली आई किंवा बहिणीशी बोलतो तशाच प्रकारे आदरपूर्वक राजा शिवाजी परस्त्रीयांचा सन्मान राखतो." असे प्रशंसोउद्गार खाफीखान लिहितो.

यावरुन दिसते की, शिवरायांचा दृष्टिकोन निर्मळ, निकोप आणि निरोगी होता. अंधश्रध्देचा पगडा जर त्यांच्या मनावर राहिला असता तर ते एवढे शुध्द कधीच वागले नसते. शिवाजी राजे श्रध्दा ठेवत परंतू अंधश्रध्दा पाळत नव्हते.[४९]

## छत्रपती शिवराय एक मानवतावादी युगपूरुष :

छत्रपती शिवाजी महाराज फक्त योध्दाच नव्हते तर ते मानवतेचे पुरस्कर्तेही होते. त्यांच्याकडे शत्रु आणि मित्र असा फरक नव्हता. शत्रूची कबर खोदणारा परंतू तो शत्रू मेल्यावर शत्रुत्व संपते हे जाणणारा आणि शत्रुत्व संपले याची आठवण म्हणून शत्रूची सुध्दा कबर बांधून त्याच्या पराक्रमाचा सन्मान करणारा छत्रपती शिवराय अफजलखानाची दोन्ही मुले पहात होती. परमेश्वराने शिवरायांसारखा नेकदिल राजा या जगाला दिल्याबद्दल दुआ देत होती. जीवंत शत्रुला

जिंकणारे अनेक राजे असतील परंतु मृत शत्रूलाही जिंकणारा आणि शत्रूत्त्वाला पुर्णविराम देणारा राजा शिवराय म्हणूनच मानवतावादी युगपुरुष होते.

पराक्रमी लोक नेहमीच दुसऱ्याच्या पराक्रमाची कदर करतात. मेलेल्या शत्रूची धिंड काढून आपल्या पराक्रमाचे तमाशे दाखविणारे उधारीचा पराक्रम लोकांसमोर मांडत असतात. परंतू शिवाजी राजे त्यातील नव्हते म्हणूनच मारल्या गेलेल्या शत्रूचाही सन्मान करण्याची मानसिकता शिवाजी महाराजांची होती. माणसाचे वैर तो जिवंत असे पर्यंतच असते तो मेल्यावर त्याचे शत्रूत्त्व सपुंष्टात येते.

शत्रूचाही सन्मान करण्याची आपण पध्दत ठेवली पाहिजे. या मतावर शिवाजी राजे ठाम होते आणि त्या विचारामुळेच प्रतापगडाच्या लढाईत जेवढे मुघल सैनिक मारले गेले. त्या सर्वांचे दफन काम शासकीय खर्चाने आणि रिती-रिवाजाप्रमाणे महाराजांनी केले. शिवाय अफजल खानाची कबर बांधून खानाच्या धाडसाचा, पराक्रमाचा सन्मानही केला. अर्थात शिवरायांसारख्या राजाच्या विरोधात तलवार धरणे ही काही मामुली गोष्ट नव्हे मृत्यूशीच गाठ ठरलेली. महाराजांच्या या औदार्याची आठवण करुन देणारी ही कबर आजही जनीच्या टेंभ्या जवळ दिमाखात उभी आहे. याच ठिकाणी शत्रू म्हणून आलेल्या अफजलखानाला महाराजांनी मारल्याचा पुरावा म्हणून आणि महाराज शत्रूचाही सन्मान करीत होते याची साक्ष देण्यासाठी जो पर्यंत ती कबर राहिल तो पर्यंत शिवाजी महाराजांचा पराक्रम आणि उदारता इतिहासाला लक्षात ठेवावी लागेल आणि भविष्य काळाला याची नोंद घ्यावी लागेल. वर्तमान काळात आपण याचे स्मरण करतो यातच सर्वकाही आले.[५०]

## छत्रपती शिवरायांचे धार्मिक धोरणासबंधी औरंगजेबास पत्र :

आजकाल शिवाजीमहाराजांच्या धार्मिक धोरणाचा विचार करतांना 'सर्वधर्मसमभाव ' या संकल्पनेचा वारंवार उल्लेख केला जातो. मध्ययुगात विशेषत : १४ व्या १५ व्या शतकात युरोपात जेंव्हा राजसत्ता आणि धर्मसत्ता यांच्या श्रेष्ठत्त्वासबंधी संघर्ष सुरु झाला होता तेंव्हा धर्मसत्ता या

संकल्पनेचा उदय झाला. आपल्या देशात अशी परिस्थिती नव्हती. शिवाजी महाराज निष्ठावंत हिंदू होते, तरी राजा म्हणून ते सहिष्णू वृत्तीचे होते ही गोष्ट निर्विवाद आहे. आपल्या राज्यातील लोकांचे योगक्षेम धर्म, जात, पंथ याचा विचार न करता ते पाहत असत.

मुसलमान धर्माला महाराजांनी कधी विरोध केला नाही. स्वराज्याच्या सेवेत मुसलमानांना संधी देताना त्यांनी असा काही भेद केला नाही. गुणवत्ता हा नोकरीचा निकष होता. महाराजांच्या सैन्यात मुसलमान होते. त्यांचा शागीर्द मदारी मेहतर, शरीरक्षक इब्राहिम बर्बर, नौदलावरील प्रमुख अधिकारी दौलतखान हे सारे मुसलमानच होते. १६७९ साली काझी हैदर नावाचा एक मुसलमान वकील महाराजांनी तहाची बोलणी करण्याकरिता औरंगजेबाकडे पाठविला होता.

धर्मांतरासबंधी महाराजांचे धोरण पुरोगामी स्वरुपाचे होते. त्यांचा सेनापती नेताजी पालकर काही अमिषामुळे मुसलमान झाला आणि मोगलांच्या चाकरीत रुजू झाला. पण पुढे त्याला पश्चाताप झाला आणि महाराजांनी कसल्याही धार्मिक अडचणी न सांगता त्याचे धर्म शुध्दीकरण केले आणि त्याला हिंदू धर्मात समाविष्ट करुन घेतले.

१६७९ साली औरंगजेबाने ' जिझिया ' हा केवळ हिंदूच्यावर लादला जाणारा कर परत चालू केला. त्यावेळी महाराजांनी त्यांना जे पत्र लिहिले आहे. त्यावरुन सर्व धर्माकडे पाहण्याची शिवरायांची सहिष्णू वृत्ती स्पष्ट होते. अकबराने सर्वधर्मीयांना समानतेची वागणूक देण्याचा प्रयत्न केला म्हणून त्याना लोक 'श्रेष्ठ बादशहा' मानू लागले. त्याने 'जिझिया ' कराची हकालपट्टी केली होती. जहाँगीर आणि शहाजहाँ या मोगल बादशाहांनी त्याच धोरणाचा पुरस्कार केला. हा सर्व इतिहास सांगून राजे औरंगजेबाला लिहितात. तुमचा जर पवित्र ग्रंथ आणि कुराणावर विश्वास असेल तर त्यात ईश्वराचे वर्णन ' रब-उल-आलमिन ' म्हणजे सर्व लोकांचा ईश्वर असे केलेले आढळेल. तो ' रब-उल-मुसलमान ' म्हणजे केवळ मुसलमानाचा ईश्वर नाही. मशिदीत अथवा मंदिरात त्याचीच आराधना केली जाते.

यावरून शिवाजी महाराजांचा धर्माकडे पहाण्याचा दृष्टिकोन निकोप आणि निर्मळ होता.शिवराय मध्ययुगीन काळातील एक रचनात्मक राजा असल्याने धर्माच्या नावावर राज्याचे आणि समाजाचे विघटन त्यांना मान्य होणारे नव्हते.केवळ मानवाचे कल्याण हेच शिवरायांचे अंतिम ध्येय होते.त्यासाठी त्यांनी आपल्या धार्मिक धोरणात अमूलाग्र बदल करुन मानवतेची शिकवण संपूर्ण जगाला दिली.[५१]

## संदर्भ -ग्रंथ


| | | |
|---|---|---|
| १. गजानन मेहंदळे | - | श्री राजा शिवछत्रपती खंड -१ श्री साई एन्टरप्रायजेस, पुणे २००२ भाग-२ पृष्ठ क्र.८९६ |
| २. पि.जी.जोशी | - | मराठ्यांचा इतिहास नंदादिप प्रकाशन नांदेड प्रथमावृत्ती १९९८ पृष्ठ क्रमांक - १०३ |
| ३. पुर्वोक्त | - | पृष्ठ क्रमांक १०४ |
| ४.बेंद्रे वा.सि. | - | श्री.छत्रपती शिवाजी महाराज यांचे विकिचित्सक चरित्र साहित्य सहकार मुद्रणालय अलिबाग, कुलाबा प्रथम आवृत्ती १ मे १९७२ पृष्ठ - २०४ |
| ५. वि.का. राजवाडे | - | राधामाधव विलास चंपू (जयराम पिंडयेकृत) चित्रशाळा छापखान, पुणे शके १८४४ (सन १९२२) पृष्ठ - ३०२ |
| ६.डॉ. गिरीश जाखोटिया | - | छत्रपती शिवाजी महाराज व्यवस्थापन गुरु आणि व्युहरचानाकार साकेत प्रकाशन औरंगाबाद, आवृत्ती २ री, २०१२, पृष्ठ क्रमांक - २३ |
| ७. श्रीमंत कोकाटे | - | विश्ववंद्य छत्रपती शिवाजी महाराज "शिवचरित्र" जिजाई प्रकाशन पुणे पहिली आवृत्ती २००१ पृष्ठ क्रमांक - ४१ |
| ८. पुर्वोक्त | - | पृष्ठ क्रमांक - ४२ |
| ९. प्रा.मा.म.देशमुख | - | शिवशाही शिवभारती प्रकाशन नागपूर पहिली आवृत्ती - १९९८, पृष्ठ क्रमांक ३ ३७ |

| | | |
|---|---|---|
| १०. प्रा. बी.एस. सावंत<br>प्रा. व्हि.के. जाधव | - | मराठ्यांचा प्रशासकीय, सामाजिक व आर्थिक इतिहास विद्या प्रकाशन नागपूर प्रथमावृत्ती १९९७ पृष्ठ क्रमांक - ८९ |
| ११. सेतू माधवराव पगडी | - | छत्रपती शिवाजी "नॅशनल बुक ट्रस्ट इंडिय नवी दिल्ली पहिली आवृत्ती १९८९ पृष्ठ क्रमांक - ६९ |
| १२. पुरुषोत्तम खेडेकर | - | लोकराजे शिवराय जिजाई प्रकाशन पुणे, प्रथमावृत्ती २०१० पुनर्मुद्रण २०१२ पृष्ठ क्रमांक - ६७ |
| १३. डॉ.ज्ञानेश्वर जाधव | - | छत्रपती शिवाजी महाराज अक्षर पब्लिकेशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती ऑक्टो - २०११ पृष्ठ क्रमांक - १४७ |
| १४. डॉ.मोहिनी कडू | - | शिवचरित्र लाखे प्रकाशन नागपूर प्रथमावृत्ती २०१४ पृष्ठ क्रमांक - १४३ |
| १५. सुरेश तनपुरे | - | शिवरायांची लोकशाही, जिजाई प्रकाशन पुणे, प्रथमावृत्ती १२ जाने २०१२ पृष्ठ क्रमांक- १५ |
| १६. प्रा.अशोक राणा | - | छत्रपती शिवराय पंचफुला प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती १९ फेब्रुवारी २०१३,पृष्ठ क्रमांक ४९ |
| १७. डॉ.प्रभाकर गद्रे | - | मराठी राज्य आणि मराठी लोक विद्याप्रकाशन नागपूर प्रथमावृत्ती १९९९ पृष्ठ क्रमांक - ३० |
| १८. वि.का. राजवाडे | - | राधामाधवविलासचंपू (जयराम पिंडयेकृत) चित्रशाळा छापखाना पुणे, शके १८४४ (सन १९२२) पृष्ठ क्रमांक ञ २९६ |

| | | |
|---|---|---|
| १९. गजानन मेहंदळे | - | श्री राजा शिवछत्रपती खंड-१, श्री.साई एन्टरप्रायजेस, पुणे २००२ भाग-२ पृष्ठ - ९७८ |
| २०. बेंद्रे वा.सि. | - | श्री.छत्रपती शिवाजी महाराज विकित्सक चरित्र (पूर्वाध) साहित्य सहकार मुद्रणालय, अलिबाग, कुलाबा प्रथम आवृत्ती १ मे १९७२ पृष्ठ - १०९ |
| २१. त्र्यंबक शंकर शेजवलकर | - | श्री शिवछत्रपती संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना आराखडा व साधने, मराठा प्रकाशन डॉ. नायर रोड मुंबई पृष्ठ - २०९ |
| २२. देशपांडे प्र.न. | - | मराठ्यांचा उदय आणि उत्कर्ष मोघे प्रकाशन कोल्हापूर पहिली आवृत्ती १९७४ पृष्ठ क्रमांक - १०२ |
| २३. अ.रा. कुलकर्णी | - | अशी होती शिवशाही राजहंस प्रकाशन पुणे आवृत्ती पाचवी सप्टेंबर २०१२,पृष्ठ क्रमांक - ५१ |
| २४. पूर्वोक्त | - | पृष्ठ क्रमांक ५२ |
| २५. पूर्वोक्त | - | पृष्ठ क्रमांक ५३ |
| २६. स.म. दिवेकर (संपा) | - | कवींद्र परमानंद कृत श्री शिवभारत-भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे पुरस्कृत ग्रंथमाला क्रमांक तीन शके १८४९ (सन १९२७) पृष्ठ - २०५ |
| २७. संपादक अ.रा.कुलकर्णी, ग.ह.खरे | - | मराठ्यांचा इतिहास खंड-१ कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे प्रथमावृत्ती - १९८४ पृष्ठक्रमांक - ३०४ |

| | | |
|---|---|---|
| २८. डॉ.जयसिंगराव पवार | - | 'छत्रपती शिवाजी महाराज ' अरुंधती प्रकाशन, कोल्हापूर, शके (१९०२) (सन १९८०) पृष्ठ क्रमांक १०७ |
| २९. गोविंद सखाराम सरदेसाई | - | शहाजीराजे भोसले, शककर्ता शिवाजी खंड-१ (मराठी रियासत) पॉप्युलर प्रकाशन मुंबई, पृष्ठ क्रमांक - ४०७ |
| ३०. कै. न्यायमूर्ती महादेव रानडे अनु.नरहर रघुनाथ फाटक | - | मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष (Rise of the Maratha Power) साहित्य आणि संस्कृती मंडळ, महाराष्ट्र राज्य पृ.क्र. - १०९ |
| ३१. त्र्यंबक शंकर शेजवलकर | - | श्री.शिवछत्रपती संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना आराखडा व साधने १९६४ मराठा मंदिर प्रकाशन डॉ. नायर रोड मुंबई-८ पृष्ठ -२०२ |
| ३२. गुरुवर्य कृष्णराव अर्जून केळूसकर | - | छत्रपती शिवाजी महाराज वरदा प्रकाशन पुणे पाचवी आवृत्ती १९९१ पृष्ठ- ३०४ |
| ३३. डॉ ज्ञानेश्वर जाधव | - | छत्रपती शिवाजी महाराज अक्षर पब्लिकेशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती ऑक्टोबर २०११ पृष्ठ - १९ |
| ३४. प्राचार्य डॉ.एस.ए. बाहेकर | - | शिवछत्रपतीच्या सामाजिक क्षेत्रातील क्रांतीचे अंतरंग कसब प्रकाशन जळगाव प्रथमावृत्ती २०१० पृष्ठ - २४ |
| ३५. डॉ.मोहिनी कडू | - | ।। शिवचरित्र ।। लाखे प्रकाशन नागपूर प्रथमावृत्ती जुलै २०१४ पृष्ठ क्रंमाक -१३८ |

३६. डॉ.जयसिंगराव पवार - 'छत्रपती शिवाजी महाराज' अरुंधती प्रकाशन कोल्हापूर शके (१९०२) सन १९८० पृष्ठ क्रमांक - २०२

३७. गजानन मेहंदळे - श्री राजा शिवछत्रपती खंड - १ श्री साईएन्टरप्रायजेस पुणे २००२, भाग -२ पृष्ठ - ९१४

३८. बेंद्रे वा.सि. - श्री छत्रपती शिवाजी महाराज विकित्सक चरित्र (पूर्वाध) साहित्य सहकार मुद्रणालय अलिबाग, कुलाबा प्रथम आवृत्ती १ मे १९७२ पृष्ठ - २०४

३९. देशपांडे प्र.न. - मराठ्यांचा उदय आणि उत्कर्ष मोघे प्रकाशन कोल्हापूर पहिली आवृत्ती १९७४ पृष्ठ क्रमांक ११४

४०. श्रीमंत कोकाटे - विश्ववंद्य-छत्रपती शिवाजी महाराज ।।शिवचरित्र।। जिजाई प्रकाशन पुणे प्रथमावृत्ती २००१ पृष्ठ क्रमांक - ६९

४१. वीर उत्तमराव मोहिती - मराठ्यांचा सांस्कृतिक क्रांतीचा इतिहास जिजाई प्रकाशन पुणे प्रथम आवृत्ती १९८८ पृष्ठक्रमांक - ९९

४२. प्रा.अशोक राणा - छत्रपती शिवराय पंचफुला प्रकाशन औरंगाबाद प्रथमावृत्ती १९ फेब्रुवारी २०१३, पृष्ठ क्रमांक - ९१

४३. पि.जी.जोशी. - मराठ्यांचा इतिहास नंदादिप प्रकाशन नांदेड प्रथमावृत्ती १९९८ पृष्ठक्रमांक - १५२

४४. पुर्वोक्त - पृष्ठ क्रमांक १५३

| | | | |
|---|---|---|---|
| ४५. | स.म.दिवेकर (संपा) | - | कविंद्र परमानंदकृत श्री.शिवभारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, पुरस्कृत ग्रंथमाला क्रमांक तीन शके १८४९ (सन १९२७) पृष्ठ - २१३ |
| ४६. | वि.का. राजवाडे | - | राधामाधवविलास चंपू (जयराम पिंडयेकृत) चित्रशाळा छापखाना पुणे शके १८४४ (सन १९२२) पृष्ठ ३१३ |
| ४७. | श्रीमंत कोकाटे | - | विश्ववंद्य - छत्रपती शिवाजी महाराज ।। शिवचरित्र ।। जिजाई प्रकाशन पुणे प्रथमावृत्ती २००१, पृष्ठ क्रमांक - ८२ |
| ४८. | पुर्वोक्त | - | पृष्ठ क्रमांक ८४ |
| ४९. | प्रा. मा.म. देशमुख | - | शिवशाही - शिवभारती प्रकाशन नागपूर पहिली आवृत्ती १९९८, पृष्ठक्रमांक ३ ८० |
| ५०. | पुरुषोत्तम खेडेकर | - | लोकराजे शिवराय जिजाई प्रकाशन पुणे प्रथमावृत्ती २०१० , पुनर्मुद्रण २०१२ पृष्ठ क्रमांक - ४५ |
| ५१. | अ.रा.कुलकर्णी | - | अशी होती शिवशाही राजहंस प्रकाशन पुणे, पाचवी आवृत्ती, सप्टेंबर - २०१२, पृष्ठ क्रमांक - ७८ |

# प्रकरण- सहावे

## छत्रपती शिवाजी महाराज आणि मानसशास्त्र

छत्रपती शिवाजी महाराज हे उत्तम राज्यकर्ते होते. एवढेच नाही ते उत्तम योध्दे होते. त्यांनी अनेक लढायामध्ये उत्तम अशी कामगिरी बजावली होती. लढाईमध्ये लढत असतांना शत्रूच्या शक्तीचा शोध घ्यावा लागतो. शत्रूची शक्ती किती आहे. यासाठी मानशास्त्राचा अभ्यास असावा लागतो. या अनुषंगाने छत्रपती शिवराय हे उत्तम मानसशास्त्रज्ञ होते. या बळावरच त्यांनी अनेकांना पराजित केले. अफझलखानाविरुध्द मिळविलेला विजय म्हणजे निव्वळ शिवरायांच्या मानसशास्त्राच्या अभ्यासाचा विजय आहे. कारण अफझलखान सारख्या बलाढ्य शत्रूला संपविण्यासाठी शक्तीपेक्षा युक्ती श्रेष्ठ हे शिवरायांनी ओळखलेले होते. ही युक्ती म्हणजेच मानसशास्त्र होय. शिवराय सतत विचारमग्न असत. आपल्या युध्दकौशल्यात सुधारणा करण्याचा त्यांचा मानस असायचा युध्द हे रणांगणात लढण्याआधी आपल्या मनात लढल्या जाते. आपल्या मनात त्याची व्यूहरचना करायची असते. या विषयी शिवराय तत्पर असत. शिवरायांच्या जीवनात अनेक अडचणी आल्या अऩेक कठीण प्रसंग आले. परंतु शिवराय घाबरले नाहीत. उलट अशा कठीण प्रसंगी आपल्या कणखर मनाने त्यांनी या संकटांना सामोरे जाऊन त्यावर मात करुन विजय मिळविले. यातून शिवरायांच्या सक्षम मनाची प्रचिती येते. युध्दकौशल्यात सतत सुधारणेवर शिवरायांनी भर दिलेला होता.

छत्रपती शिवाजी महाराजांनी आपले रणकौशल्य दाखवितांना मानसशात्राचा पुरेपुर उपयोग केलेला दिसतो. शत्रूची मानसिकता ओळखून महाराज आपले डावपेच ठरवित असत हे मात्र नक्की होते. महाराजांनी लढाईसाठी वापरलेल्या एका तंत्राचा उपयोग दुसऱ्यांदा केलेला दिसत नाही. प्रत्येक लढाई वेगवेगळी रणनीती आणि मानसिकता महाराजांनी वापरली आणि शत्रूला या नितीचा थांगपत्ता सुध्दा लागणार नाही अशा अभिनव युध्द तंत्राचा उपयोग केला. शत्रूने त्या तंत्राचे

विश्लेषण करुन त्याचा तोडगा काढेपर्यंत महाराज त्यापेक्षा दुसऱ्या नविन अशा तंत्रज्ञानाचा उपयोग करुन गोंधळलेला शत्रू मग आणखीनच चूकत असत. शत्रू सैन्य येतांना प्रचंड तयारीनिशी ताकदीनिशी यायचे व युध्दाच्या ऐन निर्णायक प्रसंगी मात्र त्याचा गोंधळ उडेल अशी व्यवस्था महाराज करायचे. मग जिंकण्यासाठी आलेल्या त्या नियोजनबध्द फौजेला सैरावैरा पळ काढण्याशिवाय पर्याय नसायचा. आणि मराठे तर वाटेवर इकडे तिकडे लपूनच बसलेले असायचे. दगड धोंडे फेकून सुध्दा यांना खिंडीत गाठून ठेचून काढायचे. त्यामुळे महाराजांशी किंवा त्यांच्या सैनिकांशी पंगा घेतांना शत्रूला धास्ती सुध्दा वाटायची आणि मरणाची भिती त्यापेक्षा जास्त भिती होणाऱ्या फसगतीची होती. महाराजांनी मानसशास्त्राचा उपयोग करत असतांना काहींना ठार मारले तर काहींना कायमची अद्दल घडविली . हे शिवाजी महाराजांचे खरे मानसशास्त्र होय.[१]

प्रतापगडाच्या लढाईत अफजलखानाला ठार मारल्यामुळे पुढे विजापुरी दरबारात महाराष्ट्राकडे कुणी चालून यायचे म्हटले की त्यांना अफजलखानच होईल असे वाटायचे. त्यामुळे अर्धी आदिलशाही महाराजांनी विजापुरातच अडकवून ठेवून एक आघाडी निर्धास्त केली. आणि त्याच भीतीने कुतुबशाहीने तर कायम महाराजांशी सलोखाच ठेवला. लाल महालात तीन वर्ष मुक्काम करण्याऱ्या शाहिस्तेखानाकडे दुर्लक्ष करुन महाराजांनी शाहिस्तेखाबद्दल औरंगजेब बादशाहाच्या मनात संशय निर्माण होईल अशी परिस्थिती तयार केली. महाराजांची राजधानी राजगड आणि पुणे यात खूपच कमी अंतर आहे. परंतु तरीही तीन वर्ष हा संशयाचा गोंधळ माजवून महाराजांनी शाहिस्तेखानालाही बेसावध ठेवले. एके रात्री त्याच्यावरच छापा घालून त्याची बोटे छाटली. यातून शिवारायांना शाहिस्तेखानाला फक्त दहशत बसवून पळवून लावायचे होते. त्याला जर मारले असते तर कदाचित औरंगजेब बादशहा स्वतः दक्षिणेत चालून येण्याएवढा दबाव त्याच्या कुटुंबियांनी त्याच्यावर टाकला असता. या गोष्टीचा अभ्यास शिवरायांनी केलेला होता. म्हणून त्यांनी शाहिस्तेखानाला न मारता फक्त दहशत दाखविली यातून शिवरायांचा मानशास्त्रातील अभ्यास आपल्याला दिसून येतो.[२]

**अफझलखानाचा वध आणि शिवरायांचे मानसशात्र**

शिवरायांनी अफझल खानाचे पारिपत्य करण्यासाठी मानसशास्त्राचा पूरेपूर अभ्यास केलेला होता. त्यासाठी त्यांनी अफझलखानाच्या स्वभावाचा परिपूर्ण अभ्यास करुन त्याचे शक्तीस्थळ आणि कमजोरी हेरली होती. छत्रपती शिवाजी महाराज अफजलखानाला पराभूत करण्यासाठी डावावर डाव टाकत होते. शिवरायांनी आणखी वेगळा डाव टाकला. महाराजांनी भेट घेण्यासाठी वेळ काढूपणा करत तब्बल चार महिने काढले आणि तो पर्यंत खानाने कमविलेला आत्मविश्वास पुन्हा रसातळाला गेला. शिवरायांना पकडण्याच्या मारण्याच्या बेधुंदीत तो वेडा झाला आणि शिवरायांना आपल्या म्हणण्याप्रमाणे वाकवायला आलेला परंतु अधीन झालेला खान महाराजांच्या अटी कबूल करत जावळीस भेट द्यायला तयार झाला. चाळीस हजाराची फौज मागे ठेवून तो जावळीत आला. याला म्हणतात मानसशास्त्रीय लढाईचे डावपेच आणि महाराज त्यात एकदम तरबेज होते. महाराजांनी खानाला पुरेपुर गाफील ठेवण्यासाठी तो खूप शूर, पराक्रमी असल्याचे वर्णन केले. खान महाराजांच्या भेटीसाठी प्रतापगडाच्या पायथ्यापर्यंत आला. महाराजांनी त्याला आपल्याला अनुकूल अशा जावळीच्या जंगलात ओढून आणले होते. खान व त्याचे सैन्य यासाठी हा भाग गनिमी करण्याच्या लढाईच्या दृष्टीकोनातून शंभर टक्के प्रतिकूल होता. खानाच्या राजकीय सल्लागारानी कोणत्याही परिस्थितीत जावळीत जाऊ नका असे सांगितले. पंरतू अफझलखान उताविळा झाल्यामुळे त्यांचा सल्ला ऐकला नाही. त्यामुळे शिवाजी महाराजांनी अर्धी लढाई जिंकलेली होती. महाराज पूर्ण आत्मबलाने आणि योजनाबध्द पध्दतीने तयारीत होते. शांत चित्ताने डावपेच टाकत होते. महाराजांनी खानाला भेटीसाठी सकाळी अकरा वाजताची वेळ दिली. आणि महाराज स्वतः दीड वाजता पोहोचले. खरे तर पाहुण्याचे स्वागत करायला महाराज स्वतः अफझखानाच्या अगोदर शामियानात हजर व्हायला पाहिजे होते परंतु तसे झाले नाही. महाराजांनी अफजलखानाला तब्बल अडीच तास वाट पाहायला लावून खानाच्या मानसिकतेचा अंदाज घेतला. त्याचे लक्ष विचलित करण्याचा पूर्ण प्रयत्न केला. भेटीसाठी उशिर लावून शिवाजी महाराज आपल्याला घाबरत असल्याच्या आतापर्यंतच्या बातमीवर त्याचा विश्वास बसला आणि तो

विजयाचे स्वप्न रंगवू लागला. शिवरायांनी खानाच्या स्वागतासाठी उभारलेला शामियाना जाणीवपूर्वक ऐश्वर्य संपन्न असाच तयार केला होता. प्रसंग लढाईचा होता अशावेळी महाराजांनी लष्करी पध्दतीचा तंबू उभारण्या ऐवजी मित्र आणि पाहुण्यासाठी जो तंबू उभारला जातो. त्याप्रकारचा तंबू उभारला होता. असा रंगी-बेरंगी, मंगलमय आणि मन प्रसन्न करणारा तंबू बनविला. जेणेकरुन हा प्रसंग आनंददायक आहे. असा अफझलखानाचा भास व्हावा आणि झाले सुध्दा तसेच महाराजांनी महागडे कपडे, कनाती, झुंबर, तक्के, गिर्दे, वापरुन शामियाना अगदी शाही स्वरुपाचा बनविला. तंबूत शिरताच खान उदगारला, " असा बिछाना वजीरास नाही." असा सुंदर शामियाना वजिराच्या सुध्दा नशिबी नसतो. एवढा माझ्या स्वागतासाठी तयार केलेला आहे. एकंदरीत शिवरायांकडे पैशाची खूपच सुबता असली पाहिजे आणि ती आपल्याला मिळावी असा विचार अफझलखाच्या मनात घोळू लागला. खानाने महाराजांच्या ऐश्वर्याबद्दल मतप्रदर्शन करताच महाराजांच्या चतुर वकिलाने त्याला आणखीनच चढविला आणि थोड्याच वेळात ही सगळी संपत्ती आपल्या मालकीची होणार आहे असे सांगितले. शिवरायांना मारायला आलेला खान त्या विचारापासून विचलित झाला. आपल्या दरबारात आपला मोठा मानसन्मान होणार शिवरायांचे सगळे पैसे आपल्याला मिळणार हा सुंदर शामियाना आपला होणार अशी स्वप्ने रंगवू लागला. युध्द प्रसंगी रणनीतीची अमलबजावणी करण्याऐवजी तो मनोरंजनात घुसला. शिवरायांचे मानसशास्त्र यशस्वी होवू लागले.

अफझलखानाने महाराजांना मारायचा प्रयत्न करो वा न करो महाराज मात्र त्याला संपविण्याच्या तयारी निशी आले होते. म्हणूनच त्याने इकडची तिकडची चर्चा न करता सरळ अफझलखानाची भेट घेतली. अफझलखानाने शिवाजी महाराजांवर प्रथम वार केला. शिवरायांने प्रसंगावधान ओळखून लांबलचक बिचवा खानाच्या पोटात आडवा फिरवून दोन भाग केले आणि विषात बुडविलेली वाघनखे पोटात घुसवून आतडे फाडले. खान तंबूत जागेवरच कोसळावा असा हा वार होता. शत्रूला क्षणाची उसंत मिळू दिली तर बेत बदलू शकतो हे महाराज जाणून होते. महाराज आले दोनच मिनिटात काम संपविले आणि काय झाले आहे एवढे समजेपर्यंत

प्रतापगडाच्या दरवाजाकडे रवाना झाले. लढाई जिंकणाऱ्या योध्दयाची ही अशी मानसिकता असते त्याचे लक्ष फक्त आपल्या ध्येयाकडे असते. अशावेळी गरज असते ती योग्य नियोजनाची आणि योग्य माणसांना सोबत घ्यायची. सय्यदबंडाचा बंदोबस्त करण्यासाठी जिवा महाला होताच परंतू खानाच्या पोलादी बाहूत आपण दबून गेलो तर लगेच सुटका करण्यासाठी हत्तीच्या शक्तीचा संभाजी कावजी महाराजांनी सोबत घेतला होता. ही गोष्ट ठरलेल्या नियमाच्या विरोधात असून सुध्दा खानाला काही समजून त्याने आक्षेप घेईपर्यंत त्यांनी अफझलखानाला संपविले.यावरून शिवरायांचा मानसशास्त्रातील अभ्यास दिसून येतो.[३]

**शाहिस्तेखानावरील छापा आणि शिवरायांचे धाडस**

छत्रपती शिवरायांच्या मानसिक धैर्याचे दुसरे उदाहरण म्हणजे शाहिस्तेखानावर टाकलेला छापा होय. या ठिकाणी महाराजांनी शत्रूच्या छावणीत घूसून शत्रू वर मारा केला आणि गोंधळ माजवून दिला. परंतु असा थेट छावणीच्या केंद्रभागी हल्ला करतांना सुरक्षित बाहेर पडता येणे सुध्दा महत्वाचे असते. कारण लष्करी छावणी ही चक्रव्यूहाप्रमाणे बनविलेली असते. महाराज लाल महालात केवळ सहाशे मावळे घेवून घुसले आणि गोंधळ माजवून घोड्यावर बसून वेगाने बाहेर पडले. तोपर्यंत गोंधळलेल्या शत्रूला त्यांनीच सांगितले की, " आम्ही शत्रूच्या म्हणजे शिवाजीच्या पाठलागावर जात आहोत."खानाचे खरे सैन्य तयार होईपर्यंत महाराज दोन मैल पुढे वाऱ्याच्या वेगाने निघून सुध्दा गेले. परंतु एक लाख फौजेसाठी सहाशे मावळयांचा पाठलाग करणे. अवघड नव्हते हे महाराजांनी ओळखले होते. म्हणून महाराजांनी शत्रूला चकविण्याची मानसिकता ठेवली होती. शत्रू अगोदरच बेसावध असेल असा दिवस महाराजांनी निवडला तो दिवस होता. औरंगजेबाच्या राज्यरोहणाचा वर्धापनदिन होय. मोगलांच्या फौजेसाठी उत्सवाचा आणि त्यात रमझान-रोजाचा महिना चालू होता. दिवसभराचा उपवास सोडून लाल महालातील अर्धे पहारेकरी, नोकर गाढ झोपले होते तर बाकीचे हौसे शौकीन पहारेकरी नगारखान्यात वाद्य वाजवित आनंद साजरा करीत होते. मावळ्यांनी नगारखान्याचाच ताबा घेऊन जोरजोरात वाद्य वाजविले. त्यामुळे

महाराज वीस हजार फौजेच्या गराड्यातून लाल महालात आत पोहोचले तरी काहीच कळले नाही.[४]

५ एप्रिल १६६३ ला मध्यरात्री हा छापा पडला. महाराज आणि त्यांच्या मावळ्यांचा मोगल पाठलाग करणारच होते. महाराज तानाजी मालूसरेसह हिंगण्यातील आंब्याच्या बागेत पोहोचले आणि इशारतीचा बिगूल वाजला. कात्रजच्या घाटात बैलांच्या शिंगाना आणि झाडांना बांधलेले टेंभे तेथील मावळ्यांनी पेटविले. मोगलांचे लक्ष तिकडे जावे म्हणून जोरजोरात ढोल सुध्दा वाजविले. महाराज व त्यांचे सैन्य कात्रज घाटामध्ये आनंद साजरा करत आहेत असा मोगलांचा भास व्हावा. या मानसिकतेने महाराजांनी हे सगळे केले होते. अचानक पडलेल्या मर्माघाती छाप्याने गोंधळलेल्या मोगलांचे दहा हजारांचे सैन्य अंधारात बेभान होऊन पाठलागावर निघाले. तोपर्यंत महाराज सिंहगडाच्या उलट्या दिशेने गेले होते आणि एक इशारतीचा बिगूल वाजताच कात्रजच्या घाटात ढोल नगारे वाजविणारे मावळे ही वाद्य तेथेच टाकून घाट ओलांडून पुरंदराकडे नाघाले. शत्रूची पहिली मुसंडी आमराईकडे येण्याच्या वेळी कात्रजकडे त्यांचा मोर्चा वळविला गेला.शत्रू कात्रजकडे अर्ध्या वाटेवर पोहोचल्यावर तेथील सैनिकांनी आपली दिशा सासवड मार्गे पुरंदराकडे वळवून आणखी दिशाभूल केली. शत्रू सैनिकांनी महाराजांचा वेगाने पाठलाग केला. परंतू दिशा चुकली आणि महाराजांना तेवढेच करायचे होते. लढाई करणे हा या ठिकाणी उद्देश नव्हता तर शाहिस्तेखानाला दहशत बसवून पुणे सोडायला भाग पाडायचे होते. कारण स्वराज्यातील लष्करी हालचालींना त्यामुळे पायबंद बसत होता. महाराजांचा मानसशास्त्रीय अभ्यास एवढा अचूक बसला की, दुसऱ्याच दिवशी शायिस्तेखानाने आपले सैन्य घेऊन औरंगाबादकडे निघाला.या प्रसंगावरुन शिवरायांच्या धाडसाची आणि त्यांच्या मानशास्त्रीय अभ्यासाची कल्पना येते.[५]

## पुरंदरचा तह आणि शिवरायांचे मनोधैर्य :-

छत्रपती शिवाजी महाराज हे युध्दनितीत निपुण होते. युध्द करीत असतांना वेळ प्रसंगी माघार घ्यावी लागली तरीही शिवरायांनी माघार घेतली. पण आपले मनोधैर्य खचू दिले नाही. यावरुन शिवराय मानसिकदृष्ट्या किती सक्षम होते हे आपल्याला दिसून येते. आज जरी आपला

पराभव झाला तरी उद्या आपला विजय होणार आहे. यावर शिवरायांचा विश्वास होता. धैर्यवान व्यक्ती आशावादी असतो जो व्यक्ती मानसिकदृष्ट्या सक्षम असतो. तोच व्यक्ती धैर्यवान असतो. पुरंदरचा तह हा शिवरायांच्या मनोधैर्याची परिक्षा होती. या तहात शिवरायांना खुप काही गमवावे लागले. परंतू त्यांनी आपले मनोधैर्य खचू दिले नाही. यातच शिवरायांच्या मानसिक क्षमतेची आपल्याला प्रचिती येते. या तहात शिवरायांनी मोगलांना चारलाख होन (सुमारे सोळा लाख रुपये) उत्पन्नाचा प्रदेश आणि लहान मोठे असे तेवीस किल्ले द्यावे लागले. एवढे सगळे होऊनही शिवरायानी हार पत्करली नाही. यातून शिवरायांचे मनोधैर्य आपल्याला दिसून येते.

जयसिंगाने शिवाजी महाराजां विरुध्द जी मोहीम केली तिची संपूर्ण माहिती उपलब्ध आहे. औरंजेबाचे सरकारी चरित्र आलमगीरनामा, जयसिंगाचा औरंजेबाशी झालेला पत्रव्यवहार हफ्तअंजुमन, मिर्झा राजे जयसिंगाचे रजपूत अधिकारी यांचा पत्रव्यवहार राजस्थानी पत्रे, मराठी,इंग्रजी, पोर्तुगीज साधने ही सर्व पाहाता एकंदरीत मोहिमेचे चित्र आपल्यासमोर स्पष्ट उभे राहते. निकोलाओ मनुची हा या सुमारास मिर्झाराजे जयसिंगाच्या हाताखाली तोफखान्याचा अधिकारी म्हणून होता. त्याचे 'मोगलांची कथा' हे एक मोठे बहुमूल्य साधन आहे. मिर्झाराजे जयसिंग हा कसलेला सेनापती होता. तो म्हणजे शाहिस्तेखान नव्हे. त्याने शिवाजी महाराजांना कमी लेखले नाही. त्याची योजना अशी होती की, महाराजांविरुध्द उघडलेली मोहीम ही अल्पकाळात आणि तडकाफडकी पार पाडली पाहिजे. शिवाजी महाराज आणि त्यांचे शेजारी म्हणजे विजापूरचा आदिलशहा आणि पोर्तुगीज यांचे सबंध तोडले पाहिजेत. कल्याण, लोहगड आणि पुणे अशा मर्मस्थळी जबर लष्करी पथके ठेवण्यात यावीत, म्हणजे शिवाजी महाराजांना आपल्या स्वतःच्या राज्यातून बाहेर पडता येऊ नये हा त्याचा बेत होता. याबरोबरच शिवाजी महाराजांच्या राज्यावर हल्ले करुन प्रदेश उध्वस्त करने हा त्यांचा हेतू होता. यातून शिवराय मोगलांना शरण येतील आणि आपण ठरविलेली योजना यशस्वी होईल असे मिर्जाराजे जयसिंग यांना वाटत होते.

पुण्यात आल्यावर मिर्झाराजे जयसिंग हा पुरंदरच्या किल्ल्याकडे निघाला. पुणे प्रांतावर इहनिशामखान याची आणि त्याच्या मृत्यूनंतर कुबादखान याची नेमणूक करण्यात आली. त्याच्याबरोबर चार हजार घोडेस्वार देण्यात आले. १४ मार्च १६६५ रोजी जयसिंगाने पुणे सोडले व तो २९ मार्च रोजी पुरंदरच्या किल्ल्याच्या लगत असलेल्या सासवड गावी पोहोचला. त्याचा दुय्यम सेनापती दिलेरखान हा आघाडीच्या सैन्ये आणि मजबूत तोफखाना घेऊन यापूर्वीच पुढे गेला होता. ३० मार्च १६६५ रोजी पुरंदरचा वेढा सुरु झाला. मराठे हे जोरदार हल्ले करीत होते. तरीपण पुरंदर आणि रुद्रमाळ या दोन किल्ल्यांच्या मध्ये ठाण मांडून राहण्यात मोगलांना यश मिळाले. मोगलांचे फिरती सैन्य महाराजांच्या स्वराज्यात सतत संचार करीत होती, आणि दिसेल ते उध्वस्त करीत होती. मराठ्यांनी निकराचे लढे दिले. नेताजी पालकरने परांड्याच्या प्रदेशावर आक्रमण केले. आकस्मात हल्ले करीत हे हल्ले रात्री होत. ते रस्ते बंद पाडीत आणि दुर्घट स्थळे ताब्यात घेऊन लढवीत. ते जंगलातून आगी लावीत. त्यांच्या ह्या हल्यांच्यामुळे मोगलांच्या सैन्याची परिस्थिती अतिशय बिकट झालेली होती. सैन्यातील अनेक जनावरे जायबंदी झाली होती.अशा प्रकारे मराठे आणि मोगल यांच्यातले युध्दातील धूमशचक्रे चालूच होती.[६]

मोगलांच्या फिरत्या सैन्यासाठी जयसिंगाने खानदेशचा सुभेदार दाऊदखान याची सेनापती म्हणून नेमणूक केली. त्याच्याबरोबर सात हजार सैन्य देण्यात आले. राजा रायसिंग, शर्जाखान, अमरसिंग चंद्रावत, मुंहम्मद सालेह या मोगल सरदारांनी मराठ्यांचा मुलुख त्यांनी कसा उध्वस्त केला. त्याच्या पुढील उदाहरणांवरुन त्यांच्या मोहिमांचे स्वरुप कळून येते. २७ एप्रिल रोजी दाऊदखान, राजा राजसिंग आणि इतर मोगल अधिकारी हे रोहिडा किल्याच्या परिसरात पोहोचले. त्यांनी पन्नास खेड्यांना आगी लावल्या डोंगरात असलेली चार खेडी जमीनदोस्त करण्यात आली. तेथील अनेक रहिवाशांना कैद करण्यात आले. गुरेढोरे आणि इतर सामनही ताब्यात घेण्यात आले. २ मे रोजी कोंडाण्याच्या परिसरातील खेडी उध्वस्त करण्यात आली. कुतुबूदिनखान हा कुंवारी किल्याकडे चाल करुन गेला होता. त्या भागातील खेडी जाळून टाकली. मोगलांनी लोहगडच्या पायथ्याशी असलेली समृध्द खेडी जाळली. खेडी जाळणे, स्त्रीपुरुष आणि गुरेढोरे ताब्यात घेणे हा

मोगलांच्या हल्याचा एक ठराविक साच्याच बनून गेला. जयसिंगाचा पत्रसंग्रह, हफ्त अंजूमन यामध्ये पुरंदरच्या वेढ्याचे तपशिलवार वर्णन आले आहे. किल्यावर मोगलांचे निकराचे हल्ले आणि मराठ्यांचा तितकाच निकराचा प्रतिकार या पत्र संग्रहावरुन उत्कृष्टपणे दिसून येतो. मराठे पुन्हाः पुन्हा किल्यातून बाहेर पडत आणि मोगलांच्या मोर्च्यावर तुटून पडत. हातगाईच्या लढाया तर रोजच होत. अशा एका लढाईत पुरंदराचा शूर मराठा किल्लेदार मुरारबाजी देशपांडे याने आपले प्राण अर्पण केले. मराठ्यांच्या इतिहासात मुरारबाजी हे नाव अजरामर झाले.

मोगलांनी रुद्रमाळ जिंकून घेतला. त्यामुळे पुरंदर किल्ल्याचा खालचा भाग हा ताबडतोब मोगलांच्या वेढ्यात आला. मोगलांचे मोर्चे किल्याच्या ईशान्य दिशेच्या खडकाला बुरुजाकडे सरकले. मोगलांनी मोठे दमदमे (लाकडी ओटे-प्लॅटफॉर्म) उभे केले. त्यांच्यावर तोफा चढविण्यात आल्या. हे दमदमे उध्वस्त करण्याचा मराठ्यांनी प्रयत्न केला. पण निकराच्या लढाईनंतर त्यांना माघार घ्यावी लागली. मोगलांनी किल्याचे पाच बुरुज हस्तगत केले. मराठे हे किल्याच्या आतील तटबंदीकडे आश्रयासाठी वळले. मराठ्यांची शिबंदी अतिशय अडचणीत होती, पण त्याने निर्धाराची पराकाष्ठा केली सन १६६५ च्या मे च्या अखेरीस वरील प्रमाणे परिस्थिती होती. या युध्दाने आपल्या मुलखाचे नुकसान होत आहे हे पाहून महाराजांनी हे युध्द संपविण्याचा बेत केला. त्यांनी जयसिंगाला एकाहून अधिक पत्रे लिहिली. त्यात त्यांनी पुढील काळात मोगल-विजापूर संघर्षात आपण मोगलांना सहकार्य करु असे सांगितले. जयसिंगाच्या पत्रव्यवहारात ही गोष्ट स्पष्ट झाली आहे. पण शिवाजी महाराजांची ही सूचना तडकाफडकी फेटाळण्यात आली. जयसिंगाला हवी होती ती संपूर्ण शरणागती. पुरंदर हा अल्प काळातच गमवावा लागेल हे शिवाजी महाराजांना दिसू लागले. शिवाजी महाराज हे एकाकी पडले होते. त्यांनी मनाशी ठरविले की आपण ज्या पेचप्रसंगात सापडलो आहोत त्यातून बाहेर पडण्याचा एकच मार्ग आहे आणि तो म्हणजे मिर्झा राजे जयसिंगाशी तह करणे.

जयसिंगाने बादशहाला जो वृत्तांत सादर केला तो असा आहे, पुरंदर जिंकून घेण्यांची मोगलांची केंव्हाही तयारी होती, पण शिवाजी महाराजांच्या खास विनंतीवरुन मराठ्यांनी आपणाहून

किल्ला मोगलांच्या ताब्यात द्यावा आणि किल्यातील मराठा शिबंदीने किल्ला रिकामा करुन द्यावा या गोष्टींना परवानगी देण्यात आली. आलमगीर नाम्यातील नोंदीप्रमाणे किल्यात स्त्री-पुरुष मिळून एकंदरीत सात हजार माणसे होती. त्यापैकी चार हजार लढवय्ये सैनिक होते. पुरंदरचा वेढा हा एक गाजलेला वेढा होय. यानंतर उभय पक्षांत तहाच्या ज्या वाटाघाटी झाल्या मिर्झाराजे जयसिंगाला शिवाजी महाराजांचे सर्व किल्ले हवे होते. उलट जयसिंगाकडून सवलतीच्या अटी मिळाव्या म्हणून त्याने विजापूरच्या मोहिमेकडे वळावे असा प्रयत्न शिवाजी महाराज करीत होते.यावरून शिवराय मानसिक दृष्ट्या सक्षम राहून मिर्झाराजे जयसिंगाला तहात गुंतवून ठेवण्याचा प्रयत्न करित होते. हे त्यांचे मानसशास्त्रीय यश होय.[७]

पुरंदरचा तह करण्यासाठी ज्या अटीची चर्चा होत होती त्यामध्ये शिवराय चाणाक्ष पणाने मिर्झाराजे जयसिंगाना अडकविण्याचा प्रयत्न करीत होते. परंतू मिर्झाराजे सुध्दा राजकीय दृष्ट्या मुत्सद्दी योध्दे होते त्यामुळे ते शिवरायांना तहात गुंतविण्याचा प्रयत्न करित होते. अशा पध्दतीने शिवराय आणि मिर्झा राजे यांच्यात तहाच्या गोष्टीवरुन शह-काटशह होत होते ही अभ्यासण्याजोगी आहे. विजापूरने शिवाजी महाराजांशी तहाची बोलणी करुन काही आश्वासने दिली होती. पण तोपर्यंत फारच उशीर झाला होता. मोगलांशी आपण लढत असतांना विजापूरने आपल्याला पाठिंबा दिला नाही यामुळे महाराजांच्या मनात जी कटु भावना निर्माण झाली होती ती विजापूरच्या वरील आश्वासनाने दूर होणे शक्य नव्हते. महाराजांचा मोगलांच्या विरुध्द जो लढा चालू केला होता, त्यात विजापूरने त्यांच्याशी हातमिळवणी केली असती तर जयसिंगाच्या मोहिमेचे काय झाले असते याचा केवळ तर्क करता येणे शक्य आहे. शेवटी तहाच्या अटी ठरल्या त्या अशा :

१. स्वराज्यातील चार लाख होन (सुमारे सोळा लाख रुपये) उत्पन्नाचे शिवाजी महाराजांचे लहान मोठे असे तेवीस किल्ले मोगल साम्राज्याला देण्यात येतील.

२. राजगड धरुन बारा किल्ले, एक लाख होन उत्पन्नाचे हे प्रदेश शिवाजी महाराजांकडे राहतील. पण अट ही की त्याने औरंगजेब बादशहाची चाकरी करावी व बादशहाबद्दल निष्ठा बाळगावी.

३. शिवाजी महाराजांचा मुलगा संभाजीराजे यांना पाच हजाराची मनसब देण्यात येईल.

४. विजापूरच्या इलाख्याबद्दल महाराज म्हणाले, " त्या राज्यातील चार लाख होन उत्पन्नाचा तळकोकणाचा भाग माझ्या ताब्यात आहे. विजापूर राज्यातील बालाघाटावर असलेले (सांगली, कोल्हापूर इत्यादी) पाच लाख होनाचे महाल आहेत हे इलाखे मला देण्यात यावेत त्याविषयीचे फर्मान मला मिळावे. फर्मानात असा स्पष्ट उल्लेख असावा की पुढे विजापूरचे राज्य जिंकून घेण्यासाठी बादशाही सैन्ये निघतील त्यावेळी वर उल्लेखिलेले तालुके माझ्याकडे ठेवण्यात येतील. या अटीवर मी दरवर्षी तीन लाख होन या हिशोबाने बादशहांना ४० लाख होनाची खंडणी देण्यास तयार आहे."

मोगलांनी शिवाजी महाराजांकडून जे किल्ले घेतले त्यात पुरंदर, कोंडाणा (सिंहगड) , रोहिडा, लोहगड आणि माहूली असे बळकट किल्ले होते. महाराजांच्याकडे ठेवण्यात आलेल्या बारा किल्ल्यात दोनच किल्ले बलदंड होते. एक राजगड आणि दुसरा तोरणा. पुण्याचा मैदानी मुलुख आणि कल्याण-भिवंडीची कल्याणपटी ही मोगलांच्या ताब्यात दिली होती.

शिवाजी महाराजांच्याकडे त्यांच्या वडिलोपार्जित पुणे प्रांतापैकी चार लाख रुपये उत्पन्नाचा एक लहानसा प्रदेश मध्य आणि दक्षिण कोकण हा प्रांत त्यांनी विजापूरकडून जिंकून घेतला होता. याला जोडून सध्याचा सातारा जिल्ह्यात मोडणारे प्रतापगड आणि जावळीचा तालुका आजच्या परिभाषेत बोलावयाचे तर महाराजांचे राज्य दोन जिल्ह्या इतके लहान झाले होते. मोगलांनी जंजिऱ्याच्या शिद्यांना आपल्या चाकरीत घेऊन जंजिऱ्यापर्यंत आपला तबा वाढविला होता. वास्तविक पाहाता जंजिरा हा कोकणात महाराजांच्या कार्यक्षेत्रातील मुलुख होता. मोगलांचे हे वागणे शिवाजी महाराजांना अजिबात आवडले नव्हते. परंतू शिवरायांकडे सयंम असल्यामुळे यातूनही

मार्ग निघेल असे त्यांना वाटत होते. यातच त्यांचे मोठेपण आहे. ते झुंजण्यासाठी शिल्लक राहिले झुंज यशस्वी करुन दाखविली त्यात सर्वकाही आले. ' मोगलांची कथा ' (स्टोरिया द मोगोर ) चा लेखक निकोलाओ मनुची हा मिर्झाराजे जयसिंगाच्या या मोहिमेत त्याच्या हाताखाली काम करीत होता त्याची आणि शिवाजी महाराजांची भेट झाली. त्याची त्याने थोडक्यात माहीती लिहून ठेवली आहे तो म्हणतो, " जयसिंगाच्या छावणीत मी आल्यानंतर थोड्याच दिवसांनी शिवाजी राजे शरण आले. आणि आमच्या छावणीत ते आले. मी रात्रीच्या वेळी जयसिंगाची मर्जी असेल त्याप्रमाणे त्याच्याशी गप्पा मारण्यासाठी आणि खेळ (गंजिफा) खेळण्यासाठी त्याच्याकडे (जयसिंगाकडे) जात असे. त्या काळात एके रात्री राजा (जयसिंग) त्यांचा कारभारी आणि मी असे तिघे खेळत बसलो असता शिवाजी आता आले... त्यामुळे पुढे त्याच्याबरोबर बऱ्याच वेळा बोलण्याची संधी मिळाली. विशेष म्हणजे छावणीतील इतराप्रमाणे मला फारसी आणि हिंदुस्थानी या भाषा येत होत्या. युरोपीयन राजांच्या श्रेष्ठत्वाबद्दल मी त्याना माहीती दिली. शिवरायांचे मत असे होते की, युरोपमध्ये पोर्तुगालच्या राजा शिवाय दुसरा कोणी राजा नाही. अशी त्यांची विचारधारा असलेली मला दिसून आली. मी आपल्या धर्माबद्दलही त्याला माहिती दिली."

मिर्झाराजे जयसिंग आणि शिवराय यांच्यात जो तह झाला त्या तहाच्या अटीबद्दल औरंगजेबाला विशेष उत्साह वाटला नाही. शिवरायाचे सर्व किल्ले काढून घ्यावे अशी औरंगजेबाची इच्छा होती. हफ्त अंजूमनमधील पत्रांवरुन जयसिंगाने याबाबतीत मांडलेले विचार हे भक्कम आणि मुद्देसुद वाटतात. औरंगजेबाने मान्यता दिली खरी पण ती मोकळ्या मनाने दिली असे वाटत नाही. आग्रा येथे शिवाजी महाराजांना त्याने जी वागणूक दिली त्यावरुन हे स्पष्ट होते. जयसिंगाची पत्रे पाहाता तो आपण मांडलेल्या मुद्यावर वाजवी पेक्षा जास्त वेळा भर देतो असा सहज ग्रह होतो. शिवाजी महाराज आणि विजापूर हे दोघे एक होतील आणि त्यामुळे मोगलांना अडचणी निर्माण होतील हा धोका होताच. मोगलांना जय मिळयाल्यामुळे शिवाजी महाराजांचा प्रभाव कमी झाला असला तरी विजापूरच्या मोहिमेत आमच्या बरोबर रहावे म्हणून मोगलांनी त्यांचे मन वळविले. शिवाजी हा केवळ जमिनदार आहे तो अधिकारी वर्गातून निर्माण झालेला आहे. विजापूर आणि

गोवळकोंडा येथील वंशपरंपरेने चालत आलेल्या राजासारखा तो नव्हे शिवाजीची शक्ती दहा वर्षांच्या वर टिकेल असे वाटत नाही. विजापूरच्या विरुध्द जी मोहीम होईल त्या मोहिमेत आम्ही प्रथम शिवाजीचा उपयोग करुन घेऊ. दक्षिणेतील समस्येत मोगल, आदिलशहा, कुतुबशाहा आणि मराठे हे गुंतले आहेत. ही समस्या सोडविण्यासाठी करावयाची पहिली आणि आवश्यक गोष्ट म्हणजे शिवरायांना विजापूरच्या मोहिमेत मोगलांच्या बाजूने लढण्यास लावण्याची इच्छा औरंगजेबाच्या उपरोक्त पत्रातून दिसून येते.

शिवाजी महाराजांच्यावर जयसिंगाने विजय मिळविला होता. आता मोगलांनी विजापूरची मोहीम हाती घेतली. ही मोहीम औरंजेबाच्या खास हुकूमावरुनच काढण्यात आली होती. हे जयसिंगाच्या पुढील वाक्यावरुन स्पष्ट दिसते. यावरुन मिर्झाराजे जयसिंग जेंव्हा आग्राहून निघाले तेंव्हा शिवरायांना पूर्णपणे पराभूत करण्याच्या तयारी निशीच आलेले होते हे सिध्द होते.त्याप्रमाणे मिर्झाराजे जयसिंगाने शिवाजी महाराजांना पराभूत करुन शिवाजी महाराजांचे सर्वस्व लुटले होते.त्यामुळे शिवरायांकडे आजच्या भाषेत सांगायचे म्हणजे फक्त दोन जिल्ह्यापूरते प्रदेश त्यांच्या ताब्यात होते.परंतू अशाही कठीण प्रसंगी शिवराय विचलित झाले नाहीत, मनाने हारले नाहीत.

यावरुन छत्रपती शिवरायांच्या मनोधैर्याची आपल्याला प्रचिती येते. कोणत्याही प्रसंगात शिवरायांनी आपले मनोधैर्य खचू दिले नाही. छत्रपती शिवराय हे आशावादी होते. आलेले संकट जास्त दिवस टिकणार नाही हे शिवरायांना माहित होते. संकटे हे जाण्यासाठीच येतात. हे शिवरायांना माहित होते म्हणून ते कोणत्याच संकटाला घाबरले नाहीत. शिवराय मानसिकदृष्ट्या खूप सक्षम होते.[८]

**आग्रा भेट आणि शिवाजी महाराजांच्या मनोधैर्याचे दर्शन : -**

छत्रपती शिवरायांच्या जीवनातील अतिशय रोमहर्षक प्रसंग म्हणजे आग्रा भेट आणि सुटका होय. बादशाहा औरंगजेबाने शिवरायांना नजरकैदेत ठेवले. औरंगजेबाच्या बंधनातून सुटणे सोपे नव्हते. त्यासाठी छत्रपती शिवरायांनी जे धैर्य आणि जी मानसिकता दाखविली त्याला तोड नाही.

शिवराय जर मानसिक दृष्ट्या दुर्बल राहिले असते तर त्या संकटातून बाहेर निघणे शक्यच नव्हते. परंतु शिवराय मानसिक दृष्ट्या सक्षम होते. कोणत्याही संकटावर कशी मात करावी याचे ज्ञान शिवरायांना होते. मानसिक समतोल ठेवून संकटाला समजून घेणे आणि त्यातून मार्ग काढणे हे शिवरायांचे तंत्र होते. म्हणून प्रसंग कोणताही असो त्यांनी धीरोदात्तपणे त्याला सामोरे गेले. म्हणूनच पराक्रमी राजा म्हणून संपूर्ण जगात शिवरायांची ख्याती पसरली होती.

छत्रपती शिवरायांनी आग्राला जाण्यापूर्वी आपल्या स्वराज्याची नीट व्यवस्था लावली. त्यासाठी त्यांनी त्र्यंबक जी सोनदेव, राधो त्रिमल, दावलजा गाडगे, जिवा महाला, दत्ताजी त्रिंबक अशी जिवाला जीव देणारी आणि इतर चार हजार माणसे सोबत घेतली. आग्र्यास जाण्यापूर्वी स्वराज्यातील आपल्या किल्ल्याचा बंदोबस्त कसा आहे म्हणून बघण्यासाठी महाराज एका किल्यावर रात्रीच्या प्रहरी गेले. किल्लेदारास ' शिवाजी महाराज आले आहेत मागे गनिम आहे म्हणून दार उघडून द्यावे' असा निरोप पाठवला मात्र किल्लेदाराने रात्रीच्या वेळी दार उघडण्यास नकार दिला. त्याने तटावर लोक जमविले आणि महाराजांची सख्त ताकिद आहे की, रात्री दार उघडू नये, म्हणून दार उघडता येणार नाही. यावर महाराजांनी आमची आज्ञा असतांना दार उघडण्यास काय हरकत आहे विचारले. तरीही किल्लेदाराने निर्भयपणे उत्तर दिले. प्रातःकाल होण्यास थोडाच अवधी आहे. शत्रू आल्यास रोखून धरतो पण प्रातःकाल होण्यापूर्वी दार उघडले जाणार नाही दार उघडल्यावर किल्लेदाराने महाराजांची माफी मागितली. महाराज त्याच्या कामाची पध्दती पाहून खुश झाले. स्वराज्याची व्यवस्था चांगली आहे हे त्यांच्या लक्षात आले. ५ मार्च १६६६ रोजी राजगडाहून निरोप घेवून संभाजीराजांना सोबत घेतले. तिकडे 'शिवाजी महाराज ' येणार म्हणून एकच बातमी चर्चिली जात होती. शिवरायांचा द्वेष करणारी ती व्यक्ती म्हणजे औरंगजेबाची मामी शाहिस्तेखानाची पत्नी याच शिवाजीने आपला मुलगा मारला. नवऱ्याची बोटे तोडली म्हणून ती संतापाने धुमसत होती. तिने बादशाहाजवळ या घटनेची उजळणी करुन त्याच्या मनातील वैरभाव प्रज्वलित केला. शाहिस्तेखानाची बहिण जाफरखानाची पत्नी होती. तिनेही जाफरखानास आपल्या भावाचा सूड घेण्यासाठी भडकवणे सुरु केले. जहॉआरा बेगम औरंगजेबाची बहीण

महाराजांनी  सुरत लुटल्यामुळे क्रोधीत होती.एकंदरीत मुघलांच्या शाही घराण्यातील महिला वेगवेगळ्या कारणामुळे शिवरायांवर क्रोधीत झाली होती. यासगळ्या गोष्टीचा बदला बादशहा औरंगजेबांनी घ्यावा असे या सर्वांना वाटत होते.

औरंजेबाच्या भेटीस जाण्यासाठी शिवाजी महाराज तयार नव्हते कारण औरंगजेब हा अतिशय धूर्त व्यक्ती असून तो आपल्या शत्रूचा काटा काढण्यासाठी सदैव तयार असतो.म्हणून अशा व्यक्तीच्या भेटीला जाणे म्हणजे प्रत्यक्ष मृत्यूशीच गाठ पडणे होते. पण मिर्झाराजे जयसिंग आणि त्यांचा मुलगा रामसिंह यांनी औरंजेबाला जो विश्वास दिलेला होता. त्यामुळे राजधर्मानूसार औरंगजेबाला भेटायला जाणे क्रमप्राप्त होते.[१]

## औरंगजेब बादशहाचा वाढदिवस आणि शिवरायांचा करारी बाणा

पुरंदरच्या तहात ठरल्याप्रमाणे शिवाजीराजे औरंगजेबाच्या भेटीला आग्र्याला यावे.त्यांच्या सुरक्षिततेची सर्व काळजी मिर्झाराजे जयसिंग घेतील.याअटीमुळे शिवराय आग्र्याला निघाले. ज्या दिवशी शिवराय औरंगजेब बादशहाच्या दरबारात पोहचले होते त्या दिवशी औरंगजेब बादशहाचा वाढदिवस होता. तो वाढदिवस अतिशय थाटामाटात साजरा केला जात होता. या दिवसाचे औचित्य साधून रामसिंह शिवरायांची भेट औरंगजेबाशी घडवून आणणार होता. महाराज बरोबर एक दिवस आधी म्हणजे ११ मे १६६६ रोजी माणिकचंद सराई येथे पोहोचले. शाही शिरस्त्याप्रमाणे आणि महाराजांच्या अपेक्षेप्रमाणे महाराजांच्या स्वागतासाठी औरंगजेबाने विशेष रहस्य दाखविले नाही. तशी काही खास व्यवस्था केली नाही. ही गोष्ट महाराजांना अपमानजनक वाटली. अडीच हजारी मनसबदार असलेला जयसिंहाचा मुलगा रामसिंह याचा कारकुन मुन्शी गिरधरलाल महाराजांना सामोरा गेला दुसऱ्या दिवशी म्हणजे १२ मे रोजी जयसिंह महाराजांना दरबारात नेणार होते. त्यादिवशी बऱ्याच उशिरापर्यंत दरबार चालणार होते. शिवराय औरंगजेबाच्या भेटीस गेले. महालाभोवती पहारे ठेवण्याचे काम असल्यामुळे रामसिंहास उशीर झाला. औरंगजेबाने महाराजांची विशेष दखल न घेता शिवाजी महाराजांना पंचहजारी मनसबदारांच्या रांगेत उभे केले. या

अपमानजनक वागणुकीमुळे शिवाजी महाराज संतापले. हिंदूस्तानचा बादशहा आपल्या समोर असतांना यत्किंचीतही न घाबरता शिवरायांनी जो करारी बाणा दाखविला त्याला मराठ्यांच्या इतिहासात तोड नाही. औरंगजेबाशी वैर म्हणजे साक्षात मृत्यूशीच भेट होती. परंतू शिवराय मृत्यूला घाबरणारे नव्हते. त्यांना अपमानित होवून जगण्यापेक्षा मानाने आणि सनमानाने व्यक्ती जगला पाहिजे ही त्यांची भूमिका होती. म्हणून त्यांनी कपटी आणि धूर्त असणाऱ्या औरंगजेबाची तमा न बाळगता आपल्या मानसिक धैर्याचे जे दर्शन घडविले त्यामुळे संपूर्ण दरबार अचंबित झाला. त्यातून शिवरायांच्या स्वाभीमानाची चर्चा संपूर्ण आग्रा शहरामध्ये पसरली.यावरुन शिवरायांचा करारी आणि बाणेदार स्वभाव दिसून येतो.[१०]

**शिवरायांचे आग्र्याहून सुटका आणि मानसिक सामर्थ्य :**

शिवराय मानसिक दृष्ट्या खूप कणखर होते. त्यामुळे ते कोणत्याही संकटाला घाबरले नाहीत. उलट त्या संकटावर मात कशी करता येईल. याचाच विचार त्यांनी केलेला दिसून येतो. आग्र्याहून सुटका करुन घेत असतांना सुध्दा त्यांनी आपल्या मनाचा समतोल ढळू दिला नाही. अतिशय सामंजस्याने त्यातून मार्ग काढला आणि त्यात ते यशस्वी झाले.

शिवाजी महाराजांना शोधण्यासाठी मोगलांनी कसून प्रयत्न केले. मोगल दरबाराच्या बातमी पत्रात मोगलांनी माळवा आणि दक्षिण या प्रातांत केलेल्या अनेक धरपकडीचे उल्लेख आहेत. शिवाजी महाराजांनी जो मार्ग स्विकारला तो म्हणजे मोगल प्रदेशापासून जितके लांब अंतर दूर राहता येईल तितके अंतर पाहूनच त्यांनी आपली योजना आखली. त्यांनी निवडलेला मार्ग पूर्व भारताकडील असलेला दिसतो. मराठी बखरकार सभासद आणि मोगलांचा इतिहासकार भिमसेन सक्सेना हे दोघेही सूचवितात की, शिवरायांने निवडलेला मार्ग हा अलहाबाद, बनारस ,गया, गोंडवण असा होता. सुरुवातीला शिवराय हे बनारसला गेले.तेथून ते सध्याच्या मध्यप्रदेशातील सरगुजा जिल्ह्यात गेले असले पाहिजेत. असे इतिहासकारांचे मत आहे. अंबिकापूर ( सरगुजा

जिल्ह्याचे मुख्य ठिकाण) अमरकंटक, विलासपूर नजिकचे रतनपूर, रायपूर,बस्तर आणि गोवळकोंडा या मित्र राज्यांचा प्रदेश हा महाराजांचा मार्ग असलेला दिसून येतो.

शिवरायांचा हा मार्ग अनेक संकटे आणि धोक्यांनी भरलेला होता. एकाहून अधिक वेळा महाराज हे मोगलांच्या हाती सापडतात की काय? अशी परिस्थिती निर्माण झाली होती. इतिहासकार खाफीखान याने त्या काळात सर्व तो मुखी असलेल्या काही गोष्टी आपल्या ग्रंथात दिलेल्याआहेत. शिवराय राजगडला सुरक्षितपणे आले.मराठ्यांनी हा प्रसंग अतिशय आनंदाने व जल्लोषाने साजरा केला. अल्पकाळातच संभाजी राजेही वडिलांना येवून मिळाले. शिवाजी महाराज एकदा राजगडला पोहचल्यानंतर झालेली चूक दुरुस्त करणे औरंगजेबाला अशक्यच होते. औरंगजेबाने अशी चूक का केली ? याचा शोध घेत असतांना असे लक्षात येते की,त्याची दोन कारणे दिसून येतात. एक कारण दक्षिणेतील मोहिमेत त्याला अपयश आल्यामूळे तो गोंधळलेल्या मनस्थितीत असावा,दुसरे कारण म्हणजे त्याच वेळेला इराण हे हिंदुस्थानवर आक्रमण करणार अशी मोठी अफवा त्याकाळी पसरली होती. या गोष्टीला पन्नास वर्ष लोटली होती. अहमदनगर येथे औरंगजेब हा मृत्यूचे क्षण मोजीत होता. त्याक्षणी सुध्दा शिवाजी महाराज हे आग्रा येथून सुटका करुन घेवून गेले.या घटनेची त्याला आठवण येत होती. आणि या घटनेची त्याला खंत वाटत होती. त्याने आपल्या मृत्यूपत्रात म्हटले आहे की, ' आपण क्षणभर गाफिलपणा केला त्यामुळे शिवाजीला सुटून जाता आले त्याचे परिणाम म्हणून कायमची डोके दुखी आपल्या मागे लागली आहे '. यावरून शिवराय आग्राहून सुटका करुन घेण्याला किती महत्त्व आहे हे दिसते. शिवराय मानसिक दृष्ट्या समर्थ असल्यामुळेच अशा गुंतागुंतीच्या प्रसंगातून सहिसलामत सुटून आले हे शिवरायांच्या कौशल्याचे कसब होते. [११]

**राज्यभिषेक - शिवरायांचा मानशास्त्रीय विजयः-**

छत्रपती शिवरायांचा राज्याभिषेक ही घटना मध्ययुगीन भारताच्या इतिहासातील युगांतरकारी घटना होती. मध्ययुगीन काळात आपल्या हिंदूधर्मात असा एक विचार प्रवाह निर्माण झालेला होता की, या देशात आता क्षत्रिय शिल्लक राहिला नाही. कारण परशुरामाने २१ वेळा पृथ्वी

निःक्षत्रिय केलेली आहे.त्यामुळे या पृथ्वीतलावर क्षत्रिय शिल्लकच राहिला नाही. राजा फक्त क्षत्रियालाच होता येते अशा विचार धारेच्या काळात छत्रपती शिवरायांनी स्वतःस राज्याभिषेक करवून घेण्याचे ठरविले. यावरुन शिवराय वैज्ञानिक दृष्टिकोन बाळगणारे होते. हे सिध्द होते. तरीही शिवरायांना प्रस्थापित धर्मपंडीताकडून विरोध झाला. परंतु शिवराय अशा खुळचट भावनेला मानले नाहीत. अशा अंधश्रध्देचा आणि अनिष्ट रुढीचा आपल्या मनावर परिणाम होऊ दिला नाही. यातून छत्रपती शिवरायांच्या मनाच्या विकासाचा आणि त्यांच्या मानसिक धैर्याची आपल्याला कल्पना येते.

छत्रपती शिवराय जर मानसिक दृष्ट्या दुर्बल राहिले असते तर या अंधश्रध्देला बळी पडले असते. स्वराज्य निर्माण करण्याचे राजा होण्याचे धाडस त्यांच्या मनात निर्माण झाले नसते. म्हणून स्वराज्य निर्माण करण्याचे प्रारंभ त्यांच्या मानसिक विजयात आहे. हे आपल्याला या ठिकाणी दिसून येते. यातून शिवराय मानसिकदृष्ट्या किती सक्षम होते हे दिसून येते.

छत्रपती शिवाजी महाराजांचा राज्याभिषेक म्हणजे भारताच्या इतिहासातील एक लक्षणीय घटना आहे. मोगल सत्तेच्या काळात भारतातील मोगल साम्राज्य म्हणजेच भारतीय सरकार असे समीकरण भारतीय आणि परकीय, असे दोघेही करीत. मोगलांशी आंतरराष्ट्रीय तहनामे आणि करार जे होत ते हिंदुस्थानाशी झाले असे समजण्यात येई. श्रेष्ठ मोगल (द ग्रेट मोगल) मोगल बादशहा, (एम्परर ऑफ इंडिया) भारताचे सम्राट असे शब्द त्या काळच्या आंतरराष्ट्रीय कागदपत्रांत सहजपणे वापरले जात. भारताच्या कानाकोपऱ्यातील म्हणजे दक्षिणेतील केरळ आणि किनारपट्टीवरील युरोपियनांच्या लहान वसाहती सोडता हिंदुस्थानात स्वतंत्र म्हणता येईल असे एकही राज्य नव्हते. भारताच्या बहुतांश प्रदेशावर मोगल सत्तेचा अमल होता. काही राज्ये वगळण्यात आली. ती म्हणजे उत्तरेतील रजपूत राज्ये किंवा दक्षिणेतील विजापूर आणि गोवळकोंडा ही राज्ये होत. रजपूत राज्यांची स्थिती खालावत खालावत जहागिरी किंवा जमीनदाऱ्या अशा स्वरुपाची राहिली होती. अशा काळात शिवरायांनी राजा होण्याचे आणि स्वराज्य स्थापन करण्याचे जे विचार मनात आणून त्याचे रुपांतर कृतीत केले. मध्ययुगीन काळामध्ये रयतेला आणि जनतेला

जो मान आणि सन्मान मिळत होता. तो मान आणि सन्मान त्या भागाचा,त्या प्रदेशाचा प्रमुख कोण आहे यावरुन होत होता.म्हणून शिवरायांनी आपल्या रयतेला मान आणि सन्मान मिळून देण्यासाठी स्वराज्याची संकल्पना आमलात आणली. तशी ती संकल्पना शहाजी राजे भोसले यांची होती. शहाजीराजे भोसल्यांना दक्षिणेत आपले एक प्रबळ राज्य असावे असे त्यांना वाटत होते. परंतू काळाच्या ओघात त्यांना ते शक्य झाले नाही. म्हणून त्यांनी अहमदनगरची निजामशाही टिकवण्यासाठी अटोकाट प्रयत्न केला. परंतू मोगल आणि आदिलशाही एकत्र झाल्यामूळे शहाजी राजांचा निभाव लागला नाही. दक्षिणेतील साम्राज्याचे प्रतिनिधित्व दक्षिणेतील राजांनी करावे असे शहाजीराजांना वेळोवेळी वाटत होते म्हणून त्यांनी तो वारसा शिवरायांना दिलेला होता. तो वारसा शिवरायांनी यशस्वी करुन दाखविला. १६४५ ते १६७४ या २९ वर्षाच्या अखंड परिश्रमानंतर शिवाजी महाराजांनी स्वराज्याची स्थापना करुन स्वत:स राज्याभिषेक करुन घेतला आणि आपल्या रयतेला आदिलशाही आणि मोगलशाही यांच्या गुलामगिरीतून मुक्त केले. यावरुन शिवराय थोतांड विचारसरणीला बळी पडणारे नव्हते हे सिध्द होते.म्हणूनच त्यांनी आपल्या मन आणि मनगटाच्या बळावर हिंदवी स्वराज्याची स्थापना केली. हे त्यांच्या मानसिक विजयाचे उत्तम उदाहरण आहे.[१२]

**हिंदवी स्वराज्याची स्थापना-मानसिक गुलामगिरीला मूठमाती :**

शिवाजी महाराजांनी आपला राज्याभिषेक करुन घेतला आणि ते स्वतंत्र असे छत्रपती राजे झाले. ही घटना म्हणजे भारताच्या कानाकोपऱ्यातून भारतीय जनता उठून उभी राहिली या गोष्टीचे द्योतक होय. उद्देश होता हिंदवी स्वराज्याचा म्हणजे भारतात भारतीय राजांचा मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनात 'हिंदवी स्वराज्य' हा शब्द अनेक वेळा वापरला गेला आहे. शिवाजी महाराजांनी अनेक प्रदेश जिंकून घेतले असले तरी सन १६७४ पर्यंत तांत्रिक दृष्टीने ते मोगल बादशहाच्या प्रजाजनापैकी होते. मोगलांची चाकरी बजावणारे मराठे सरदार काय किंवा विजापूरचे बादशाहा काय हे महाराजांना अद्यापही आदिलशाहापेक्षा दर्जाने कमी लेखीत महाराजांनी आपल्या कर्तबगारीने जे स्थान मिळवले होते त्याला कायदेशीर स्वरुप देणे आवश्यक होते. त्यासाठी त्यांनी

स्वतःस राज्याभिषेक करुन घेतला. शिवाजी महाराजांचा राज्याभिषेक झाला पाहिजे ही इच्छा प्रजेच्या सर्व वर्गात पसरली होती. या सार्वजनिक भावनांना वाट करुन देण्याचे काम थोर ब्राम्हण पंडित, वाराणशीचे विश्वेश्वर उर्फ गागाभट्ट यांनी केले. महाराजांचा चरित्रकार, सभासद हा राज्याभिषेक प्रसंगी हजर होता. तो लिहितो.

" पुढे वेदमूर्ती गागाभट्ट म्हणून वाराणशीहून राजियाची किर्ती ऐकून दर्शनास आले. भट गोसावी यांचे मते, मुसलमान बादशाहा तक्ती बसून छत्र धरुन, पातशाही करितात, आणि शिवाजीराजे यांनीही चार पातशाही दबविल्या आणि पाऊण लाख घोडा लष्कर गडकोट असे (मेळविले) असता त्यास तक्त नाही. या करिता मऱ्हाठा राजा छत्रपती व्हावा असे चित्तांत आणिले. आणि (तें) राजियासही मानिले. अवघे मातबर लोक बोलावून आणून विचार करिता सर्वांचे मनास आले तेंव्हा भट गोसावी म्हणू लागले की, तक्ती बसावे !"[१३]

स्वतंत्र राज्याची स्थापना हे शिवाजी महाराजांचे ध्येय होते. मोगलांशी त्यांचे चाललेले युध्द सन १६७० मध्ये सुरु झाले व ते सतत चालू होते. यावरुन शिवाजी महाराजांच्या निर्धाराची कल्पना येते. राज्याभिषेकानंतर महाराजांनी आपली नाणी पाडली, आणि स्वतःचा शक चालू केला. या दोन्ही घटना म्हणजे त्यांच्या स्वतंत्र राज्याची चिन्हेच होती. पुढे बुंदेला छत्रसाल यानेही महाराजांचे अनुकरण केले. शिवाजी महाराजांनी त्याला आशिर्वाद दिला होता. छत्रसालाने मध्य भारतातील बुंदेल खंडात स्वराज्याची स्थापना केली आणि शिवाजी महाराजांचे अनुकरण म्हणून त्याने इ.स. १६८७ मध्ये राजा म्हणून राज्याभिषेक करवून घेतला. पुढे १९ मे १६७४ रोजी शिवाजी महाराजांनी प्रतापगडाला भेट दिली, देवी भवानीचे दर्शन घेतले. त्यावेळी त्यांनी देवीला सोन्याचे छत्र अर्पण केले. छत्राचे वजन ३ मण होते. आणि त्याची किंमत ५६ हजार रुपये होती. शिवाजी महाराज हे क्षत्रिय होते. दरम्यानच्या काळातील राजकीय घालमेलीमुळे क्षत्रियांनी पाळावयाचे संस्कार लुप्त झाले होते. त्यामुळे प्रथम उपनयनाचा संस्कार करण्याची आवश्यकता होती. त्यानंतर महाराजांचे तुलादान झाले. त्यानंतर श्री विष्णूच्या सुवर्णमुर्तीचे दान (तुला पुरुषदान) करण्यात आले. त्यानंतर

महाराजांचा आपल्या पत्नींशी दुसऱ्यांदा विवाह समारंभ करण्यात आला. हे सगळे समारंभ २९ आणि ३० मे या दिवशी झाले.

छत्रपती शिवरायांचा ज्या दिवशी राज्याभिषेक सोहळा संपन्न झाला. त्यादिवशी ब्रिटिशांचा वकील हेन्री ऑक्सिडंन हा रायगडावर हजर होता. महाराजांच्या तुलादानासबंधी तो लिहितो."आज हिंदूच्या पध्दतीप्रमाणे राजाचे सोन्यानाण्यात तुलादान करण्यात आले. ही रक्कम ६० हजार पॅगोडा इतकी भरली. पुढे या रकमेत आणखी १ लाखाची भर घालण्यात येणार आहे. येथे शेजारील देशोदेशींहून मोठ्या संख्येने ब्राम्हण जमले आहेत. राज्याभिषेकानंतर ही रक्कम त्यांच्यात वाटण्यात येणार आहे." राज्याभिषेकचा समारंभ संपूर्णपणे वैदिक पध्दतीने पार पाडण्यात आला. सन ६ जून १६७४ या दिवसी सकाळी शिवाजी महाराज हे सिंहासनारुढ झाले. तो दिवस खरोखरीच संस्मरणीय होय. यावरुन मध्ययुगीन काळात राजाच्या राज्याभिषेकाला किती महत्त्व होते हे दिसते.म्हणून शिवरायांनी काळाची पावले ओळखून हिंदवी स्वराज्याची स्थापना करुन स्वत:स राज्याभिषेक करुन घेतला पूढे स्वराज्याचे सुराज्यात रुपांतर केले.[१४]

**समुद्र पर्यटन आणि शिवरायांचे मानसशास्त्र** :

तथाकथित हिंदू धर्मानुसार समुद्रावर प्रवास करणे निषिध्द मानल्या जात होते. म्हणून प्राचीन आणि मध्ययुगीन काळात प्रत्येक भारतीय समुद्रावर प्रवास करण्यास घाबरत असे. परंतु मानसिक दृष्ट्या सक्षम असणाऱ्या छत्रपती शिवरायांनी मध्ययुगीन काळात समुद्रावर प्रवास करण्यास घाबरले नाहीत. एवढेच नाही तर त्यांनी समुद्रावर वेगवेगळे किल्ले उभारुन स्वराज्याचे रक्षण केले.अंधश्रध्दा आणि वाईट रुढी परंपरा न मानता वैज्ञानिक दृष्टीकोनाचा वापर केला आणि समुद्र प्रवास सर्वांसाठी खुला केला. समुद्रावर वेगवेगळे उद्योगधंदे उभारुन लोकांना रोजगार उपलब्ध करुन दिले. अंधश्रध्दा बाळगत बसले नाहीत. तर आपल्या स्वराज्याचे रुपांतर सुराज्यात कसे करता येईल याचाच शिवरायांनी विचार केला आहे. रयतेचे कल्याण कोणत्या गोष्टीत सामावलेले आहे याचा सतत विचार शिवरायांनी केलेला होता. खुळचट भावना आणि अंधश्रध्देला

जोपासत बसण्यात काहीच तथ्य नाही हे शिवरायांनी ओळखले होते. समुद्र किनाऱ्यावर विविध ठिकाणी मिठागरे निर्माण करुन त्या भागातील शेतकऱ्यांना जोडधंदा म्हणून मिठाचा व्यवसाय निर्माण करुन दिला. ज्यामुळे शेतकऱ्यांना दिलासा मिळाला. आपल्या सकारात्मक विचाराने शिवराय प्रशासन केलेले दिसून येतात.शेती सोबतच त्याभागातील शेतकऱ्यांना व्यवसायाभिमुख करुन शेतकऱ्याला स्वावलंबी बनविले.

सिंधू नदीच्या उगमापासून ते कावेरीच्या पर्यंत हिंदवी स्वराज्याची सीमा असली पाहिजे ही शिवरायांची भूमिका होती. जम्मू कश्मीर ते तामिळनाडू म्हणजे उभा भारत हे हिंदवी स्वराज्याची सीमा असावी असा महाराजांचा निश्चय होता. जो समुद्रावर राज्य करेल तो अजिंक्य राहिल ही दूरदृष्टी असणाऱ्या महाराजांनी निश्चितपणे ओळखले होते. आणि त्यासाठीच जगाला हेवा वाटेल आणि संपूर्ण जगात दरारा राहिल असे आरमार निर्माण करणे हे महाराजांचे ध्येय होते. परंतु त्याचवेळी धर्ममार्तंड व धर्मपीठे आरमार उभे करण्यास  व समुद्र पर्यटन करण्यास अशुभ मानत होते, तसे लोकांवर बिंबवत होते. अरबस्थान, आफ्रिका आणि युरोप मधील लोक एका महासागरातून दुसऱ्या महारासगरापलीकडे जाऊन आपले साम्राज्य निर्माण करीत असतांना पुढे त्यांची वक्रदृष्टी भारत देशावर सुध्दा पडणार हे महाराजांना माहित होते. आणि म्हणूनच एका ठिकाणी उल्लेख करतांना त्यांनी इंग्रजाबद्दल हे लोक खुप चतूर असतात आणि यांना भूमीचा लोभ फार असे म्हटले आहे. व्यापाराच्या निमित्ताने आलेले परकियांची ही भावी रणनिती अगदी सुरुवातीलाच महाराजांनी ओळखली होती. समुद्राचे महत्त्व शिवराय ओळखले होते.यातून त्यांची दूरदृष्टी आणि वैश्विक दृष्टिकोनाची प्रचिती येते.[१५]

शिवरायांचा हा दूरदृष्टीपणा जर पुढे या देशातील लोकांनी चालविला असता तर कदाचित हा देश इंग्रजांच्या गुलामीत कधीच गेला नसता स्वराज्याची उभारणी आणि रक्षण करण्यसाठी प्रबळ आरमार तर हवे होतेच शिवाय पार अरबस्थान पर्यंत धडक मारण्याचीही गरज होती. याला दुसरे कारणही होते ते म्हणजे जंजिऱ्याचे हाबशी (आफ्रिकेतून आलेले लोक ) कोकण किनार पट्टीतील

स्त्रिया, पोरे यांना जबरदस्तीने उचलून नेऊन आफ्रिकेच्या बाजारात गुलाम म्हणून विकत होते. माणसांना गुलाम म्हणून विकत घेणारी इंग्रज व इतर युरोपीय राष्ट्रातील तीही माणसेच होती. परंतु साम्राज्यवादापुढे माणुसकी आणि मानवता विसरलेली जिवंत माणसांची अशी गुलाम म्हणून होणारी विक्री थांबावी व लोकांना शोषणमुक्त करावे हा ही धोरणी विचार प्रबळ आरमार बांधणीच्या मागे होता. शिवाय अंतराष्ट्रीय व्यापार हा सागरी मार्गानेच होत होता. त्यामुळे व्यापार वृध्दिंगत करणे सागरावरील चाचेगीरीला आळा घालणे व स्वराज्याचे सीमा रक्षण करणे अशा तिहेरी हेतूने आरमार उभारणी काळाची गरज होती. त्यामुळे इ.स. १६५९ पासूनच शिवाजी महाराजांनी आरमारात तळ उभे करण्यास सुरुवात केली. त्यांनी पश्चिम किनारपट्टीवर विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग बांधले. आरमाराची ही नितांत गरज ओळखणारा राजा शिवाजी दूरदर्शी होता. याचे हे उत्तम उदाहरण आहे. आरमार उभारणीसाठी निधीची आवश्यकता होती आणि त्यासाठी शिवाजी महाराजाने सुरतेवर छापा घातला व मिळालेली सगळी संपत्ती सागरी दुर्ग बांधण्यासाठी व आरमार उभारणीसाठी वापरली. संगमीरी (डिस्ट्रॉयर) नावाच्या नवीन प्रकारच्या युध्दनौका महाराजांनी बांधून घेतल्या. यातून शिवरायांना आरमार दल अधिक प्रभावी करावयाचे होते. भविष्यात आपल्या स्वराज्यावर सागरी मार्गाने आक्रमण होवू शकते. ही दूरदृष्टी शिवरायांकडे होती. त्याची प्रचिती आपल्याला २६ नोव्हें २००८ मध्ये पाकिस्तानातून आलेल्या दहा अतिरेक्यांनी मुंबई शहरावर हल्ला करुन दोनशे पेक्षा जास्त निष्पाप लोकांचे बळी घेतले यावरुन शिवरायांची आरमार उभारणी मागील मानवतावादी दृष्टीकोन दिसतो.

हिंदुस्थानच्या सागरी गरजा लक्षात घेऊन किल्ले व जहाजे बांधून सुसज्ज आरमार उभे केले. शिवाय आरमाराची जबाबदारी स्थानिक भूमिपूत्र परंतु पाण्यावरील लढाईत तरबेज असणाऱ्या धाडसी कोकण किनारपट्टीतील लोकांनाच दिली. त्यांच्या आरमारात सागरी, कोळी, भंडारी, परब, गावित, कुणबी अशा साहशी लोकांना सामिल करुन घेतले. धर्मगुरुंचा, पंडीताचा व धर्मपीठांचा सल्ला घेत बसले असते तर शिवाजी महाराजांचे आरमार बांधणीचे स्वप्न केंव्हाच साकार झाले नसते. त्यामुळे काळाची गरज ओळखून पाप पुण्य या संकल्पनेच्या पलीकडे जाऊन

शिवाजी महराजांनी जगात दरारा राहिल असे आरमार उभे केले. विशेष म्हणजे त्यावेळच्या एकाही हिंदुस्थानी राजांना आरमाराची गरज वाटली नसतांना शिवाजी महाराजांनी हे क्रांतिकारक पाऊल उचलेले आणि पूर्णत्वास नेले. ज्यांनी शिवाजी महाराजांच्या आरमार उभारणीला त्यावेळी विरोध केला तेच शिवाजी महाराजांना दूरदृष्टीचे राजे होते असे मान्य करतात. चित्रगुप्ताने महारांजाच्या आरमाराची बखरीत दिलेली यादी खालील प्रमाणे आहे.

| अ.क्र. | नाव | संख्या |
|---|---|---|
| १. | थोरगुराबा | ३० |
| २. | गलबते | १०० |
| ३. | महागिऱ्या | १५० |
| ४. | लहान गुरबा | ५० |
| ५. | होड्या | १० |
| ६. | लहान होड्या | १५० |
| ७. | तारवे | ६० |
| ८. | पाल | १५ |
| ९. | मचवे | ५० |

यावरुन शिवरायांच्या आरमारातील सुसूत्रता दिसून येते.[१६]

## छत्रपती शिवराय एक उत्तम समुपदेशक

कोणत्याही व्यक्तीला उत्तम समुपदेशक होण्यासाठी मानसशास्त्राचा उत्तम अभ्यास असावा लागतो. शिवरायांना मानसशास्त्राचे उत्तम ज्ञान असल्यामुळे ते उत्तम समुपदेशक होऊ शकले. छत्रपती शिवराय एक उत्तम राज्यकर्ते होते. त्याचबरोबर ते एक उत्तम कुटुंबप्रमुख होते. कुटुंबात

निर्माण झालेल्या वादविवादात त्यांनी महत्वाची भुमिका पार पाडली आपल्या संवाद कौशल्याने त्यांनी अनेक प्रश्न सोडविले म्हणून छत्रपती शिवराय एक उत्तम समुपदेशक होते. छत्रपती शिवाजी महाराज राज्यकारभार करतांना प्रशासकीय कामकाज करतांना जसे अखंड सावधान होते. तसेच घरच्या आघाडीवरही कायम आपल्या जबाबदाऱ्या पार पाडतानाही कमालीचे सतर्क आणि नविन पिढीला विश्वासात घेऊन काम करणारे व्यक्तिमत्व होते आपण छत्रपती आहोत म्हणून आपली मते घरच्यांवर लादण्याचा महाराजांनी कधी प्रयत्न केलेला नाही. कौटुंबिक निर्णय घेतांना ज्यांच्या संदर्भात निर्णय घ्यावयाचा आहे. त्यांच्याशी सल्ला मसलत करुन निर्णय घेत असत. त्यांच्याशी सल्ला मसतलत करुन निर्णय घेण्याची लोकशाही परंपरा त्यांनी घरापासूनच सुरु केली. छत्रपती संभाजी महाराजांच्या दुसऱ्या लग्नाचा विषय समोर आला तेंव्हा ही गोष्ट प्रकर्षाने जाणवते. आपले विचार आणि निर्णय यात तरुण पिढीला समाविष्ट करुन महाराज नव्या जुन्या विचारांची सांगड घालत व परिणामकारक निर्णय घेत असत. महाराजांचे निर्णय हे काळाच्या कसोटीवर युगानुयुगे मानवी संस्कृतीमध्ये आपले स्थान कायम करतील अशाच प्रकारचे होते.

शंभूराजे त्यावेळी एकोणवीस वर्षाचे होते आणि राज्याभिषेकसमयी त्यांना युवराज आणि स्वराज्याचे वारसदार म्हणून जाहीर करण्यात आल्यानंतरचा हा प्रसंग आहे. छत्रपती शिवरायांची थोरली कन्या राणू अक्का मामाच्या घरी म्हणजेच जिजाऊ साहेबांच्या जाधव घराण्यात सिंदखेड राजा येथे देण्यात आली होती. मामाच्या घरी मुलगी देण्याची पध्दत सत्तराव्या शतकात जन्माला आली नसून पाच हजार वर्षापूर्वीही महाभारत काळात असे स्नेह सबंध आणि विवाह सबंध जोडले जात व जुन्या वाटा नव्याने चालू ठेवल्या जात. त्यासाठी रोटीबेटी हा सर्वात सोयीस्कर मार्ग होता. छत्रपती शिवाजी महाराजांचे थोरले जावई रुस्तुमराव जाधव संभाजी राजांच्या दुसऱ्या विवाहाचा प्रस्ताव घेऊन रायगडावर आले. त्यांनी महाराजंसमोर तसा प्रस्ताव ठेवला. तेंव्हा महाराजांनी ," त्या सोयरीकी संदर्भात आम्हाला आनंदच होईल. परंतू याबाबतच निर्णय मात्र नंतर देऊ असे सांगितले. अर्थात महाराजांनी याचे उत्तर नंतर देतो याचा अर्थ नकार दिला असा नव्हता तर या लग्नाचा ज्यांच्याशी सबंध येतो त्या युवराजांशी आणि थोरली सून येसूबाईशी विचार विनिमय करुनच निर्णय

कळवतो असा होता. आणि त्यानुसार महाराजांनी प्रथम युवराज्ञी येसूबाई यांच्याशी चर्चा केली. येसूबाई युवराज्ञी तर होत्याच परंतु त्यांच्याकडे स्वराज्याची सर्वात मोठी जबाबदारी होती. त्यांच्याकडे स्वराज्याच्या प्रशासकीय प्रमुख पदाची जबाबदारी होती आणि त्या कुलमुखतीयार होत्या. त्याकाळात छत्रपती शिवाजी महाराजांचे धोरण किती दूरदर्शी होते. महिलांना प्रशासनात किती मान सन्मान देणारे होते हे यावरुन लक्षात येते.[१७]

राज्याभिषेकानंतर बाराव्या दिवशी मॉ साहेबांचे निधन झाले होते. स्वराज्याचा मुलकी, प्रशासकीय राज्य कारभार मॉ साहेब पाहत होत्या. स्वराज्याचे कामाचे थेट दोन विभाग बनविले गेले होते. पुरुषांनी लढाया आणि मोहिमांचे नेतृत्व करायचे तर महिलांनी त्यांच्या खांदाला खांदा लावत यांच्या गैरहजेरीत स्वराज्याचे प्रशासन आणि न्यायालयीन मूलकी कामकाज पहावयाचे राजमाता जिजाऊ असेपर्यंत ही सर्व जबाबदारी त्यांच्याकडे होती. मॉ साहेबांची जागा भरुन काढतांना महाराजांना त्याजागी आपली एखादी पत्नी बसविता आली असती परंतु महाराजांनी मॉ साहेबांच्या तालमीत तयार झालेल्या ताज्या दमाच्या आणि तरुण अशा येसूबाईंच्या हाती कुलमुखतीयार पदाची जबाबदारी सोपवून राज्याचा विस्तार करतांना आणि राज्यकारभार करतांना तरुण नेतृत्वावर विश्वास टाकला. येसूबाईबाबतचा हा निर्णय किती सार्थ होता हे इतिहासाला ज्ञात आहेच. त्यावेळी येसूबाईंचे वय होते फक्त सतरा वर्षे या देशात एवढ्या कमी वयाच्या परंतु गुणवत्ता असणाऱ्या महिलेला कुलमुखतियार बनविणारे छत्रपती शिवाजी महाराज खरोखरच प्रशासनात महिलांना कसे सामावून घेतले गेले पाहिजे याचा आदर्श घालून देणारे पहिले जाणते, दूरदर्शी राजे होते. संभाजी राजांच्या दुसऱ्या विवाहाचा थेट सबंध लागत होता येसूबाईंशी आणि म्हणून महाराजांनी कोणताही निर्णय देण्या अगोदर येसूबाईकडे हा विषय काढला. येसूबाईंना हे माहित होते की, छत्रपती शिवाजी महाराजांचे झालेले आठ विवाह हे एक मनोरंजन नसून एक राजकीय बांधणीचा हेतू त्यामागे होता. मग तेवढ्या सगळ्या मात्तबर घराण्याचा पाठिंबा स्वराज्याला मिळावे आणि स्वराज्य विस्तारासाठी घेतलेले ते निर्णय होते. मॉ जिजाऊ साहेबांनी याबाबत पुढाकार घेतला होता. मॉ जिजाऊ साहेबांनी यासाठी स्वतः शहाजी राजांची अडचण लक्षात घेऊन दुसऱ्या विवाहाची योजना राबवून तुकाबाई

मोहिते यांना सवत म्हणून नाही तर धाकटी बहीण म्हणून स्वीकारले. सातत्याने दूर कर्नाटक प्रदेशात राहणाऱ्या शहाजी राजांना एक हक्काचे माणूस व जीवन साथी मिळवून दिला. राजकीय, प्रशासकीय आणि भौगोलिक गोष्टींचा विचार करता कधी-कधी असे निर्णय घ्यावे लागतात. महाराजांनी युवराजांच्या दुसऱ्या विवाहाचा प्रस्ताव जाधवरावांकडून आल्याचे येसूबाईंना सांगत असतांना मॉ जिजाऊ साहेबांचीच आठवण झाली असेल हे स्पष्ट होते.म्हणून एकापेक्षा अधिक विवाह म्हणजे मनोरंजन नसून त्याकाळात मात्तबर असणाऱ्या राजघराण्यांचा पाठिंबा घेण्याचा तो एक राजनैतिक विचार होता.आणि तो विचार त्यांनी राजमाता जिजाऊ कडून घेतलेला होता. हे येथे स्पष्ट होते.[१८]

प्रगतशील लोकशाहीत लोकांना आता कुठे विवाहपूर्व समुपदेशनाची गरज वाटते. परंतु सतराव्या शतकात महाराजांनी हा विचार राबविला. संभाजी महाराजांना आणखी बरीच लग्ने करण्यासाठी त्या काळातील चालीरिती प्रमाणे मान्यता होती. परंतु तरीही त्यांनी अनावश्यक असे बहुपत्नित्व टाळले आणि येसूबाई आणि दुर्गाबाई अशा दोनच पत्नीच्या सोबतीने संसार करुन आजोबा शहाजी राजांच्या पावलावर पाऊल ठेवले. संभाजी महाराजांचे दुसरे लग्न आवश्यक होते काय? असा प्रश्न आपणास पडला तर त्याचे उत्तर अवघड नाही. एक म्हणजे दुर्गाबाई मॉ साहेबांच्याच रुपाने जाधव घराण्यातून भोसल्यांचा वंश वाढविण्यासाठी आल्या होत्या आणि स्वराज्याच्या संपुर्ण योगदान बलिदानाचा लेखा जोखा केला तर याचा आणखी उलगडा होतो. लखोजी राजे जाधवांच्या पाठिंब्यामुळे शहाजी राजांना ताकद मिळाली आणि लखोजी राजे आणि त्यांच्या मुलांच्या हत्येनंतर सर्व जाधव घराणे मॉ साहेबांच्या पाठीशी उभे राहण्यासाठी एवढ्या मोठ्या जहांगिरीकडे दुर्लक्ष करुन राहण्यासाठी पुण्याला आले. मॉ साहेबांचा त्याग सर्वांना माहित आहेच. मॉसाहेब नसत्या तर शिवाजी महाराज घडले नसते हे वास्तव आहे. जाधव घराण्याच्या पुढच्या पिढीतील लेकी सुनांचा त्यागही तसाच मोठा आहे. राणू अक्का जाधव घराण्याची सुन तर दुर्गाबाई जाधव कन्या या दोघीनीही स्वराज्यासाठी सर्वात जास्त कष्ट घेतले. संपूर्ण आयुष्य या दोघी नणंद भावजयांनी मोगलांच्या कैदेत काढले. परंतु स्वराज्य विचार जिवंत ठेवला. शाहू महाराजांच्या रुपाने

स्वराज्याचा वारसा जिवंत ठेवून हे स्वराज्य कायम केले. स्वराज्य संपविण्याचा विचार करणारे मोगल संपले. परंतु स्वराज्यासाठी जगणारे, मरणारे मावळे तयार करण्यात जाधव घराण्याने कधीच कसर ठेवली नाही. अगदी एकट्या धनाजीराव जाधवांचे उदाहरण पुरेसे आहे. छत्रपतींच्या भोसले घराण्याबरोबर जाधवरावांचे आजही सबंध आहेत आणि जेंव्हा जेंव्हा जाधव, भोसले पवार (निबांळकर) असे तीन राज परिवार महाराष्ट्रात सोयरीकीमुळे किंवा एखाद्या नविन विचाराने एकत्र येतात तेंव्हा तेंव्हा इतिहास घडलेला आहे आणि त्यात महिलांचा सिंहाचा वाटा राहिलेला आहे. छत्रपती शिवाजी महाराज तत्कालीन कालखंडात महिलांचा सन्मान तसेच राज्यकारभारत महिलांना जबाबदारीची पदे देऊन स्त्री -पुरुष समानतेचा संदेश तत्कालीन समाजाला दिला. आज आपण २१ व्या शतकात या गोष्टीचा प्रचार आणि प्रसार करतो. परंतू हि गोष्ट शिवरायांनी सतराव्या शतकाच केलेली दिसून येते.यातून त्यांचा व्यापक आणि दूरदृष्टीची जाणिव आपल्याला होते.[१९]

## संदर्भ ग्रंथ


| | | | |
|---|---|---|---|
| १. | त्र्यंबक शंकर शेजवलकर | - | श्री शिवछत्रपती संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना आराखडा व साधने- १९६४ मराठा मंदिर प्रकाशन डॉ. नायर रोड मुंबई-८, पृष्ठ क्र. १४९ |
| २. | गजानन मेंहेंदळे | - | श्री राजा शिवछत्रपती खंड-१, श्री साई एन्टरप्रायजेस, पुणे २००२, भाग-२, पृ.क्र.७३९ |
| ३. | पूर्वोक्त | - | पृष्ठ क्रं.७४२ |
| ४. | सेतु माधवराव पगडी | - | छत्रपती शिवाजी नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया नवी दिल्ली, पहिली आवृत्ती १९८९, पृ.क्र. ४७ |
| ५. | पूर्वोक्त | - | पृष्ठ क्रं.८८ |
| ६. | अ.रा.कुलकर्णी | - | अशी होती शिवशाही राजहंस प्रकाशन पुणे, आवृत्ती पाचवी, सप्टेंबर २०१२,पृ.क्र.९९ |
| ७. | पूर्वोक्त | - | पृष्ठ क्रं.१०१ |
| ८. | पूर्वोक्त | - | पृष्ठ क्रं.१०४ |
| ९. | कै.न्यायमूर्ती महादेव रानडे अनु. नरहर रघूनाथ फाटक | - | Rise of the Maratha Power, मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष साहित्य आणि संस्कृती मंडळ महाराष्ट्र राज्य पृ.क्र. १६ |
| १०. | संपादक अ.रा.कुलकर्णी, ग.ह.खरे | - | मराठ्यांचा इतिहास खंड-१,कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे, प्रथमावृत्ती १९८४, पृ.क्र.३९१ |
| ११. | सेतू माधवराव पगडी | - | छत्रपती शिवाजी नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया नवी दिल्ली पहिली आवृत्ती १९८९ पृ.क्र.७७ |

| | | | |
|---|---|---|---|
| १२. | प्रा.अशोक राणा | - | छत्रपती शिवराय पंचफुला प्रकाशन औरंगाबाद प्रथमावृत्ती १९ फेब्रुवारी २०१३ पृ.क्र.१०३ |
| १३. | कै.न्यायमूर्ती महादेव रानडे अनु. नरहर रघूनाथ फाटक | - | Rise of the Maratha Power, मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष साहित्य आणि संस्कृती मंडळ महाराष्ट्र राज्य पृ.क्र. ५८ |
| १४. | पूर्वोक्त | - | पृष्ठ क्रं.८८ |
| १५. | श्रीमंत शिवाजी कोकाटे | - | विश्ववंद्य छत्रपती शिवाजी महाराज (शिवचरित्र) जिजाई प्रकाशन पुणे, प्रथमावृत्ती १९ फेब्रुवारी २००१, पृ.क्र. ४६ |
| १६. | पूर्वोक्त | - | पृष्ठ क्रं.४८ |
| १७. | पुरुषोत्तम खेडेकर | - | लोकराजे शिवराय जिजाई प्रकाशन पुणे प्रथमावृत्ती २०१० पुनर्मुद्रण २०१२, पृ.क्र.५६ |
| १८. | पूर्वोक्त | - | पृष्ठ क्रं.५८ |
| १९. | पूर्वोक्त | - | पृष्ठ क्रं.६० |

# प्रकरण - सातवे

## उपसंहार

प्रस्तुत प्रबंधात छत्रपती शिवाजी महाराजांच्या अंगी असणाऱ्या विविध गुणांचा अभ्यास करीत असतानाच आधुनिक काळाला अनुसरुन असणारा एक महत्त्वाचा आधुनिक काळाला अनुसरुन असणारा एक महत्त्वाचा गुण म्हणजे वैज्ञानिक दृष्टिकोन होय. छत्रपती शिवरायांचा काळ हा मध्ययुगीन कालखंड होय. परंतु मध्ययुगीन काळात वावरत असतांना छत्रपती शिवरायांनी आपल्या अंगी वैज्ञानिक दृष्टिकोन जोपासला होता. हे अनेक प्रसंगावरुन लक्ष्यात येते. मध्ययुगीन कालखंड हा अतिशय धामधुमीचा काळ होता. या काळात माणसापेक्षा सत्तेला महत्त्व होते. माणसाचे मूल्य शून्य झाले होते. शिवरायांनी मात्र मानवी मूल्यांची जोपासना केली. स्वराज्याचा महत्त्वाचा घटक म्हणजे माणूस आहे हा विचार त्यांनी आपल्या मनात रुजविला. हा विचार रुजविण्यासाठी अंगी वैज्ञानिक दृष्टिकोन असावा लागतो हा गुण शिवरायांमध्ये ओतप्रोत भरलेला होता.

मध्ययुगीन काळात किल्ल्याचे अन्ययसाधारण महत्त्व होते. ज्याचे किल्ले त्याचे राज्य अशी व्यवस्था होती. म्हणून छत्रपती शिवरायांनी किल्ले वाढविण्यावर भर दिला. किल्ले निर्माण करुन छत्रपती शिवराय थांबले नाहीत. तर किल्ल्याची नीट व्यवस्था लावण्याचे कार्यही शिवरायांनी केले होते. आपल्या कारकिर्दीत शिवरायांनी स्वराज्य सदृढ करण्यासाठी किल्ले निर्माण केले. किल्ल्यामध्ये पाण्याची व्यवस्था केली त्यातून तत्कालीन समाजाला जलसंधारणाचे महत्त्व कळाले. तसेच किल्ल्या अंतर्गत वेगवेगळया सुविधा प्रत्येक किल्ल्यात निर्माण केल्या.

छत्रपती शिवरायांनी आपल्या कार्यकाळात १११ किल्ले बांधले तर अनेक किल्ले जिंकले. तसे शिवरायांच्या ताब्यात असलेल्या किल्ल्यांची संख्या वेगवेगळी सांगितलेली आहे. सभासद बखरी मध्ये २४० तर चिटणीस बखरीमध्ये ३१७ तर शिवदिग्विजयामध्ये ३६१ दिलेली आहे.

यावरुन छत्रपती शिवराय किल्ल्यांना किती महत्त्व देत होते. हे आपल्याला दिसून येते. अनेक किल्ले जिंकून शिवरायांनी अर्धवट असणाऱ्या किल्ल्यांचे बांधकाम पूर्ण केले. त्या किल्ल्याचे बांधकाम करीत असतांना स्थापत्यशास्त्राचा उपयोग शिवरायानी केला. किल्ला बांधणीसाठी जागेपासून किल्ल्यांचे बांधकाम होईपर्यंत सगळ्या गोष्टीवर शिवरायांनी लक्ष दिले. १९८० मध्ये पोर्तुगालच्या राजधानीत आंतरराष्ट्रीय दर्जाचे दुर्ग प्रदर्शन भरले होते. जगातील सर्व वेगवेगळ्या श्रेणीतील किल्ले या प्रदर्शनात प्रतिकृतीसह आले होते. या सर्व किल्ल्यात प्रथम क्रमांकावर ज्या किल्ल्याचे नाव होते. तो किल्ला होता. दुर्गराज राजगड जो राजगड शिवरायांनी सुरुवातीच्या २० वर्षासाठी राजधानी म्हणून निवड केली होती. यातून त्याचा स्थापत्य शास्त्रातील ज्ञान आणि विज्ञान दिसून येते.

छत्रपती शिवरायांनी हे ओळखले होते की, जमिनीवरील शत्रूबरोबरच पाण्यावर असणाऱ्या शत्रूचा सुध्दा बंदोबस्त केला पाहिजे म्हणून महाराजांनी सिंधुदुर्ग किल्ला बांधण्यास घेतला. समुद्रात किल्ले बांधणे सोपे नव्हते. परंतु शिवरायांकडे भूगोलाचे आणि विज्ञानाचे ज्ञान असल्यामुळे त्यांना हे शक्य झाले. एकंदरीतच या किल्ल्याच्या बांधकामात मजबूती यावे म्हणून पाच खंडी शिसे ओतले होते. यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन आपल्याला दिसतो. यातून छत्रपती शिवराय किती जागरुक होते हे आपल्याला दिसते. हाच अनुभव रायगड किल्ल्याची बांधणी करतांना सुध्दा दिसून येते. ज्या किल्ल्याला युरोपचे लोक पूर्वेकडचा ' जिब्राल्टर ' असे म्हणतात अशा किल्ल्याची बांधणी करतांना शिवरायांनी घेतलेली दक्षता दिसून येते. एकंदरीत शिवराय आपल्या स्थापत्य शास्त्रात किती निपुण होते हे दिसून येते.

महाराष्ट्राला ७२० किलोमीटचा समुद्र किनारा लाभलेला आहे. त्यामुळे आपण जरी जमिनीवर शत्रूचा पायबंद केलेला असला तरी पाण्यातून शत्रू आपल्यावर आक्रमण करु शकतो म्हणून शिवरायांनी १७ व्या शतकात सिद्दी, पोर्तुगीज या शत्रुंना पायबंद घालण्यासाठी आरमाराची बांधणी केली. ही बांधणी करतांना कोणताही जातीभेद शिवरायांनी पाळला नाही. अशा प्रकारे

व्यक्ती तेंव्हाच वागू शकतो जेंव्हा त्याच्या अंगी वैज्ञानिक दृष्टिकोन असतो. म्हणून मायनाक भंडारी बरोबर दौलतखानाची नियुक्ती केली. हा विचार शिवरायांनी १७ व्या शतकात केलेला होता. आज आपण २१ व्या शतकात वावरत आहोत परंतू शिवरायांकडे एवढी दूरदृष्टी होती की, त्यांनी हा धोका ओळखला होता. त्याची प्रचिती आपल्याला नोव्हेंबर २००८ मध्ये पाकिस्तानातून आलेल्या १० अतिरेक्यांनी मुंबईवर आक्रमण करुन २०० पेक्षा जास्त निरापराध लोकांचा बळी घेतला होता. यावरुन शिवरायांची दूरदृष्टी आणि वैज्ञानिक विचार दिसून येतो. कारण मध्ययुगात समुद्रावर प्रवास करणे निषिध्द समजले जात होते. परंतू शिवराय अशा खुळचट गोष्टींना बळी न पडता अंधश्रध्देचा त्याग करुन वैज्ञानिक विचारांचा स्विकार केला. हे आपल्याला प्रस्तुत प्रबंधातून दिसून येते.

एकूणच स्थापत्य शास्त्रातील त्यांचे ज्ञान आजच्या अभियंत्यांना लाजवेल असे होते म्हणूनच त्यांना उत्कृष्ट अभियंते म्हटले जाते. त्याचबरोबरच आधुनिक भारताच्या आरमाराचे जनक म्हणून त्यांच्याकडे पाहिल्या जाते.

छत्रपती शिवराय एक उत्तम योध्दे होते. प्राचीन आणि मध्ययुगीन काळात कोणत्याही बादशहाने, कोणत्याही राजाने आपले राज्य विस्तार करणे अपेक्षित होते. राज्याचा वाढ आणि विस्तार करायचे म्हणजे शत्रू निर्माण होणे साहिजिक होते. आणि शत्रू निर्माण झाला तर त्यांच्याशी दोन हात करणे क्रमप्राप्त होते. मग अशी संघर्ष करण्याची परिस्थिती निर्माण होणे म्हणजे युध्द करणे आवश्यक होते. त्यानुसार छत्रपती शिवरायांनी अनेक युध्दे केलेले आहेत. परंतू युध्द करीत असतांना ते युध्द परंपरागत पध्दतीने लढल्या जात नाही ना? याचाही विचार शिवरायांनी केला म्हणून त्यांनी आपल्या युध्द पध्दतीत आमूलाग्र बदल केलेला आहे. त्यात तलवारीच्या लांबीचा विषय असो की, सैन्य रचनेतील बदल असेल याचा शिवरायांनी अभ्यास केलेला होता. हे या प्रबंधातून मांडण्यात आलेला आहे. म्हणूनच संसाधने कमी असतांना सुध्दा अनेक युध्दात शिवरायांचा विजय झालेला दिसतो.

शिवरायांकडे असलेली तलवार म्हणजे ' भवानी तलवार ' ज्या तलवारीची चर्चा खूप मोठ्या प्रमाणात झाली. जनमानसात या तलवारी बद्दल चर्चा आहे. परंतु ही तलवार शिवरायांना भवानी मातेने दिलेली नसून ती तलवार शिवरायांनी पोर्तुगालच्या एका व्यापाऱ्याकडून विशिष्ट रक्कम देऊन विकत घेतली हे सिद्द होते. या विषयी शिवाजी कोण होता ? या पुस्तकाचे लेखक गोविंद पानसरे यांनी ही तलवार शिवरायांना भवानी मातेने दिलेले नसून ती तलवार पोर्तुगाल कडून सावंताकडे आणि सावंताकडून शिवरायाकडे ही तलवार आली असून ही तलवार सध्या साताऱ्याच्या म्युझियम मध्ये असल्याचे म्हटलेले आहे.

शिवराय धर्म मानणारे होते ईश्वर मानणारे होते. परंतू याचा अर्थ ते अंधश्रध्दाळू होते असे नाही. त्यांनी अनेक ठिकाणी अंधश्रध्दा आणि खुळचट गोष्टीचा त्याग केलेला दिसून येतो.

आज आपण २१ व्या शतकात संदेशवहनात खूप प्रगती केलेली आहे. परंतू १७ व्या शतकात छत्रपती शिवरायांनी संदेशवहनाचा उपयोग केलेला होता. ही गोष्टच आश्चर्य चकित करणारी आहे. कारण शिवरायांकडे वैज्ञानिक दृष्टिकोन होता. त्यामुळे त्यांनी हे सर्व करु शकले. किल्ले जिंकल्यानंतर त्याची बातमी देण्यासाठी संदेश देणे आवश्यक होते. तेंव्हा मात्र शिवरायांनी एक पध्दत विकसित केली. ती पध्दत होती धूराचा उपयोग करणे आनंदाची बातमी असेल तर पांढरा धूर आणि दुःखाची बातमी असेल तर काळा धूर लावला जात असे हा धूर एका किल्ल्यावरुन दुसऱ्या किल्ल्यावरील लोकांना कळत असे.यातून आज स्वराज्यात कुठेतरी वाईट घटना घडली हे समजल्या जात असे.

ध्वनी आणि प्रकाश हे विज्ञानाचे दोन आयाम आहेत. या दोन गोष्टी शिवाय आपण विज्ञानांचा विचार करु शकत नाही. शिवरायांनी या दोन गोष्टीचा उपयोग करुन आपल्यातील विज्ञानाची प्रचिती दिली. आपल्या कारकिर्दीत अनेक युध्द शिवराय लढले. या युध्दात त्यांनी ध्वनी आणि प्रकाशाचा उपयोग केलेला दिसून येतो.

१. पन्हाळगड ते विशाळगड प्रवास करतांना शिवरायांनी ध्वनीचा उपयोग केला.

२. शाहिस्तेखानावर हल्ला करतांना ध्वनी आणि प्रकाशाचा उपयोग करण्यात आला.

३. आगऱ्यातून सुटका करुन घेतांना प्रकाशाचा उपयोग शिवरायांनी केलेला आहे.या ठिकाणी आग्रा शहरातील एका कुंभारा मार्फत भट्टी लावली होती.ज्या भट्टीतून निघालेला धूर आणि प्रकाशाचा उपयोग करुन शिवराय आग्र्यातून बाहेर पडले.

छत्रपती शिवरायांच्या युध्द तंत्राचा जगाने देखील दखल घेतली होती. शिवरायांनी वापरलेल्या गनिमी कावाचा उपयोग व्हिएतनाम या राष्ट्राने केलेला होता. व्हिएतनाम या राष्ट्राने या गनिमी कावा युध्द तंत्राचा उपयोग करुन अमेरिका सारख्या बलाढ्य राष्ट्राला देखील नमविले होते हे शिवरायांच्या युध्दतंत्राचे यश आहे.

छत्रपती शिवराय स्वराज्याची उभारणी करीत असतांना रयतेच्या कल्याणाकडे लक्ष दिले. त्यासाठी त्यांचा आर्थिक, सामाजिक, धार्मिक बाबीचा विकास करण्यावर भर दिला. सर्वप्रथम त्यांनी रयतेच्या आर्थिक विकासाकडे लक्ष दिले. त्यासाठी रयतेच्या हाताला काम मिळवून दिले. हे काम देतांना त्या व्यक्तीच्या जाती आणि धर्मापेक्षा त्या व्यक्तीच्या अंगी असणाऱ्या गुणवत्तेकडे लक्ष दिले.असा विचार व्यक्ती तेंव्हाच करु शकतो जेंव्हा त्या व्यक्तीच्या अंगी वैज्ञानिक दृष्टिकोन असेल. शिवाजी महाराजांपूर्वी अशी परिस्थिती होती की, व्यक्तीला जात आणि धर्म पाहून काम दिले जात. परंतू शिवरायांनी तसा विचार न करता विज्ञानवादी विचार केलेला आहे.

शिवरायांच्या जन्माच्या एक वर्ष आगोदर १६२९ मध्ये खूप मोठा दुष्काळ पडला होता. त्या दुष्काळाची नोंदी अनेक इतिहास ग्रंथामध्ये घेण्यात आली. परंतू शिवरायांचा जन्म १६३० ला झाला. आणि पुढील १५-२० वर्षात शिवरायांना रयतेला दुष्काळ मुक्त केले. यातून त्यांचा आर्थिक नियोजनाचा विचार दिसून येतो. रयतेला आपापल्या कुवतीप्रमाणे काम देऊन आर्थिक स्वातंत्र्य दिले. हे मध्ययुगीन काळातील एक महत्त्वाची गोष्ट समजली जाते.

तथाकथित हिंदू धर्मानुसार समुद्रावर प्रवास करणे निषिध्द समजल्या जात होते. परंतू शिवरायांनी या अंधश्रध्देला बळी न पडता समुद्रावर व्यापर उद्योगाची निर्मिती करुन त्या भागातील शेतकऱ्यांना शेतीला जोड व्यवसाय निर्माण करुन दिले. विशेष करुन मिठागरेची निर्मिती करुन दिली. यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

छत्रपती शिवराय नुसते योध्दे नव्हते तर ते एक उत्तम प्रशासक होते. उत्तम जाणकार होते. म्हणून त्यांना जाणता राजा म्हटले जाते. त्यांना आपल्या समाजात वावरणाऱ्या व्यक्तीचे सामाजिक स्थान शिवरायांना माहित होते. म्हणून त्यांचा सामाजिक विकास झाला पाहिजे यावर त्यांचा जोर होता. कारण हा समाजच शिवरायांचा, स्वराज्याचा आधारस्तंभ होता. म्हणून अशा समाजाच्या गरजा आणि विकास यावर त्यांनी भर दिला होता. यातून शिवरायांनी सामाजिक विकासाकडे लक्ष दिले होते. त्यासाठी समाजात असणाऱ्या अनिष्ट रुढी, वाईट परंपरा संपविण्यासाठी प्रयत्न केलेला दिसून येतो. स्वतः अंधश्रध्दा न मानणे आणि समाजात कुणी अंधश्रध्दा आणि अनिष्ठ रुढी पाळत असतील तर त्या बंद करणे हे शिवरायांचे सामाजिक क्षेत्रातील वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

प्राचीन आणि मध्ययुगीन काळखंडात आपल्या हिन्दू धर्मात सतीप्रथा प्रचलित होती. सती जाणे हे स्त्रीसाठी भूषणावह समजल्या जात होते. एखादी स्त्री सती जाण्यास नकार दिल्यास तिच्या पती प्रेमाविषयी शंका घेतली जात होती. म्हणून ही प्रथा सर्रासपणे चालू होती. ही प्रथा म्हणजे मानवतेला कलंक आहे. हे शिवरायांनी ओळखले होते. म्हणून त्यांनी सती प्रथेवर बंदी आणली. याची सुरुवात त्यांनी आपल्या घरापासून केली इ.स.१६६४ मध्ये शहाजी राजे भोसले यांचे निधन झाले. तेंव्हा राजमात जिजाऊ त्या वेळच्या प्रथेनुसार सती जाण्यास निघाल्या होत्या परंतू छत्रपती शिवरायांनी त्यांना थांबवून सती प्रथा बंदीचा क्रांतिकारक निर्णय घेतला यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

शिवरायांनी अंधश्रध्देचा त्याग करण्यास स्वतःपासून सुरुवात केली. "आधि केले मग सांगितले " या उक्ती प्रमाणे शिवराय वागले. छत्रपती राजाराम महाराजांच्या जन्माचा प्रसंग आहे. यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन आपल्याला दिसतो. मूल पालथे जन्मणे हे अशूभ आहे अशी

अंधश्रध्दा आहे. राजाराम महाराज जन्मताना पालथे जन्मले. सर्वजण ते पाहून गप्प बसले. पुत्रजन्माचा आनंद कुणी दाखविना. महाराजांना हे समजले. ते म्हणाले, "पुत्र पालथा जन्मला तो दिल्लीची पातशाही पालथी घालील." मग सगळे आनंद व्यक्त करु लागले.

यावरुन असे लक्षात येते की, छत्रपती शिवराय मध्ययुगात वावरत असून सुध्दा आधुनिक काळाचा विचार करीत होते. आपल्या विचार सरणीचा परिणाम मानसिक स्थिती वर होते. आणि मानसिक स्थितीचा परिणाम शारिरीक स्थितीवर होतो म्हणून संत तुकाराम महाराजांनी म्हटल्याप्रमाणे ' मन करा रे प्रसन्न सर्व सिध्दीचे कारण ' अशा प्रकारे शिवरायांनी अंधश्रध्देचा त्याग करुन वैज्ञानिक दृष्टिकोन जोपासले.या ठिकाणी संत तुकाराम महाराजांचा अंधश्रध्देवर असूड ओढणारा एक अभंग आठवतो. *नवसे कन्या पुत्र होती । तरी का करने लागे पती ।।* यावरुन शिवराय खऱ्या अर्थाने संत तुकाराम महाराजांचे शिष्य होते हे दिसते.

वैदिक धर्मानुसार जे चार वर्ण या ठिकाणी निर्माण करण्यात आलेले होते. त्या-त्या वर्णानी ती-ती कामे करावीत ब्राम्हणांनी ब्राम्हणांची कामे करावीत. क्षत्रियांनी क्षत्रियांची कामे करावीत. वैश्यांनी वैश्याची कामे करावीत आणि शुद्रांनी शुद्राची कामे करावीत आणि अस्पृश्यांनी त्यांच्या अस्पृश्यतेनुसार वागावे असा विचार प्रवाह निर्माण झालेला होता. परंतू छत्रपती शिवरायांनी या खुळचट विचार सरणीचा त्याग केला आणि जातीनुसार काम या पेक्षा त्या व्यक्तींच्या गुणवत्तेनुसार काम देण्याचे महत्त्वपूर्ण कार्य छत्रपती शिवरायांनी केले. म्हणून सर्व समाज घटकांना आपल्या स्वराज्यात सामावून घेतले. हे कार्य करणे तेंव्हाच शक्य आहे जेंव्हा त्या व्यक्तीच्या अंगी वैज्ञानिक दृष्टिकोन असेल. म्हणूनच त्यांनी अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या जातीतील लोकांना त्यांच्यातील गुण ओळखून त्यांना किल्लेदार बनविले. यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

छत्रपती शिवराय हे साहिष्णू वृत्तीचे होते. माझा धर्म श्रेष्ठ आहे. तसा इतरांचा धर्म सुध्दा श्रेष्ठ आहे. अशी भावना सहिष्णूवृत्ती मध्ये असते. शिवराय हिंदू धर्म मानणारे होते. ही त्यांची धर्मश्रध्दा होती. परंतू अंधश्रध्दा नव्हती. त्यांनी जरी हिंदू धर्म मानला असला तरी इतर धर्माचा अवमान आणि अपमान त्यांनी केलेला नाही. ही कृती तीच व्यक्ती करु शकते ज्या व्यक्तीकडे

वैज्ञानिक दृष्टिकोन आहे. औरंगजेबच्या दरबारात असणाऱ्या प्रसिध्द इतिहासकार खाफीखान याने शिवरायांच्या धार्मिक धोरणाचे कौतुक केले आहे. शत्रुपक्षातील इतिहासकाराने याची नोंद घ्यावी यातून शिवरायांचे मोठेपण आपल्याला दिसून येते.

हिंदू धर्मशास्त्रानुसार एखादा व्यक्ती आपला धर्म सोडला म्हणजे तो मेला. मग मेलेला जिवंत कसा होणार. आणि या जन्मात पाप केल्याने पुढच्या जन्मात तर माणूससुध्दा होणार नाही किडा किंवा मुंगी होणार अशी अंधश्रध्दा होती. परंतू छत्रपती शिवरायांनी मुसलमान झालेल्या व्यक्तींना आपल्या लोकांना  पुन्हा हिंदू करुन घेतले . बजाजी निंबाळकर व नेताजी पालकर हे मुसलमान सुंता झालेले व मुसलमानात काही वर्ष राहिलेल्या मराठा सरदारांना छत्रपती शिवारायांनी परत हिंदू करवून घेतले. बजाजी निंबाळकरांच्या मुलास शिवरायांनी स्वतःची मुलगी दिली. अफगाणिस्तानात महंमद कुलीखान म्हणून आठ वर्ष राहिलेल्या नेताजी पालकरास शुध्द करुन स्वतःच्या पंक्तीस बसवून घेतले यातून छत्रपती शिवाजी महाराजांचा धार्मिक क्षेत्रातील वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो. हा त्यांचा दृष्टिकोन प्रस्तुत प्रबंधात मांडण्यात आलेला आहे.

छत्रपती शिवरायांनी धर्मांध असणाऱ्या बादशाह औरंगजेबाला पत्र लिहून आपले धार्मिक विचार स्पष्ट केले. हे विचार व्यक्त करतांना आपले पणजोबा सम्राट अकबराचा गौरवपूर्ण उल्लेख करुन बादशाहा औरंगजेबाला आपल्या पूर्वजांच्या धार्मिक धोरणाची आठवण करुन दिली. बादशहा औरंगजेबाचे धार्मिक धोरण कसे चुकीचे आहे. हे सुध्दा त्यांनी त्यात सांगितले. एवढेच नाही शिवरायांनी बादशाहा औरंगजेबास म्हणाले की,ईश्वर हा फक्त एका धर्माचा नसून तो सर्वांचा आहे. छत्रपती शिवराय म्हणतात की कुराणामध्ये ईश्वराचे वर्णन ' रब - उल - आलमिन ' आहे. ' रब - उल- मुसलमान ' नाही असे सांगितले. यावरून छत्रपती शिवाजी महाराजांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

छत्रपती शिवरायांना मानसशास्त्राचे उत्तम ज्ञान होते. आपल्या स्वराज्याची उभारणी करीत असतांना त्यांनी विविध लढाया लढतांना मानसशास्त्राचा उपयोग केलेला आहे. आपल्या सैन्यात विश्वासाची भावना निर्माण करणे आणि शत्रू पक्षात धडकी निर्माण करण्याचे कार्य छत्रपती

शिवरायांनी केलेले होते. शत्रु पक्षाच्या सैन्यातील जमेच्या बाजू शोधणे ही मानसशास्त्रीय कला शिवरायांना अवगत होती. म्हणून त्यांनी आपली संसाधने कमी असतांना सुध्दा बलाढ्य शत्रूवर विजय मिळवू शकले. हे शिवरायांच्या अंगी असणाऱ्या मानसशास्त्रीय अभ्यासामुळे ते करु शकले.

अफझलखान विरोधात शिवरायांनी मिळविलेला विजय म्हणजे शिवरायांच्या मानसशास्त्रचा विजय होता. अफझलखान अतिशय बलाढ्य शत्रू होता.त्याचा मुकाबला करणे शक्य नव्हते. परंतू शिवरायांनी या ठिकाणी 'शक्ती पेक्षा युक्ती श्रेष्ठ ' या उक्ती प्रमाणे अफझलखानाशी दोन हात करत असतांना शिवरायांनी मानसशास्त्राचा पुरेपूर उपयोग केला. शिवरायांच्या या उक्तीमुळे अफझलखान भेटण्यास आतूर झाला आणि याचा फायदा शिवरायांनी करुन घेऊन अफझलखानाचा विषय समाप्त केला.

आपल्या स्वराज्याची निर्मिती करीत असतांना आलेल्या सर्व संकटाचा आपल्या मानसशास्त्रीय दृष्टिकोनातून मुकाबला शिवरायांनी केलेला होता. शिवराय मानसिक दृष्ट्या खूप सक्षम होते. म्हणून अनेक संकटाचा सामना ते करु शकले. त्यामध्ये पुरंदरचा तह असेल, आग्रा भेट आणि सुटका असेल. या सर्व संकटात शिवराय मनाने स्थिर राहिले. मनाचे सामर्थ शिवरायांनी ओळखले होते. असं म्हटल्या जाते की, कोणतेही युध्द हे आधी व्यक्तीच्या डोक्यात लढल्या जाते. मगच ते रणांगणात लढल्या जाते. त्यामुळे स्थिर मनाने या घटनेचा विचार विनिमय करावा लागतो.

छत्रपती शिवाजी महाराजांनी जेंव्हा राज्याभिषेक करण्याचा विचार व्यक्त केला. तेंव्हा शिवरायांना तथाकथित धर्मपंडीताकडून विरोध झाला. कारण असा एक विचार प्रवाह त्या ठिकाणी निर्माण झालेला होता की, परशुरामाने पृथ्वी २१ वेळा निःक्षत्रिय केलेली आहे. त्यामुळे या पृथ्वीवर क्षत्रिय शिल्लक राहिला नाही. त्यामुळे राजा फक्त क्षत्रियालाच होता येते. परंतू शिवरायांनी या अंधश्रध्दायुक्त विचार धारणेचा त्याग करुन या पृथ्वीवर अजून क्षत्रिय जिवंत आहेत. याची प्रचिती आणून देऊन स्वतःस राज्याभिषेक करवून घेतला. हे कार्य ती व्यक्ति तेंव्हाच करु शकते. जेंव्हा ती व्यक्ती मानसिक दृष्ट्या सक्षम आहे. जर शिवराय मानसिक दृष्ट्या सक्षम नाही राहिले असते तर ते

कधीच स्वत:स राज्याभिषेक करवून घेतले नसते त्यामुळे ते राजा झाले नसते. म्हणून स्वराज्य निर्माण करण्याचे प्रारंभ त्यांच्या मानसिक विजयात आहे.

शिवराय एक उत्तम समुपदेशक होते. ते एक उत्तम कुटुंब प्रमुख होते. कुटुंबात निर्माण झालेल्या वादविवादात त्यांनी महत्त्वाची भूमिका पार पाडली. आपल्या संवाद कौशल्याने त्यांनी अनेक प्रश्न सोडविले म्हणून छत्रपती शिवराय एक उत्तम समुपदेशक होते. छत्रपती शिवाजी महाराज राज्यकारभार करतांना प्रशासकीय कामकाज करतांना जसे अखंड सावधान होते. तसेच घरच्या आघाडीवरही कायम आपल्या जबाबदाऱ्या पार पाडतानाही कमालीचे सतर्क आणि नविन पिढीला विश्वासात घेऊन काम करणारे व्यक्तिमत्त्व होते. आपण छत्रपती आहोत म्हणून आपली मते घरच्यांवर लादण्याचा महाराजांनी कधी प्रयत्न केलेला नाही. कौटुंबिक निर्णय घेतांना ज्यांच्या संदर्भात निर्णय घ्यावयाचा आहे. त्यांच्याशी विचार विनीमय करुन निर्णय घेण्याची लोकशाही परंपरा त्यांनी घरापासूनच सुरु केली. छत्रपती संभाजी महाराजांच्या दुसऱ्या लग्नाचा विषय समोर आला तेंव्हा ही गोष्ट प्रकर्षाने जाणवते . आपले विचार आणि निर्णय यात तरुण पिढीला समाविष्ट करुन महाराज नव्या जुन्या विचारांची सांगड घालत व परिणामकारक निर्णय घेत असत. महाराजांचे हे निर्णय काळाच्या कसोटीवर सत्य उतरणारे आणि भविष्यासाठी कायम रहाणारे विचार आहेत.

एकंदरीत छत्रपती शिवाजी महाराजांचे जीवन चरित्र हे आदर्श असे जीवन होते. त्यांनी आपल्या कार्यकाळात ज्या काही गोष्टी करुन ठेवल्या आहेत. ते पुढच्या पिढीसाठी सुध्दा आदर्शवत आहेत. शिवराय नुसते योध्दे नव्हते. तर ते उत्तम प्रशासक, उत्तम व्यवस्थापक, उत्तम समुपदेशक आणि वैज्ञानिक दृष्टिकोन बाळगणारा राजा अशी त्यांची ख्याती होती. प्रस्तुत प्रबंधात त्यांच्या वैज्ञानिक दृष्टिकोन या गुणाची चिकित्सा करण्यात येऊन त्या वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या आधारे त्यांनी मध्ययुगीन काळात जी काही क्रांति घडवून आणली. त्याची चर्चा करण्यात आलेली आहे.

संसाधने कमी असतांना सुध्दा बलाढ्य अशा शत्रूशी सामना करतांना शिवरायांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग केलेला दिसून येते.

अशा प्रकारे छत्रपती शिवाजी महाराजांनी आपल्या अंगी असणाऱ्या वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या आधारे सर्व आघाड्यावर यश मिळविलेले दिसून येते. म्हणून प्रस्तूत प्रबंधात शिवरायांच्या वैज्ञानिक दृष्टिकोनाची उपयोगिता आणि चिकित्सा करण्यात आलेली आहे. शेवटी निष्कर्ष रुपाने मुद्दे खालील प्रमाणे मांडता येता.

१. तथाकथित हिंदूधर्मानूसार समुद्रावर प्रवास करणे निषिध्द होते. तेंव्हा शिवरायांनी या अंधश्रध्देचा त्याग करुन समुद्रावर विविध किल्ले निर्माण केले.

२. विविध किल्ल्यांचे बांधकाम करीत असतांना शिवरायांनी स्थापत्य शास्त्राचा उपयोग करुन त्यात वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उपयोग केलेला आहे.

   उदा. सिंधुदुर्ग किल्ल्यांचे बांधकाम करीत असतांना त्या किल्ल्याचे बांधकाम मजबूत व्हावे म्हणून पाच खंडी शिसे ओतले. यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

३. संदेश वहनासाठी शिवरायांनी वेगवेगळ्या धूरांचा उपयोग केला. जसे उदा. पांढरा धूर, काळा धूर

   स्वराज्याच्या जमेची बाजू असल्यास पांढरा धूर सोडला जाई. आणि काही दुःखाची गोष्टी असल्यास काळा धूर सोडला जाई.

४. तथाकथित हिंदूधर्मानुसार व्यक्ती धर्म सोडला की, ती व्यक्ती मरते अशी विचारसरणी होती. परंतू शिवराय या अंधश्रध्देला बळी पडले नाहीत. उलट या अंधश्रध्देचा त्याग करुन मुस्लिम धर्मात गेलेल्यांना पुन्हा हिंदू धर्मात घेतले.

   उदा. नेताजी पालकर, बजाजी निंबाळकर, यांना पुन्हा हिंदू धर्मात घेतले.

५. 'मुल पालथे जन्मणे' हे अशुभ मानले जाते राजाराम महाराज पालथे जन्माला आले. सर्वजण ते पाहून गप्प बसले. पुत्र जन्माचा आनंद कुणी दाखविना. महाराजांना हे समजले

ते म्हणाले, 'पुत्र पालथा जन्मला, तो दिल्लीची पातशाही पालथी घालेल' सगळे आनंद व्यक्त करु लागले.

६. शहाजी राजेंचा जेंव्हा मृत्यू झाला तेंव्हा राजामाता जिजाऊंना सती जाऊ दिले नाही.

७. स्वतःच्या आचरणाने अंधश्रध्दा, अनिष्ट रुढी परंपरा याचा त्याग केला.

८. समुद्र पर्यटन करणे निषिद समजल्या जाणाऱ्या काळात शिवरायांनी समुद्रावर व्यापार उद्योगाला सुरुवात केली.

९. शेतकऱ्यांना पर्यावरणाचे महत्त्व समजावून सांगितले. ' झाडे लावा- झाडे जगवा ' हा संदेश दिला.

१०. आजही समाजात बऱ्याच अंशी अमावस्येला अंधश्रध्दा समजून नविन कामे करीत नाहीत. परंतू शिवरायांनी आपली अनेक आक्रमणे आमावस्येच्या रात्री केली. यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

११. शिवरायांनी समुद्र प्रवासाला अंधश्रध्दा न मानता समुद्रावर विविध उद्योग धंदे उभारुन आर्थिक विकास घडवून आणला.

१२. विविध अंधश्रध्दा, वाईट रुढी परंपरा, याचा त्याग करुन सर्वांना समानतेची वागणूक दिली. यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

१३. शिवरायांच्या अवती-भोवती मुस्लिमांची राज्ये होती. परंतू शिवरायांनी राजकीय लढाईला धार्मिक लढाईचे स्वरुप येऊ दिले नाही. यातून त्यांचा वैज्ञानिक दृष्टिकोन दिसून येतो.

१४. शिवरायांनी मानसशास्त्राचा चांगला अभ्यास होता. म्हणून त्यांनी मानसशास्त्राद्वारे शत्रूच्या मनात धडकी तर आपल्या सैन्याच्या मनात विश्वास निर्माण केला.

१५. पाण्याच्या व्यवस्थापणाबाबत 'पाणी आडवा पाणी जिरवा' हे धोरण राबवून पाणी बचतीचा मौलिक संदेश रयतेला दिला.

# संदर्भ ग्रंथ सूची


**प्राथमिक साधने**

| | | |
|---|---|---|
| १. ईश्वरदास नागर | - | फुत्तुहाते आलमगिरी मोगल-मराठा संघर्ष मराठी अनुवाद-सेतू माधवराव पगडी |
| २. खाफीखान | - | तारीखे खाफीखान शिवचरित्र खंड -३ मध्ये ग.ह. खरे नी मराठी अनुवाद केले आहे. तर सेतु माधवराव पगडीनी 'मराठ्यांचे स्वातंत्र्य युध्द' या नावाने अनुवाद |
| ३. तारीखे दिल्कुशा | - | भीमसेन सक्सेना १९६३ साली सेतु माधवराव पगडी यांनी 'मोगल आणि मराठे ' या नावाने मराठीत भाषांतर |
| ४. कृष्णाजी अनंत सबासद | - | सभासद बखर |
| ५. स.म. दिवेकर (संपा) | - | कविंद्रपरमानंदकृत श्री. शिवभारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, पुरस्कृत ग्रंथमाला क्रमांक तीन शके १८४९ (सन १९२७) |
| ६. वि.का.राजवाडे | - | राधामाधव विलास चंपू (जयराम पिंडयेकृत) चित्रशाळा छापखाना पुणे शके १८४४ (सन १९२२) |
| ७. धुंडिराज लक्ष्मण व्यास | - | राज्य व्यवहार कोश |

**दुय्यम साधने -**

| | | | |
|---|---|---|---|
| १. | संपादक डॉ.रामचंद्र चिंतामणी ढेरे- | | श्री.शिवदिग्विजय अनमोल प्रकाश पुणे (१९७५) |
| २. | आपटे आणि दिवेकर (संपादन) | - | शिवचरित्र भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे १९२५ |
| ३. | आवळसकर (संपादन) | - | ऐतिहासिक साधने महाराष्ट्र शासन १९६३ |
| ४. | आवळसकर (संपादन) | - | रायगडाची जीवनकथा महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ मुंबई १९६२ |

| | | | |
|---|---|---|---|
| ५. | शरद जोशी, अनिल गोटे, राजीव वसर्गेकर | - | शेतकऱ्यांचा राजा शिवाजी शेतकरी प्रकाशन अलिबाग(१९८८) |
| ६. | आनंद घोरपडे | - | शिवछत्रपती समज-अपसमज सुगावा प्रकाशन पुणे (२००३) |
| ७. | डॉ. प्रल्हाद नरहर जोशी | - | सार्थ तुकाराम गाथा श्री भारत बुक डेपो ग्रंथ प्रकाशन मुंबई (१९६६) |
| ८. | विजयराव देशमुख | - | शककर्ते शिवराय खंड-२ छत्रपती सेवा प्रतिष्ठान नागपूर-२ |
| ९. | वासुदेव कृष्णा भावे (१९५५) | - | युग प्रवर्तक शिवाजी महाराज |
| १०. | बाबासाहेब पुरंदरे | - | राजा शिवछत्रपती पुरंदरे प्रकाशन पुणे, पंधरावी आवृत्ती |
| ११. | कृष्णाजी अनंत सभासद (संपादक रघुनाथ हेरवाडकर) | - | शिवछत्रपतींचे चरित्र व्हीनस प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती एप्रिल १९८६ |
| १२. | द.वा. पोतदार, डॉ.कमल गोखले- (संपादक) | | शिवचरित्राचे पैलू केसरी प्रकाशन पुणे, (प्रथम आवृत्ती १९८०) |
| १३. | रघुनाथ केशव पटवर्धन | - | शिवप्रदीप श्री मुद्रणालय, नाशिक, प्रथम आवृत्ती १९७१ |
| १४. | सेतु माधवराव पगडी | - | शिवचरित्र-एक अभ्यास शिवाजी विद्यापीठ प्रकाशन, कोल्हापूर, पुनर्मुद्रण २०१२ |
| १५. | डॉ.जयसिंगराव पवार | - | शिवछत्रपती : एक मागोवा सुमेरु प्रकाशन डोंबिवली पूर्व द्वितीयावृत्ती २००७ |
| १६. | स.म. दिवेकर (संपा) | - | कविंद्र परमानंदकृत श्री शिवभारत, भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, पुरस्कृत ग्रंथाल क्रमांक तीन शके १८४९ ( सन १९२७) |
| १७. | डॉ.जयसिंगराव पवार | - | छत्रपती शिवाजी महाराज अरुंधती प्रकाशन कोल्हापूर शके १९०२, सन १९८० |
| १८. | डॉ. जयसिंगराव पवार | - | शिवचरित्रपासून आम्ही काय शिकावे? सुमेरु प्रकाशनडोंबिवली. |
| १९. | डॉ. जयसिंगराव पवार | - | शिवाजी व शिवकाळ फडके प्रकाशन,कोल्हापूर प्रथमावृत्ती २०१० |

| | | | |
|---|---|---|---|
| २०. | डॉ. देव प्रभाकर | - | इतिहास एक शास्त्र कल्पना प्रकाशन नांदेड, प्रथमावृत्ती -१९९७ |
| २१. | डॉ.जयसिंगराव पवार | - | आमच्या इतिहासाचा शोध आणि बोध डोंबिवली पुर्व सुमेरु प्रकाशन कोल्हापूर २००७ |
| २२. | डॉ.शांता कोठेकर | - | इतिहास तंत्र आणि तत्त्वज्ञान,श्री साईनाथ प्रकाशन नागपूर , तिसरी आवृत्ती -२०११ |
| २३. | वि.स. वाळिंबे | - | छत्रपती श्री शिवराय मोरया प्रकाशन डोंबिवली पूर्व तृत्तीय आवृत्ती २०१३ |
| २४. | पुरुषोत्तम खेडेकर | - | शिवरायांची खंत जिजाई प्रकाशन पुणे, पहिली आवृत्ती १२ जाने २००७ |
| २५. | सुसेन नाईकवाडे पाटील | - | मावळा संभाजी प्रकाशन बीड, प्रथम आवृत्ती ऑक्टोबर २०१४ |
| २६. | प्रा.मा.म.देशमुख | - | शिवशाही शिवभारती प्रकाशन कोतवालनगर नागपूर-२२ |
| २७. | प्रा.अरुणा मोरे, डॉ.स्वाती काळभोर, डॉ.भारती नवथर | - | मराठ्यांचा इतिहास अथर्व प्रकाशन पुणे, प्रथमावृत्ती ,१५ ऑगस्ट २०१० |
| २८. | कै.महादेव मोरेश्वर कुंटे संपादन डॉ. एस.एस.भोसले | - | राजा शिवाजी साहित्य सेवा प्रकाशन औरंगाबाद,आवृत्ती पहिली १९९२ |
| २९. | डॉ. प्रभाकर गद्रे | - | मराठी राज्य आणि मराठी लोक विद्या प्रकाशन नागपूर प्रथमावृत्ती १९९९ |
| ३०. | प्रा.बळवंतराव वामनराव राजे | - | मराठ्यांचा इतिहास (शिवकाळ १६३०-१७०७) कैलास पब्लिकेशन्स औरंगाबाद. |
| ३१. | देशमुख मा.म. | - | युगप्रवर्तक शिवराज आणि मराठ्यांची शौर्यगाथा विश्वभारती प्रकाशन सीताबर्डी नागपूर, प्रथमावृत्ती जून १९७२ |
| ३२. | डॉ. पी.ए.गवळी | - | मराठ्यांचा इतिहास (१६३०-१८१८) कैलास पब्लिकेशन्स औरंगाबाद. |

३३. प्रा.डॉ. सुधाकर ग.देशपांडे - मराठ्यांचा इतिहास १६३० ते १८१८ कल्पना प्रकाशन नांदेड, पहिली आवृत्ती १९९४

३४. प्रा.मदन मार्डीकर - मराठ्यांचा इतिहास १६०० ते १८१८ विद्या बुक्स पब्लिशर्स औरंगाबाद, प्रथम आवृत्ती १९९८

३५. भास्कर वामन भट - शिवाजीची राजनिती राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, इ.स. १९४१

३६. रा.व्यं.जोशी - परकीयांच्या दृष्टितून शिवाजी मेहता पब्लिशिंग हाऊस पुणे

३७. सुधाकर पवार - मराठेशाहीतील पत्रारुप गद्य इ.स. १६५० ते १७५० शिवाजी विद्यापीठ प्रकाशन कोल्हापूर, प्रथमावृत्ती डिसेंबर १९७८

३८. श्रीधर तेलकर - हिंदवी स्वराज्याचे जनक श्री शहाजे राजे भोसले तेलकर्स फिचर सर्व्हिस बेळगांव पहिली आवृत्ती १९७१

३९. प्रा.अशोक राणा - छत्रपती शिवराय पंचफुला प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती १९ फेब्रुवारी २०१३

४०. पि.जी.जोशी - मराठ्यांचा इतिहास नंदादिप प्रकाशन नांदेड, प्रथमावृत्ती १९९८

४१. डॉ.मोहिनी कडू - ।। शिवचरित्र ।। लाखे प्रकाशन, नागपूर, प्रथमावृत्ती जुलै २०१४

४२. देवळे रा.रा. - महाराष्ट्रातील किल्ले, श्री लेखन प्रकाशन पुणे पहिली आवृत्ती १९८१

**हिंदी साधने**

१. डॉ. महेश कुमार - मराठो का इतिहास विश्वभारती पब्लिकेशन्स नई दिल्ली, प्रथम संस्करण २०१४

२. मोरे वसंतराव - छ.शिवाजी की साहित्यिक प्रतिमा-कितनी सही कितनी प्रेरक ?, शिवसंग्राम प्रकाशन कोल्हापूर, प्रथम संस्करण २००२

**संस्कृत साधने**

१. बेंद्रे वा.सि. (संपादन) - श्री शिवराज्याभिषेक पी.पी. एच बुक स्टॉल, मुंबई १९५९

२. हनुमंते, रघुनाथपंत - राज्यव्यवहार कोश, (संपादन) आपटे आणि दिवेकर, भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९२५

३. परमानंद , कवींद्र - शिवभारत, संस्कृत संहिता आणि मराठी भाषांतर (संपादन आणि प्रकाशन) दिवेकर, मुंबई १९२७

४. पिण्डये जयराम - पर्णाल पर्वत ग्रहणाख्यान, संस्कृत संहिता आणि हिंदी भाषांतर (भाषांतर आणि संपादन) देवीसिंह, चौहान,महाराष्ट्र सभा पुणे १९७०

**इंग्रजी साधने**

१. Jadunath Sarkar - " Shivaji and his Times", Longmans, Green and co-London, १९२०

२. M.G. Ranade - Rise of the Maratha Power, Pundlekar and co-mumbai १९००

३. Bal Krishna - Shivaji the Great Vol-I, Vol-II D.B Taraporewala sons and Co-Bombay, १९३२

**दैनिक / साप्ताहिके / मासिके**

१. मुझफ्फर हुसेन - दै.पुण्यनगरी दि.१७.१२.२०१३
२. विश्वाधार देशमुख - दै.पुण्यनगरी दि.२१.०२.२०१४
३. श्रीमंत कोकाटे - दै.सकाळ दि.१९.०२.२०१५
४. दिनेश कचकुरे - दै. पुण्यनगरी दि. १९.०२.२०१६
५. विद्याधर कांदे पाटिल - दै.पुण्यनगरी दि.१९.०२.२०१७
६. अमोल मिटकरी - दै.देशोन्नती दि.१९.०२.२०१७
७. सदानंद मोरे - दै.सकाळ दि.१९.०२.२०१७
८. विनायक अभ्यंकर - दै.पुढारी दि.१९.०२.२०१७
९. श्रीमंत कोकाटे - दै.सकाळ दि.१९.०२.२०१७

## Internet Sources

1. http//: mr.wikipedia.org/wiki/शिवाजी_महाराज